प्रकाशक :

**ग. ना. जोशी**, संचालक,
मराठी तत्त्वज्ञान-महाकोश मंडळ,
ग्रंथालयामागे, फर्ग्युसन महाविद्यालय आवार,
पुणे ४११ ००४
आणि
**अनंत अंबादास कुलकर्णी**, कार्यवाह
प्राचार्य दांडेकर वाङ्मय प्रकाशन मंडळ,
द्वारा कॉन्टिनेन्टल प्रकाशन,
विजयानगर, पुणे ४११ ०३०

प्रकाशन क्रमांक : १००५



प्रथमावृत्ती : १९८७

**किंमत रुपये ५०/–**

मुद्रक :

**शांताराम देवीदास जोशी**
*गायत्री मुद्रणालय,*
२०६०, सदाशिव पेठ,
पुणे ४११ ०३०

# अनुक्रमणिका

## मराठी तत्त्वज्ञान-महाकोश मंडळ

### निवेदन

'मराठी तत्वज्ञान-महाकोश मंडळा' च्या 'मराठी तत्वज्ञान-ग्रंथमाला प्रकल्पात' 'शैवदर्शन' हे बारावे ग्रंथ-पुष्प वाचकांच्या हाती देण्यास आम्हांला विशेष आनंद वाटतो. मतम मंडळाच्या या प्रकल्पातील प्रत्येक पुस्तकाला स्वतःचे आगळे महत्त्व आहे. प्रस्तुत पुस्तक शैव तत्त्वज्ञानावरील आहे.

भारतात धर्म व तत्त्वज्ञान यांचे बेमालूमपणे संमिश्रण झालेले आहे. भारतात हिंदू धर्माचे जे अनेक संप्रदाय आहेत त्यांच्यात वैष्णव व शैव संप्रदाय प्रमुख आहेत, आणि या संप्रदायांचे उपासक व अनुयायी भारताच्या सर्व भागांत विखुरलेले आहेत. विष्णूचे, कृष्णाचे, विठ्ठलाचे उपासक हे 'वैष्णव' समजले जातात, आणि शिवाचे, शंकराचे उपासक हे 'शैव' समजले जातात, शिव हे काही भारतीयांचे विशेष आदरणीय उपास्य दैवत आहे. खरे म्हणजे ब्रह्मा, विष्णु व शिव ही त्रिमूर्ती असून ती एकाच ईश्वराची तीन कार्यिक अंगे दर्शवितात. पण तरीही विष्णु व शिव यांना अंतिम व सर्वश्रेष्ठ उपास्य दैवत मानून त्यांपैकी कोणता तरी एक अंतिम स्वरू-पाचा व सर्वश्रेष्ठ आहे असे मानले गेल्याने काही उपासक विष्णूचे भक्त बनले तर काही शिवाचे ! महाराष्ट्रात विठ्ठल (वारकरी) संप्रदाय हा वैंष्णवप्रधान आहे. पण विठ्ठलात 'हरि' व 'हर' यांचा महासमन्वय झालेला आहे असेही मानले जाते. महाराष्ट्रीय संत विठ्ठलाला विष्णूचे रूप मानून त्याची उपासना करणारे आहेत. नाथसंप्रदाय व महानुभाव संप्रदायाचे अनुयायी शिवाला प्राधान्य देतात.

विष्णु थोर की शिव थोर असाही वाद झालेला असून शिव हा विष्णूपेक्षा अधिक बलवान, सामर्थ्यवान असून तो जसा प्रलय किंवा विनाश व संहार घडवितो तसाच तो महान त्राता, संरक्षणकर्ताही आहे असे त्याचे रूप शिवभक्तांकडून सांगण्यात येते. काही आपत्प्रसंगी देवसुद्धा असहाय बनले व त्यांनी राक्षस, दानव, असुर यांपासून आपले संरक्षण करण्याची शिवाला प्रार्थना केली व शिवाने आपले अद्‌भुत सामर्थ्य वापरून देवांनाही संरक्षण दिले अशा कथा आहेत.

शिव व शक्ती यांचे अद्वैत असल्याचे सांगितले जाते. शक्तीशिवाय शिव हा शव म्हणजे प्राणहीन, चैतन्यरहित म्हणजे सामर्थ्यविहीन बनतो, असेही म्हटले जाते, म्हणून शक्तीची उपासना करणारे शाक्त व तांत्रिक हे सुद्धा शिवाचेच उपासक असतात, व म्हणून शैव संप्रदाय हा शाक्त व तांत्रिक यांचाही संप्रदाय बनलेला आहे. दक्षिण भारतात शिवाच्या उपासनेला अधिक महत्त्व आलेले आहे, व विष्णुसारखीच शिवाची मोठमोठी मंदिरे व गोपुरे आहेत. एवढेच नाही तर

कोणाचे गोपुर अधिक भव्य व उंच आहे याविषयी त्यांच्यात वाद घातले गेले आहेत, व वैष्णव व शैव यांच्यांतील वाद विकोपाला जाऊन काही वेळा त्याचे रूपांतर कलहातही झालेले आहे.

पण सर्व हिंदूंची ' विष्णु ' व ' शिव ' ही दोन्ही आराध्य व उपास्य दैवते असून त्यांच्याविषयी समान आदर सर्वांच्या मनात वसत असतो. वैष्णव भक्त एकादशीचा उपवास नियमाने व निष्ठेने करतात व त्या दिवशी शिवाची पूजा भक्तिभावाने केली जाते. वारकरी संप्रदायात एकादशी–व्रताला फारच महत्त्व दिलेले आहे आणि पंढरपूर, आळंदी, देहू या क्षेत्री भरणाऱ्या यात्रा या एकादशी-च्याच तिथीला भरतात, व त्या दिवशी शिवाची पूजा विशेष मानाने केली जाते. खरे म्हणजे ब्रह्मा हा विश्वाचा स्रष्टा किंवा निर्माता, विष्णु हा विश्वाचा प्रति-पालक, त्राता, सांभाळ करणारा व शिव हा शेवटी संहार व नाश करणारा समजला जातो. उत्पत्ति, स्थिति व लय या अस्तित्वाच्या तीन अवस्था आहेत व एकेक अवस्था हे तीन देव आपल्या परीने सांभाळून आपले कार्य करणारे आहेत अशी हिंदुधर्मीयांची धारणा आहे. आणि खरे म्हणजे विष्णु व शिव यांच्यात विरोध व भांडण असण्याचे कोणतेच कारण नाही. कारण त्यांची निहित कार्ये भिन्न असून ती परस्परपूरक आहेत.

तथापि भारतात हिंदुधर्मात जसे कोटचवधि वैष्णव किंवा विष्णुभक्त आहेत असेच कोटचवधि शैव म्हणजे शिव-भक्त आहेत. त्यांचे उपासना-मार्ग काही प्रमाणात भिन्न आहेत. प्रत्येक गावात विष्णूच्या मंदिरांप्रमाणे शिवमंदिरे-महादेवमंदिरे असतात व दोघांचीही पूजा समान आदराने व भक्तीने केली जाते. शिव हे अखिल भारताचे एक अत्यंत वंदनीय उपास्य दैवत आहे, ही गोष्ट आसेतुहिमाचल पसरलेल्या या विशाल प्रदेशात, सर्व भारतभर विविध ठिकाणी विखुरलेल्या स्वरूपात बारा ' ज्योतिर्लिंगे ' आहेत व त्या बाराही ज्योतिर्लिंगांचे दर्शन घ्यावयास मिळणे ही अत्यंत पुण्यदायी गोष्ट मानली जाते यावरून स्पष्ट होते.

शैव संप्रदाय हा हिंदूंचा एक प्रभावी संप्रदाय आहे. त्याचे ऐतिहासिक स्वरूप कसे आहे व त्याची तत्त्वज्ञानात्मक बैठक कशी आहे, त्याचे उपसंप्रदाय कोणते आहेत व त्यांच्यात सूक्ष्म भेद कसे आहेत, हे सांगणारे चांगले पुस्तक मरा-ठीत उपलब्ध नसल्याने मतम मंडळाने मुद्दाम ' शैवदर्शन ' हे व्यापक पुस्तक कोल्हा-पूरचे डॉ. ग. वा. तगारे यांच्यासारख्या व्यासंगी तज्ज्ञांकडून लिहवून घेतले आहे. शैवतत्त्वज्ञान हे खोल, मूलगामी, मूलग्राही व मौलिक स्वरूपाचे कसे आहे हे या पुस्तकात विवरण करून सांगितले आहे. काश्मीर शैवमत, पाशुपतमत, दाक्षिणात्य शैवमत, शैवविशिष्टाद्वैत, वीरशैवमत या प्रमुख उपशैवसंप्रदायांच्या तत्त्वज्ञानाचा

थोडक्यात व सुबोध रीतीने या पुस्तकात डॉ. ग. वा. तगारे यांनी परिचय करून दिलेला आहे. मूळ संस्कृत वचने व उतारे यांचे ठिकठिकाणी आधार देऊन पुस्तक प्रमाणित करण्यात आलेले आहे. हे पुस्तक परिश्रमपूर्वक रीतीने लिहून दिल्याबद्दल मतम मंडळ डॉ. ग. वा. तगारे यांचे फार आभारी आहे.

या विषयाचा लेखकाचा व्यासंग किती खोल व व्यापक आहे हे या पुस्तकातील विवरणावरून दिसून येते. या पुस्तकाद्वारे मराठी वाचकांना शैव-तत्त्वज्ञानाचा यथार्थ परिचय होईल अशी अपेक्षा आहे. या महत्त्वाच्या पुस्तकाला या विषयाचे एक प्रगाढ व्यासंगी श्री. वि. स. पागे यांनी आपल्या कार्यबाहुल्यातही सवड काढून सुंदर प्रस्तावना लिहून दिल्याबद्दल मतम मंडळ त्यांचे फार आभारी आहे.

हे आगळे पुस्तक तयार करण्यासाठी मतम मंडळाला महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाकडून आर्थिक साहाय्य झाले आहे तसेच मंडळाचे एक सदस्य श्री. वि. स. पागे यांनी भारत फोर्ज कंपनीचे व्यवस्थापक डॉ. नीलकंठराव कल्याणी, मुंबईचा सिद्धिविनायक गणपती मंदिर न्यास आणि सांगलीचा 'बी. एस्. कोरे शैक्षणिक ट्रस्ट' यांच्याकडून काही आर्थिक साहाय्य मिळवून दिले आहे. पुण्याच्या 'प्राचार्य दांडेकर वाङ्मय प्रकाशन मंडळ,' पुणे, यांनीही या पुस्तकाच्या प्रकाशनाची काही आर्थिक जबाबदारी उचलली व म्हणून मतम मंडळाला हे पुस्तक प्रसिद्ध करणे शक्य झाले आहे. आम्ही या सर्वांचे आभारी आहोत.

या पुस्तकात बरेचसे संस्कृत संदर्भ आलेले आहेत ते बारकाईने वाचून मुद्रिते तपासून देण्याचे अत्यंत किचकट पण जबाबदारीचे कार्य पुण्याच्या बालमुकुंद संस्कृत महाविद्यालयाचे (टिळक महाराष्ट्र विद्यापीठ) प्राचार्य डॉ. श्रीकांत बहुलकर यांनी खूप परिश्रम घेऊन अत्यंत अल्प मुदतीत उत्तम रीतीने करून दिल्याबद्दल मतम मंडळ त्यांचे फार आभारी आहे. श्री. अनंत जोशी (ग्रंथपाल, गरवारे महाविद्यालय, पुणे) यांनी अल्प वेळात या पुस्तकासाठी सूची तयार करून दिली त्याबद्दल आम्ही त्यांचे फार आभारी आहोत, तसेच या पुस्तकाच्या मुद्रणाचे अवघड कार्य पुण्याच्या गायत्री मुद्रणालयाने मर्यादित वेळेत करून दिल्याबद्दल मतम मंडळ त्यांचे व्यवस्थापक श्री. शांताराम जोशी यांचे आभारी आहे.

१५ जून १९८७

— ग. ना. जोशी,<br>संचालक,<br>मतम मंडळ

# प्रस्तावना

'मराठी तत्त्वज्ञान–महाकोश मंडळाने' तयार केलेल्या व क्रमाक्रमाने प्रसिद्ध केलेल्या मराठी तत्त्वज्ञान–ग्रंथमालेत 'शैवदर्शन' हे वैशिष्टचपूर्ण पुस्तक प्रसिद्ध होत आहे याबद्दल हे मंडळ अभिनंदनास पात्र आहे. अलीकडे मतम मंडळाने वेगळ्या प्रकारची व वैशिष्टचपूर्ण अशी अनेक पुस्तके प्रसिद्ध केलेली आहेत, आणि इतर काही चांगली पुस्तके प्रकाशनाची वाटचाल करीत आहेत हे समजल्याने मला फारच समाधान वाटते. मूलगामी व तात्त्विक चिंतनाला या पुस्तकांद्वारा मतम मंडळ प्रेरणा, चालना, प्रोत्साहन व मार्गदर्शन देत आहे व नव्या काळाची एक मोठी वैचारिक गरज पूर्ण होण्यास साहाय्य करीत आहे. मतम मंडळाचा हा उपक्रम प्रशंसनीय असल्याने मी मंडळाच्या या नावीन्यपूर्ण व वैशिष्टचपूर्ण कार्याबद्दल त्याचे मनःपूर्वक अभिनंदन करतो व त्याचे असे कार्य यशस्वीपणे अधिक गतीने पुढेही चालू राहावे अशी इच्छा व्यक्त करतो.

'शैवदर्शन' या प्रस्तुत पुस्तकाचे लेखक डॉ. ग. वा. तगारे हे माझ्या चांगल्या परिचयाचे आहेत. ते अत्यंत विद्वान, व्यासंगी, साक्षेपी व सिद्धहस्त लेखक आहेत. त्यांनी ह्या 'शैवदर्शन' पुस्तकाची रचना अत्यंत परिश्रमपूर्वक केलेली आहे म्हणून मी त्यांचे अभिनंदन करतो. शिव, रुद्रशिव हे हिंदूंचे अत्यंत प्राचीन व थोर दैवत असूनही व शिवाची भारताच्या सर्व प्रांताप्रांतांत सातत्याने पूजा, उपासना, प्रार्थना होत असूनही त्याचे स्वरूप व महत्त्व फारच थोडचांना परिचित आहे. शिवाविषयी लोकांना परमादर व भक्ती वाटत असूनही त्याचे खरे स्वरूप व शैवसंप्रदायाची तात्त्विक बैठक किती पक्की, बुद्धीला पटणारी व महत्त्वपूर्ण आहे याविषयी सर्वत्र अज्ञानच आढळते. डॉ. तगारे यांनी 'शैवदर्शन' हे पुस्तक लिहून फार मोठे व महत्त्वाचे कार्य केलेले आहे. या विषयावर मराठीत इतका मोठा, व्यापक, अचूक व समावेशक ग्रंथ यापूर्वी प्रसिद्ध झालेला नाही. म्हणून पुनः एकदा असा ग्रंथ सिद्ध केल्याबद्दल डॉ. ग. वा. तगारे यांचे व मतम मंडळाने प्रसिद्ध केला याबद्दल मंडळाचे मनःपूर्वक अभिनंदन करतो व या ग्रंथाचे स्वागत करतो. मराठी वाचकांना या ग्रंथाचा लाभ निश्चितच मौल्यवान वाटेल यात शंका नाही.

या ग्रंथाची रचना करण्यासाठी त्याचे लेखक डॉ तगारे यांनी अनेक दुर्मिळ, अपरिचित व अवघड ग्रंथांचे आलोडन केले आहे. अशा ग्रंथांचे वाचन व अध्ययन करणे हे काम फार कठीण असते. परंतु डॉ. तगारे यांनी या ग्रंथाची रचना करण्या-साठी अनेक संदर्भग्रंथ प्रयत्न करून मिळविले व त्यांतील योग्य त्या विचारांची निवड

करून त्यांची अत्यंत सोप्या, सुबोध व साध्या भाषेत मांडणी करून सर्वसामान्य जिज्ञासू वाचकालाही हा ग्रंथ समजू शकेल इतका सुगम केला. शैवमत एकाच प्रकारचे नाही. त्याच्याही उपशाखा आहेत. नकुलीश पाशुपत दर्शन, काश्मीरी शैवमत, (दाक्षिणात्य) सिद्धान्त (द्वैती) शैवमत, शैव विशिष्टाद्वैत, वीरशैवमत या प्रमुख पाच शैव उपसंप्रदायांच्या तत्त्वज्ञानाचा शक्य तितक्या तपशिलात जाऊन लेखकाने उत्तम रीतीने परिचय घडविलेला आहे. पुस्तकाचे वैशिष्ट्य असे सांगता येईल की हा ग्रंथ व्यापक, समावेशक, सुबोध व अचूक आहे. प्रत्येक मत लेखकाने त्या त्या दृष्टिकोणानुसार व्यवस्थितपणे मांडलेले आहे व कोणावरही अन्याय होणार नाही अशी दक्षता घेतली गेलेली आहे. हा ग्रंथ सर्वांसाठी आहे. हा शिव-ग्रंथ आहे. म्हणजे ' शिवू नको, शिवू नको ' असे म्हणणाऱ्या धर्माच्या अगदी विरुद्ध ' शिव, शिव,' म्हणणारा आणि विश्वाचे व जीवनाचे रहस्य कोणालाही समजावून सांगणारा, सर्वांना समान रीतीने खुला व उपलब्ध आहे. यात हिंदुधर्माचे खरे रहस्य स्पष्ट रूपात व्यक्त झालेले आहे. काहीशा उपेक्षित अशा या विषयावर माझ्या समजुतीप्रमाणे इतका मोठा, चांगला व उपयुक्त असा हा ग्रंथ मराठीत पहिलाच ठरेल. डॉ. तगारे यांनी आपल्या उतार वयात असा मौल्यवान ग्रंथ रचून दिला ही त्यांची महत्त्वाची कामगिरी आहे.

* * *

मला स्वतःला शैवमताविषयी फार दीर्घ काल आकर्षण वाटत आलेले आहे. त्यातही मुख्यतः मी काश्मीरी शैवमताचे अनेक ग्रंथ प्रयत्न करून मिळविले व वाचले आहेत. मी स्वतः काश्मीरात गेलो असता तेथील पंडितांना जाऊन भेटलो, त्यांच्याशी चर्चा केल्या व काही दुर्मिळ ग्रंथही मिळविले. या विषयाचे अधिक चिंतन करताना मला काही गोष्टी विशेष प्रकर्षाने जाणवतात व या जुन्या तत्त्वज्ञानाचे रहस्य सद्यःपरिस्थितीतही कसे महत्त्वाचे आहे हे लक्षात येते. मी भारताच्या स्वातंत्र्याच्या लढ्यात सक्रियपणे भाग घेत असे. त्यावेळी तुरुंगात कित्येक महिने काढावे लागत. तेथेही अनेक व्यासंगी व विद्वान सहकाऱ्यांबरोबर चर्चा करण्यास संधी मिळत असे. तेव्हापासून मला असे वाटते की भारताच्या नव्या सामाजिक व राजकीय व्यवस्थेला तात्त्विक बैठक शैव दर्शनाकडून मिळू शकते. सध्या जगात साम्यवाद (Communism) आणि लोकशाही (Democracy) या दोनच जीवनप्रणाली तरुणांना अर्थपूर्ण, आकर्षक व प्रेरणा देणाऱ्या वाटतात. ' साम्यवाद ' हे एका दृष्टीने समग्र असे तत्त्वज्ञान आहे. अंतिम सत्तेचे स्वरूप, विकासाचे व उत्क्रान्तीचे तत्त्व, विरोध-विकास व त्यातून होणारी प्रगती, विज्ञानाचा व तंत्रविद्येचा विकास आणि या सर्वांच्या साहाय्याने मानवी समाजाची शतकानुशतके होत आलेल्या शोषणापासून, दारिद्र्यापासून, अज्ञानापासून व विषमतेपासून होऊ पाहणारी मुक्ती या सर्व गोष्टी साम्यवादात प्रकर्षाने आढळतात.

साम्यवादाला स्वतःचे समग्र तत्त्वज्ञान आहे. विश्वाची उत्पत्ती, त्याचे स्वरूप, त्याच्या परिवर्तनाचे व गतिशास्त्राचे द्वंद्वात्मक किंवा द्वंद्वविकासी तत्त्व, मानवी समाजाचे सातत्याने होणारे परिवर्तन व त्याचा त्याच्या आर्थिक रचनेशी असणारा कार्य–कारण संबंध, समाजाची नीती, धर्म, कला, शिक्षण व मानवाच्या कल्पना, विचारपद्धती, श्रद्धा यांचा आर्थिक रचनेशी असणारा निकटचा संबंध या सर्वांचे एकत्रित बुद्धिनिष्ठ रीतीने उपपादन करण्यासाठी साम्यवादापाशी सुसंगत तात्त्विक बैठक व दृष्टिकोण आहे. त्यात काही वैगुण्ये व तर्कदोष आहेत हेही खरेच आहे. पण साम्यवादाला तत्त्वज्ञानाची बुद्धिनिष्ठ बैठक आहे हे नाकारता येत नाही व त्यामुळे बुद्धिनिष्ठ रीतीने विचार करणारे तरुण त्याच्याकडे आकर्षिले जातात हे स्वाभाविक आहे. साम्यवादाला पर्यायी लोकशाही-विचार आहे व त्याला कोणती बुद्धिनिष्ठ व मजबूत तत्त्वज्ञानात्मक बैठक आहे, हे मात्र सांगितले जात नाही. किंबहुना लोकशाहीचे समर्थन करणारे व त्याची इष्टता निर्देशित करणारे समग्र तत्त्वज्ञान पाहिजे आहे; त्याला प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानात कोठे आधार मिळतो का हे शोधावयास हवे आहे. अशा दृष्टीने विचार करता मला शैवदर्शन लोकशाहीला प्रेरक व पोषक असे तत्त्वज्ञानात्मक अधिष्ठान देऊ शकते, आणि लोकशाहीच्या सारभूत संकल्पना शैवदर्शनात अनुस्यूत आहेत असे आढळून येते. मात्र त्यांना योग्य अशी आधुनिक परिभाषा योजण्याची व त्यांचा योग्य अर्थ मांडण्याची आवश्यकता आहे. अशा दृष्टीने पाहता मला आधुनिक काळातील विचारांशी शैवदर्शन कसे सुसंगत रीतीने जोडलेले आहे हे अगदी संक्षिप्त रीतीने येथे सूचित करावेसे वाटते. मी म्हणतो त्या विचारांचा विद्वानांनी अधिक खोलात व सूक्ष्मात जाऊन विचार करावा व लोकशाहीला पोषक व समर्थक असे अधिष्ठान शैवदर्शन कसे देऊ शकते हे तर्कशुद्ध मांडणी करून दाखवावे अशी अपेक्षा आहे.

माझ्या दृष्टीने लोकशाहीत स्वातंत्र्य, समता व परिवर्तन या मूलभूत व सारभूत संकल्पना आहेत. भारतीय तत्त्वज्ञानात शिव ही अंतिम सत्ता असून तो शिव ब्रह्मासारखा अचल, अविकारी, अपरिवर्तनशील, स्थिर असा नसून तो शक्तियुक्त आहे. किंबहुना शिव व शक्ती यांचे अद्वैत आहे. शक्तिशिवाय शिव हा शवासारखा (प्रेतासारखा) म्हणजे निर्जीव किंवा जड समजला जातो.

"शक्ति समायोगाच्छक्तिमानुच्यते शिवः।" शिव हा शक्तिमत् आहे. शक्ती हे शिवाचे अविभाज्य अंग आहे. त्यांच्यात फक्त विचाराने फरक करता येतो, प्रत्यक्षात मात्र जेथे शिव तेथे शक्ती असते व जेथे शक्ती तेथें शिव असतो. शक्ती हे परिवर्तनाचे कारण आहे. शक्ती परिवर्तनशील जग, संसार, प्रपंच दाखवते, व शिव शुद्ध अविकारी अस्तित्व दाखवितो. शिवाय जी हालचाल होते ती स्पंदस्वरूपाची असते. शिवाची शक्ती ही किंचिच्चलता किंवा स्फुरण असते. ती केवळ थरथरण्यासारखी असून ते त्याच्या चैतन्यशीलतेचे व जिवंतपणाचे निदर्शक

आहे. वेदान्ताप्रमाणे शैव या जगाला मिथ्या, असत्य, भासरूप मानीत नाही; तर हे जग शिवाचे स्पंदन किंवा स्फुरण अशा अर्थाने सत्य आहे. केवळ भासरूप नाही. शिव क्रियाशील आहे; निश्चल असा केवळ द्रष्टा किंवा साक्षी नाही. शिवाय शिव 'स्वतंत्र' आहे. तो कोणत्याही बाह्य शक्तीने बद्ध, नियंत्रित वा निर्धारित होत नाही. भारतीय तत्त्वज्ञानात 'स्वातंत्र्यवाद' हा प्रामुख्याने शैवमतातच पाहावयास मिळतो. शिव पूर्णपणे स्वतंत्र आहे व त्याच्यावर नियंत्रण चालत नाही व त्याचे निर्धारण केले जात नाही हा अत्यंत महत्त्वाचा मुद्दा आहे.

शिवाचे स्वातंत्र्य परमोच्च व निरुपाधिक आहे. त्याला इच्छास्वातंत्र्य व कृतिस्वातंत्र्य आहे तो या विश्वाची पाहिजे तशी रचना करू शकतो व मोडू शकतो. त्याचे इच्छास्वातंत्र्य हेच त्याचे ऐश्वर्य आहे. " स्वातंत्र्यमेतन्मुख्यं तदैश्वर्यं परमात्मनः ।" शिव ही महासत्ता विविध रीतींनी स्फुरण पावून व्यक्त होते व तिची अनेक रूपे जगाच्या रूपाने पाहावयास मिळतात. " सा स्फुरता महासत्ता देशकाल विशेषिणी ।"

परम शिवाच्या ठिकाणी इच्छास्वातंत्र्याप्रमाणे सृजन, स्थिती, संहार, विलय, तिरोधान व अनुग्रह करण्याच्याही शक्ती आहेत व तो निष्क्रिय नसून कर्तृत्ववान आहे. माया ही त्याची उपाधी नसून सर्जन-शक्ती आहे. कश्मीरी शैवमत ईश्वराद्वयत्वाचा पुरस्कार करणारे आहे. हे विश्व म्हणजे त्या शिवस्वरूपाचा 'चिद्विलास' आहे, तो आभास असला तरी असत्य नाही. शिवाच्या चिच्छक्ती, आनंदशक्ती, इच्छाशक्ती, ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती या पाच प्रमुख शक्ती आहेत. भौतिकवादी मानतात तसे हे अंतिम सत्य किंवा ही परासत्ता जड, अचेतन व अबोध स्वरूप नसून ती चैतन्यरूप व बोधात्मक आहे.

तंत्रसारात म्हटले आहे –

" तस्य स्वातंत्र्यम् आनंदशक्तिः, तच्चमत्कार इच्छाशक्तिः, प्रकाशरूपता चिच्छक्तिः, अमर्षात्मकता ज्ञानशक्तिः, सर्वाकारयोगित्व क्रियाशक्तिः, इत्येवं मुख्याभिः शक्तिभिः युक्तोऽपि वस्तुत इच्छा-ज्ञान-क्रियाशक्तिः, इत्येवं अनवच्छिन्न प्रकाशो निजानंद विश्रान्तः शिवरूप । "

शिव हा नटराज आहे. हे विश्व म्हणजे त्याची सहजस्फूर्त व निर्हेतुक क्रीडा आहे. त्याची ही करमणूक, गंमत (नर्म) आहे व या विश्वनिर्मितीतून व जगाच्या व्यापारातून तो आपले अबाधित व अनिबंध स्वातंत्र्य व्यक्त करीत आहे. तो स्वतःचे खरे स्वरूप स्वनिर्मित विश्वाच्या मागे लपवून टाकतो व पुनः उघडे करतो. शिव हा प्रकाशरूप असल्याने त्यात काहीही कमी किंवा जास्त होत नाही. तो नित्य अधिकारी असूनही आळीपाळीने आपले खरे स्वरूप झाकून टाकतो व स्वच्छपणे प्रकटही करतो. असा हा त्याचा चिद्विलास, स्वयंस्फुरण, आत्मस्पंद आहे. हे जग शिवाची अभिव्यक्ती म्हणून सत्यच आहे, पण अपरिपक्व मनाच्या लोकांना मात्र हे जगच सत्य वाटते, पण परिपक्व मनाच्या विवेकी लोकांना हे जग ब्रह्मच व

त्या अर्थाने सत्य वाटते. अभिनवगुप्ताचा खालील श्लोक हा सर्व आशय उत्तम रीतीने व्यक्त करणारा आहे.

" आत्मा प्रकाशवपुरेष शिवः स्वतंत्रः ।
स्वातंत्र्य नर्मरभसेन निजं स्वरूपं
संच्छाद्य यत्पुनरपि प्रथयेत पूर्णं
तच्चक्रमाक्रमवशात् अथवा त्रिभेदात् ॥ "

जग हे परिवर्तनशीलतेचे निदर्शक आहे. निसर्ग व मानवी समाज यात सतत बदल होत असतात व ते बदल मानव आपल्या इच्छेनुसार व आदर्शानुसार घडवून आणीत असतो. म्हणजे मानवाला आपल्या इच्छेनुसार व आदर्शानुसार प्रगती व उन्नती घडवून आणण्यासाठी जे बदल व परिवर्तन घडवून आणावयाचे असते ते असत्य, भासमान व मायिक नसून सत्य असते असे शैवतत्त्वज्ञानात मानले जात असल्याने मानवाच्या आदर्श जीवनरचनेला वाव या तत्त्वज्ञानानुसार मिळतो.

तसेच शैव तत्त्वज्ञानात सर्वाधिकाराची कल्पना समतेची निदर्शक आहे. म्हणजे सर्व मानवांना समान रीतीने आपली उन्नती साधण्याचा अधिकार मान्य करण्यात आलेला आहे. ब्राह्मण संस्कृतीत मोक्ष प्राप्तीचा अधिकार शूद्रासारख्या काही वर्णांना नाकारण्यात आलेला आहे, तसे शैव मतात नाही. शैवमताप्रमाणे जीवनसिद्धीचा मार्ग सर्वांना खुला आहे. म्हणजे वर्णीय उच्च-नीच भेदाला त्यात वाव नाही, तर उलट सर्वच लोक, सर्व स्त्री-पुरुष यांना त्यांच्या वर्णनिरपेक्ष रीतीने जीवनसिध्दी प्राप्त करून घेण्यास समान संधी मिळते. म्हणजे शैवमतानुसार सामाजिक समता हे मूल्य महत्त्वाचे समजले जाते व हे लोकशाहीसाठी अत्यावश्यक आहे.

अशा दृष्टीने पाहिल्यास लोकशाहीस आवश्यक असलेल्या स्वातंत्र्य, समता, व परिवर्तन या तीन संकल्पनांना शैवदर्शनात स्थान व वाव आहे व ते लोकशाहीला तत्त्वज्ञानाचे आवश्यक, पोषक व समर्थक अधिष्ठान पुरवू शकते. म्हणून आधुनिक संदर्भात शैवदर्शनाकडे पाहणे व त्याचा अर्थ लावून त्याचे साहाय्य घेणे उपयुक्त ठरू शकेल. शैवदर्शनाचा आधुनिक समाजाच्या व काळाच्या संदर्भात अधिक सखोल व चिकित्सक अभ्यास करणे उपयुक्त व मार्गदर्शक ठरू शकेल असे मला वाटते.

ज्यांना आधुनिक समाजाच्या गरजांच्या दृष्टीने अशा तत्त्वज्ञानाचा आधार व उपयुक्त अधिष्ठान असण्याची आवश्यकता वाटते त्यांना शैवदर्शन मजबूत आधार व अधिष्ठान देऊ शकेल व त्या दृष्टीने अभ्यास करणाऱ्यांना हा ग्रंथ निश्चितच मदत करू शकेल व उपयुक्त ठरू शकेल असा मला विश्वास वाटतो.

या ग्रंथाला अनेक दृष्टींनी महत्त्व आहे व हा ग्रंथ वाचकांना खूपच उपयुक्त व मार्गदर्शक ठरू शकेल यात शंका नाही.

मुंबई वि. स. पागे

## लेखकाचा परिचय

**डॉ. गणेश वासुदेव तगारे**, एम्. ए., पीएच्. डी.

महाराष्ट्र शिक्षण सेवेतून निवृत्त होताच सध्या कोल्हापूर येथे वास्तव्य भाषाशास्त्र, शिक्षणशास्त्र, संख्याशास्त्र इत्यादी विषयांवर इंग्रजी, व मराठी संशोधन-पत्रिकांमधून १९३९ सालापासून लेखन.

### प्रकाशित ग्रंथ

१. श्रीमद्भागवत, खंड १ ते५
२. नारदपुराण, खंड १ ते ५
३. करवीर महात्म्य
४. पाली साहित्याचा इतिहास
५. कुंदकुंदाचे प्रवचनसार
६. स्पंदकारिका

### आगामी ग्रंथ

१. प्राकृत साहित्याचा इतिहास
२. वसुगुप्ताची शिवसूत्रे
३. वल्लभाचार्य - तत्वार्थदीपनिबंध (सटीप इंग्रजी अनुवाद)
४. वल्लभाचार्य : व्यक्ति, वाङ्मय, तत्वज्ञान

**पत्ता : ४४, प्रतिभा नगर, कोल्हापूर - ४१६००८**

# भूमिका

शिव हे परमतत्त्व मानून केल्या गेलेल्या तत्त्वविचारांची ही स्थूल रूपरेषा आहे. 'यस्य निःश्वसितं वेदाः' असे वर्णन असलेला शिव वेदपूर्व व आगमपूर्व आहे यावर माझी श्रद्धा आहे. पण त्याचा शोध तारकांकित शब्दजालांनी किंवा कुदळीच्या टोकाने लागेल असे वाटत नाही. 'न मेधया न बहुधा श्रुतेन' असे उपनिषत्कारांनी (कठ. २.२३, मुण्डक. ३.२.३) मागेच म्हटले आहे. सर्वातीत असलेले हे तत्त्व 'आर्य' की 'द्रविड' हा वाद प्रस्तुत ग्रंथाशी संबंधित नाही. शिवाय तो विषय अद्याप विवाद्य असल्यामुळे त्या वादात मला रस नाही. प्रस्तुत पुस्तकात ते शब्द आले असल्यास ते भाषाशास्त्रीय अर्थी आहेत, मानव-वंश-द्योतक नाहीत. कारण या आर्य–द्रविड प्रश्नाची दुसरी बाजू अशी मांडली जाते.

१९ व्या शतकातील पाश्चात्य पंडितांनी (व त्यांच्या अनुकरणाने आम्ही) 'आर्य' नावाचा 'मानव वंश,' 'असंस्कृत टोळ्या,' 'भटक्या जमाती' मध्य आशियातून, दक्षिण रशियातून वा उत्तरध्रुवीय प्रदेशातून येऊन, युरोपीय मान-चित्रकारांनी (Cartographer) आमच्या मनावर कोरलेल्या 'भारत' नामक त्रिकोणाकृती भूप्रदेशात घुसल्या व येथील स्थानिक लोकांच्या–'नागरी, प्रगत सिंधुसंस्कृतीत नांदत असलेल्या' हा नंतरचा शोध–कत्तली करून येथे स्थिर झाल्या असा 'इतिहास' आम्हाला शिकविण्यात आला. 'सिंधु–संस्कृतीचा (का सरस्वती संस्कृतीचा ?) शोध लागल्यानंतर हे नागरी सुसंस्कृत लोक 'द्रविड' होते व ती संस्कृती 'वेदपूर्व' आहे असे गृहीत धरण्यात आले. आणि त्या कालापर्यंत आपल्या आर्यत्वाची ग्वाही देणारे धर्म वा पंथ 'आम्ही द्रवीड,' 'आमचा धर्म वेदपूर्व' असा उद्घोष करू लागले. जर हे वेदभाषक बाहेरून येऊन 'द्रविड' वा 'नाग' लोकांच्या कत्तली करून वा संघर्ष करून येथे स्थायिक झाले असते तर दाशराज्ञ युद्धात वा इतरत्र अन्य जमातींची नावे देणाऱ्या ऋग्वेदात 'द्रविड' किंवा 'नाग'

हे मानवसमूह किंवा जमातवाचक शब्द का नसावेत ? दुसरी गोष्ट, शेकडो वर्षे परागंदा होऊन जगभर पसरलेल्या ज्यू लोकांना इस्राएल आपली मातृभूमी आहे याची जाणीव राहते व 'पुढच्या वर्षी जेरूसलेममध्ये' हा दुर्दम्य आशावाद ते प्रकट करत अत्यंत हलाखीच्या अवस्थेत युरोपियन प्रदेशात विखुरलेला 'रोमानी' भाषक समाज हरियाणा आपली पितृभूमी आहे असे अजून मानतो. पण वेद व पुराणे या नावाचे विपुल साहित्य निर्माण करणाऱ्या तथाकथित आर्यांना त्यांच्या साहित्यात आपली मातृभूमी कुठेतरी बाहेर असावी याची जाणीव नसावी हे मानवी स्वभावाला सोडून वाटते.

शिवाय सिंधुसंस्कृती ज्या काळी सापडली त्या काळी तिच्याबद्दल करण्यात आलेल्या कल्पना पुढील संशोधनात टिकल्या नाहीत. सिंधुसंस्कृतीचा नाश आक्रमकांनी केला याच्या पुराव्यापेक्षा इतर नैसर्गिक आपत्तीमुळे ( उदा. सिंधुनदीचे पूर, बदलते पात्र, बदलत गेलेले हवामान, लोथल बंदर गाळाने भरून येणे इ ) तेथील लोकांनी स्थलांतर केले असा पुरावा आढळून आला. एस. सरकार व इतर मानववंशशास्त्रज्ञांना सिंधुसंस्कृति–क्षेत्रात सापडलेल्या मानवी अस्थिपंजरांवरून त्याकाळची त्या त्या प्रांतातील माणसे आज तेथे विद्यमान असणाऱ्या माणसांसारखीच दिसण्यात असावीत असे आढळले त्यामुळे 'India stands accused' या शब्दांतील आक्रमणकल्पना वस्तुस्थितीला सुसंगत वाटत नाही

आमच्या मनावर युरोपीय मानचित्रकारांनी भारताचे कोरलेले मानचित्र पुराणातील स्थलांच्या उल्लेखांमुळे अवास्तव वाटते. उदाहरणार्थ, गंधमादन पर्वत (ख्वाजा महंमद पर्वत श्रेणी), श्वेतपर्वत (नुराताउ–तुर्किस्तान–अत्–बशी–रांग), मेरु (पामीर), जिच्या काठी नारदपुराण सांगितले गेले असे मानतात ती सीता नदी (तारीम–यार्कंद Tarim–Yarkand); केतुमाल (बॅक्ट्रिया) इ. अनेक स्थळे फाळणीपूर्व भारताच्या बाहेरची आहेत सोव्हिएट भारतीयविद्यातज्ज्ञांनी (Indo–logists – यांपैकी काही भाषाशास्त्रज्ञ व बरेच पुरातत्त्ववेत्ते आहेत [उदा. ओ न. ट्रूबाचेव्ह ( G. N. Trubachev ), ब. आ. रिबाकोव्ह ( B A. Rybakov ), अनातोली कुबिशव्ह (Anadtoli Kubyshev), चेर्नकोव्ह (J. S. Chernyakov)], यांनी ख्रिस्त पू ४५०० या कालात पश्चिम व मध्य आशिया व रशियाचा दक्षिणभाग यात वेदानुयायी होते असे दाखवले आहे [1]

---

१. सोव्हिएटलँड, आक्टोबर १९८३ नं. १९ पृ. २६ वरील The Aryans New Discoveries चे आधारे भारतीय विद्याभवन प्रकाशित The Vedic Age पृ २२०–२२१ मध्ये आर्य–आक्रमणाच्या उपपत्तीविरुद्धचा पुरावा दिला आहे. (कै.) अ. द. पुसाळकर–'हरप्पापूर्व, हरप्पा आणि हरप्पोत्तर संस्कृती', सस्कृतिसुगंध, दास्ताने, पुणे १९७७ पृ १०३–११५, मुजफर अल्कृत Geography of the Puranas, Peoples Publishing House, मुंबई १९७२ इ. च्या आधारे वरील विवेचन केले आहे.

सिंधुलिपी द्राविडी नसून ती ब्राह्मीशी संबंधित आहे व त्यातील लेखांत वैदिक शब्दांची पूर्वरूपे दिसतात. हे डेक्कन कॉलेजमध्ये (१५ मार्च ते १८ मार्च १९८२) झालेल्या Writing Systems with special Reference to Indus Script सेमिनारमध्ये डॉ. एस्. आर. राजांनी स्पष्ट केले आहे.[२]

पुरातत्त्ववेत्त्यांचे अलीकडील मत असे आहे की आर्य लोक सिंधुसंस्कृतिपूर्वीच भारतात होते. सिंधुसंस्कृतीला पूर्वी द्राविडी मानणारे बी. बी. लाल, बी. के थापर यांच्यासारखे संशोधक आर्य लोक सिंधुसंस्कृतीच्या प्रारंभापासून भारतात होते असे आता म्हणतात. सोव्हिएट मध्य आशियातील ताजिक (Tadzhik) लोकराज्याची (Republic) राजधानी दुशाम्बे (पूर्वीचे स्तालिनाबाद) येथे प्राचीन जनसमुदायांचे स्थलांतर (The genesis and the interaction of nomadic and sedentary Societies) व त्या (मध्य आशियातील) भागाचा सांस्कृतिक इतिहास याविषयी युनेस्कोमार्फत जी परिषद (Symposium) (इ. स. १९७७) मध्ये भरली होती.[३] त्यात बी. के थापर यानी वाचलेल्या "The Aryan : A Reappraisal of the Problem" या निबंधाचा सारांश असा की मध्य आशियातील काही वस्तू भारतात सापडल्या याचा अर्थ त्या देवाण घेवाण स्वरूपातील होत्या. वैदिक आर्यांचे सिंधू ते गंगा या भागात ज मूलस्थान होते तेथपर्यंत प्रागैतिहासिक कालातील कोणतीही संस्कृती मध्य आशियातून तेथपर्यंत पोचणे

---

२. तो लेख आता प्रसिद्ध झाला आहे

३. सदर परिषदेविषयी 'टाइम्स ऑफ इण्डिया' (दि ७-११-७७) मध्ये लिहिताना मी म्हटले होते : "I doubt if many people are aware of the geo-political importance of the study of civilization in Central Asia from our point of view. In fact our knowledge about the vast region from the Great Wall of China to the Black Sea or the Caucasus has not advanced much since the days of Sir A. Stein, Von Le Coq or Paul Pelliot.......

In this context, I may invite your readers' attention to a series of research studies dealing with the history, culture and languages of the peoples of the East and Central Asia– I mean the "**Asiastische Forschungen**" published by the fam us publishing house of Otto Harrassowitz of Wiesbaden. The contributors are Mongols, Germans, Belgians and Americans—none from India.

Will some of major universities undertake a series of such publications ?"

विद्यापीठानी गेल्या ७ वर्षात किती प्रतिसाद दिला हे जाणकारांना माहीत आहेच.

शक्य नव्हते.[४]

वेदांत किंवा पुराणांत आर्य बाहेरून आल्याचा पुरावा नाही. आमच्या मनावर युरोपीय मानचित्रकारांनी जो नकाशा कोरून ठेवला आहे त्यामुळे सीता नदी (The Tarim–Yarkad), नीलपर्वत (Zaratshan–Trans–Alai–Tien sham chain) इ. पौराणिक प्राचीन भारताशी संबंध नसलेली स्थळे भारता बाहेरील आहेत असे वाटते.

सारांश, या सर्व विद्वान पंडितांबद्दल आदर असला तरी त्यांच्या वादजंजाळात न पडता, सर्व तत्त्वातीत असलेले, भाषेच्या सोयीच्या दृष्टीने ज्याला 'शिव' (अथवा त्याचे पर्यायशब्द वापरतात) त्याचे स्वरूप व त्याच्या प्राप्तीच्या साधनाला आधारभूत असलेल्या काही प्रमुख दक्षिणमार्गी तत्त्वप्रणाली समजून घेण्याचा हा प्रयत्न आहे. यापैकी एक श्रुतिप्रणीत व उरलेले आगमप्रणीत पण श्रुतिसंमत संप्रदाय आहेत. श्रुतींना 'निगम' ही संज्ञा वापरतात व त्यात उपनिषदांचा समावेश आपोआपच येतो. 'आगम' म्हणजे 'महेश्वरापासून गुरूपरंपरेने आलेले शास्त्र'

**आगमो नाम आ महेश्वराद गुरुपारम्पर्यागतं शास्त्रम् ।**

कौण्डिन्य, पाशुपत सूत्र पृ. ७.

शब्दकल्पद्रमाने 'जे ज्ञान शिवाकडून पार्वतीला प्रथम सांगितले गेले' अशी पौराणिक पार्श्वभूमी व्यक्त करणारी व्याख्या दिली आहे ती अशी:

**आगतं पञ्चवक्त्रात्तु गतं च गिरिजानने ।**
**मतं च वासुदेवस्य तस्मादागममुच्यते ॥** –शब्दकल्पद्रुम १.१६५

आगमांची भाषा पौराणिक संस्कृत आहे. त्यांचा काल निश्चित नाही. काही आगम द्राविडी भाषांमध्ये आहेत. पण संस्कृत आगमापेक्षा त्यात निराळे काही नाही असे सुरेंद्रनाथ दासगुप्तांचे मत आहे (Hist. and Philosophy, II). या आगम ग्रंथातील विद्यापादात त्यांचे तत्त्वज्ञान दिलेले असते. शैव आचार्यांनी त्याचा आधार घेऊन व वेदपरंपरेतील तत्त्वज्ञानाशी त्याचा समन्वय घालून, आगम व निगम यांचा कर्ता भगवान शिव असल्यामुळे त्यातील तत्त्वज्ञानात काही फरक नाही–नव्हे दोन्ही एकच आहेत–असे आपापल्या भाषातून सिद्ध केले आहे. वैष्णव

4. K. C. Varma: "Some Observations on Prof. R. Mortoton Smith's Reply to Prof. P. L. Bhargava's Review of the Dates and Dynasties in Earliest India"— Annals of the Bhandarkar Institute LXIV (1983) pp. 335–7
B. N. Dutta– Man in India, 1936–37, Kedarnath S'astri–– New Light on the Indus Civilization; D. K. Chakrabarti— Indian Studies, past and present Vol. IX, 1968 pp. 343-358.

रामानुजानेही श्रीभाष्यामध्ये वैष्णव आगम व ब्रह्मसूत्रे यांचा मेळ घालून दाखवला आहे. वर उल्लेखलेला श्रुतिप्रणीत संप्रदाय हा लकुलीशप्रणीत 'पाशुपत संप्रदाय' आहे. आगमप्रणीत पण श्रुतींचा आधार असलेले संप्रदाय:

(१) काश्मीरी त्रिक किंवा ईश्वराद्वय वादिमत
(२) द्वैतमतवादी 'सिद्धान्तशैव'
(३) श्रीकण्ठ प्रतिपादित विशिष्टाद्वैतवादी 'शिवाद्वैत'
(४) शक्तिविशिष्टाद्वैतवादी 'वीरशैव' मत

अशा एकूण पाच संप्रदायांचा विचार केला आहे. यापैकी श्रीकंठाने व श्रीपतिपण्डिताने ब्रह्मसूत्रांच्या आधारे आपापली मते–शिवाद्वैत व शक्तिविशिष्टाद्वैत (वीरशैवमत) मांडली आहेत.

निगमा (श्रुति)चे अधिकारी त्रैवर्णिक आहेत पण आगमाचे बाबतीत सर्वांना अधिकार असल्यामुळे आगमावर शैवाचार्यांनी अधिक भर दिला आहे. त्यात त्यांनी आगम व श्रुती यांचा मेळ घातला आहे. त्यांची भूमिका अशी की आगम व श्रुती यांचा कर्ता शिव असून दोन्हीमधील शिकवण वा तत्त्वज्ञान एकच आहे या पाच संप्रदायांपैकी पाशुपत द्वैताद्वैती आहेत. त्रिकसंप्रदाय ईश्वराद्वयवादी असला तरी शांकरमताचा (केवलाद्वैती) नाही. सिद्धान्तशैवमत स्वच्छ द्वैती आहे. श्रीकण्ठाचे शिवाद्वैत विशिष्टाद्वैती असून त्याला रामानुजमतानुयायी म्हणून हिणविणारा श्रीपति पंडित शक्तिविशिष्टाद्वैती म्हणजे श्रीकंठासारखाच. विद्वांसो मत्सरग्रस्ता:। माझ्यासारख्या तिऱ्हाईत वाचकाला रामानुजाचे श्रीभाष्य, श्रीकण्ठाचे ब्रह्ममीमांसाभाष्य व श्रीपतिपंडिताचे श्रीकरभाष्य ही ब्रह्मसूत्रावरील भाष्ये वाचताना त्यांतील सारखेपणामुळें यांच्यासमोर (आज लुप्त झालेले) शिव–विष्णुसंप्रदायातीत केवळ विशिष्टाद्वैताचे विवेचन करणारे भाष्य होते की काय असे वाटू लागते (अर्थात हे केवळ वाटणेच आहे). सर्वदर्शनसंग्रहामध्ये 'रसेश्वरदर्शन' हे शैवदर्शनात घेतले असले तरी ते तत्त्वज्ञानापेक्षा वैद्यक विषयक आहे व 'पाणिनिदर्शन' मुख्यत: व्याकरणाचे तत्त्वज्ञानाशी संबंधित असल्यामुळे येथे घेतले नाही. भगवान् शिवपंचमुखी म्हणून प्रस्तुत ग्रंथांत पाच शैव सांप्रदायांचे विवेचन[१] अशी माझी विचित्र समजूत नाही.

वामाचारी शैव संप्रदायांचा मी विचार न करण्याचे कारण त्यांच्या तत्त्वज्ञानाबद्दल माहिती कमी मिळते. त्यांच्या आचाराबद्दलची माहिती विरोधी भूमिकेतून मिळते. आणि तंत्र आणि शाक्त संप्रदाय यांमध्ये ते आचारद्रष्टचा मिळून जाण्याच्या अवस्थेत आहेत असे वाटले. वामाचारी संप्रदायांवर स्वतंत्र ग्रंथ होण्याइतकी माहिती उपलब्ध असली तरी या ग्रंथात ती गल्लत केली नाही. फक्त माहिती असावी म्हणून कापालिक, कालामुख, हरिहर, मार्तण्डभैरव, अर्धनारीश्वर व

नाथपंथ एवढयांची संक्षिप्त माहिती दिली आहे. त्यांचे तत्त्वज्ञान फारसे उपलब्ध नसले तरी त्यांचा प्राचीन काळापासूनचा अखिल भारतीय प्रसार मूर्तिशास्त्राच्या दृष्टीने विशेष व त्यात आढळणारा समन्वयवाद, कालामुखसंप्रदायाबद्दल सांगी-धांगीवरून रामानुजानी काहीही लिहिले असले, तरी तो दक्षिणमार्गी वेदानुयायी लकुलीशप्रणीत पाशुपत संप्रदाय होता व त्याने वीरशैवमताची पार्श्वभूमी तयार करण्याचे ऐतिहासिक महत्त्वाचे कार्य केले आहे, इ. माहिती सर्वांसमोर असणे जरूर असल्यामुळे ते प्रकरण या पुस्तकात समाविष्ट केले आहे. उपोद्घातात प्राचीन कालापासूनच्या शैवमताचे सिंहावलोकन असून पुढे प्रथम वैदिक (पाशुपत) व नंतर आगमाधिष्ठित संप्रदायाचे ईश्वराद्वयवादी, द्वैती, विशिष्टाद्वैती शक्ति विशिष्टाद्वैती पथांच्या प्रणालीचे विवेचन केले आहे.

या विषयावर साहित्य विपुल आहे. पण एक काटेकोर मर्यादा आखून घेऊन सामान्य वाचकासाठी एका छोटया पुस्तकात देता येईल तेवढी माहिती दिली आहे. 'वागर्थाविव संपृक्तौ' या शब्दात शिवशक्तिसामरस्याचे वर्णन करणाऱ्या महाकवी कालिदादासाची उसनवारी करून मला माझ्या मर्यादेविषयी नम्रपणे म्हणावयाचे आहे.

क्व शैवशासनं गूढं क्व च मन्दा मतिर्मम ।
तितीर्षुर्दुस्तरं मोहाद् भुजाभ्यामस्मि सागरम् ॥

माझ्य समजुतीप्रमाणे अशा स्वरूपाचे ग्रंथ मराठीत कमी आहेत. तरी माझ्या या प्रयत्नाबद्दल काही विधायक सूचना केल्यास मी वाचकांचा आभारी होईन.

ऋणनिर्देश करताना प्रथम मी पुण्याच्या मराठी तत्त्वज्ञान महाकोश मंडळाचे आभार मानतो. त्यांनी हे काम माझ्याकडे सोपविले नसते व मतमं मराठी संचालक प्रा. डॉ. ग. ना. जोशी यांनी असीम सोशिकपणा जर दाखवला नसता, तर या पुस्तकाचे निमित्ताने मला उत्तुंग शैवतत्त्वज्ञानाचे जे दर्शन झाले, ते झाले नसते. दुसरे आभार येथील शिवाजी विद्यापीठ ग्रंथालय व जुन्या दुर्मिळ ग्रंथांनी संपन्न असलेले येथील राजाराम कॉलेजचे ग्रंथालय यांच्या ग्रंथपालांचे, व मैसूर, त्रिवेंद्रम इ. दूरच्या विद्यापीठातील ग्रंथ उपलब्ध करून देणाऱ्या सुहृदांचे. विशेष आभार मी माननीय श्री. वि. स. पागे यांचे मानतो.

प्रस्तुत पुस्तकाचे सुरेख मुद्रण केल्याबद्दल ' गायत्री ' मुद्रक व त्यांचे सहकारी यांचा मी आभारी आहे.

हे निर्गन्ध बिल्वपत्र श्रीगुरुलिंगजंगम ब्रह्मीभूत भाऊसाहेब महाराज निंबर्गीकर यांना विनीत भावाने वाहात आहे.

दिनांक ३ मे १९८७
श्रीमत् शंकराचार्य जयंती

**म. वा. तगारे**
कोल्हापूर

# उपोद्घात

लेखी पुराव्याअभावी संशोधकांचा असा कयास आहे की सिंधुसंस्कृतीच्या उत्खननात सापडलेली कूर्मासनासारखे योगासन घालून बसलेली त्रिमुखी, दोन शिंगे व दोन हात असलेली मूर्ती शिवाची असावी. त्याचा त्रिशूल, बैल व इतर प्राण्यांचा परिवार तो वेदांत वर्णन केलेला 'पशूनां पतिः' रुद्र असावा असे मानले जाते[1]. शाळुंका विरहित काही लिंगसदृश वस्तू (conical and cylindrical stones) सापडल्या पण त्या मृत व्यक्तीच्या स्मरणार्थ असाव्यात. मृताप्रीत्यर्थ अशी लिंगे स्थापण्याची चाल उत्तरकालातही दिसते पण त्यावरून त्याकाळी लिंगपूजा असावी असे म्हणता येत नाही[2]. आणि हे दगड त्या रुद्र मानल्या गेलेल्या योग्याचे प्रतीक मानत होते असा निश्चित पुरावा नाही[3].

---

१. मार्शल–Mohenjodaro and the Indus Civilization I P.52 ff. या योग्याची मुद्रा (Seal) याच पुस्तकात Plate आकृति १७ तसेच भारतीय विद्याभवन Vedic age, Plate Vll Fig. 4 याच मताचे अनुकरण M. S. Vats–Excavations at Harappa; p. 129–30. अन् आता तर सर्व क्रमिक पुस्तकांत हे मत गृहीत धरले आहे.

2. Vedic Age पृ. १९१.

३. उत्थित शिस्न ऊर्ध्वरेतेपण दाखवते. शिवावतार मानला गेलेल्या पाशुपत संप्रदाय प्रवर्तक लकुलीशाच्या मूर्तीमध्ये हाच विशेष स्पष्ट करण्यासाठी उत्थित शिस्न दाखवले जाते.

## वेदकालीन रुद्र संकल्पना

ऐतिहासिक समालोचनाच्या प्रचलित रूढीप्रमाणे प्रथम सिंधुसंस्कृतीतील रुद्रसंकल्पनेचा विचार केल्यावर वेदांत आलेल्या वा विकसित झालेल्या रुद्र-शिव संकल्पनेचा विचार करू. वेदसंहितांचे संरक्षण यज्ञविधीच्या विनियोगासाठी करणाऱ्या पुरोहित वर्गाने त्या मंत्रांचा अर्थ आपल्या दृष्टीने केला असला[४], व त्या तशा विनियोगाचे महत्त्व सांगणाऱ्या कथा जरी ब्राह्मणग्रंथांत रूढ केल्या असल्या, तरी त्या वर्गाने एक प्राचीन वाङ्मय शुद्ध स्वरूपात आमच्यापर्यंत पोचवले आणि आम्हाला प्राचीन भारत-युरोपीय जगाची माहिती उपलब्ध करून दिली याबद्दल त्या वर्गाचे ऋण मान्य करावयास हवे. सर विल्यम जोन्सच्या काळापासून आजपर्यंत पाश्चात्त्य व त्यांच्या खालोखाल पौर्वात्य पंडितांनी जन्मभर खपून वेदविद्येच्या केलेल्या उपासनेमुळे आमच्या संस्कृतीची आम्हाला ओळख झाली व ती करून दिल्याबद्दल या संशोधक वर्गाबद्दल आपण कृतज्ञ राहूच. पण प्रा. डॉ. रा. ना दांडेकरांची 'वेदिक बिब्लिऑग्रफी' चाळताना मला नेहमी वाटते.

**नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम् ।**
**रुद्रस्य तत्त्वं निहितं गुहायाम् ॥**

वेदातला रुद्र हा निरनिराळ्या औद्योगिक कंपन्यांत मॅनेजिंग डायरेक्टर वा संचालक असणाऱ्या आधुनिक उद्योगपतीप्रमाणे सोम, इंद्र, अग्नि, सूर्य इ. देवतांसमवेत अनेकविध उग्र व मंगल कार्ये करणारा देव आहे. त्याचे चारीही वेदांत आलेले संदर्भ व त्यावरील अनुमाने एकत्र केल्यास एक मोठा ग्रंथ होईल ( व रुद्र-शिवावर अनेक संशोधनपर प्रबंध आहेतच. ) पण आमच्या-भारतीय-परंपरेत पुराणे ही वेदांचे 'उपबृंहण' मानली गेली आहेत. त्यामुळे पुराणकालापर्यंतच नव्हे तर आजपर्यंत टिकून राहिलेले रुद्रशिवाचे साहचर्य वा ऐक्य मुख्यतः अग्निदेवतेशी[५]. ( **रुद्रो वा एष तदग्निः**-तै. सं ५.४.३.१) आहे हे लक्षणीय आहे म्हणून मुख्यतः त्या स्वरूपाचा विचार करू. यज्ञसंस्था व अग्निदेवता यांचे अतूट नाते लक्षात घेता यजुर्वेदात अग्नि, रुद्र-शिव यांचे माहात्म्य असणे आवश्यक आहे. उत्तरकालीन सहस्रनामांचे ज्याला पूर्वरूप मानता येईल असे तै. सं. चवथ्या.

---

४. उदा. पाशुपतदर्शन प्रकरणात सायण व कौण्डिन्य यांनी तैत्ति आ. १७·१-५ या मंत्राचे केलेले भिन्न अर्थ.

५. मूर्तिरुपाने हरि-हर, मार्तण्ड-भैरव, अर्धनारीश्वर इ. शिवस्वरूपे आहेतच. पण येथे मी वेदवाङ्मयातील रुद्र-शिवाचा विचार करीत आहे.

कांडाचे पाचवे व सातवे प्रपाठक किंवा 'शतरुद्रीय' म्हणून प्रसिद्ध असलेले वाजसनेयी संहितेचे अध्याय १६ व १८ पाहता, आपल्याला पुराणकालापर्यंत टिकलेले रुद्र–शिवाचे स्वरूप म्हणजे रूप, रंग, कर्तृत्व इ. लक्षात येईल. वैदिक मंत्रद्रष्टचांनी इतर कोणत्याही वैदिक देवतेपेक्षा रुद्र–शिवाचे स्वरूप अधिक स्पष्ट वर्णन केले आहे. उदाहरणार्थ तै. सं. तील रुद्राध्यायातील 'नमक' पाहिले तर रुद्र हा रंगाने तांबडा (**ताम्र**) पिंगटवर्णाचा (**बभ्रु**), आरक्त (**अरुण, विलोहित**) असून निळचा कंठाचा (**नीलग्रीव**), जटाधारी (**कपर्दिन्**), हजारो नेत्रांचा (**सहस्राक्ष**) आहे. त्या हरिकेश देवाने सोन्याची बाहुभूषणें घातलेली असून (**हिरण्यबाहु**) यज्ञोपवीत धारण केले आहे. (**उपवीतिन्**).

रुद्राचा स्वभाव उग्र व शुचि किंवा मंगल असा दुहेरी आहे. त्याच्या एका हातात तीक्ष्ण (**तिग्म**) आयुध आहे तर दुसऱ्या हातात रोगनिवारक औषधी आहेत[६] (ऋ. वे. ८.२९–५). तै. सं. तील रुद्राध्यायात (**नमकात**) त्याच्या वीरवृत्तीचे उग्रदर्शन घडते. तो शेकडो धनुष्ये (**शतधन्वा**) व बाण धारण करणारा (**इषुमत्**) आहे. त्याने चिलखत व शिरस्त्राण धारण केलेले आहे. तो शत्रूकडील वीरांचा नाश करतो (**क्षयद्वीर पूरुषघ्न**) आहे. त्या खवळलेल्या रुद्राचे आयुध आम्हाला वगळू दे[७]. तो वैदिक ऋषी रुद्राला विनवितो: 'हे अत्यंत उदार व मंगल व चांगल्या मनाच्या रुद्रा, तू आपले शस्त्र ठेवून चर्मपरिधान करून आम्हाला कल्याणकारक हो.[८]

रुद्र व अग्नि यांचे ऐक्य त्यांच्या समान विशेषदर्शक अभिधानावरून स्पष्ट होते. अग्नीची जी भव, शर्व, रुद्र इ. आठ नावे आहेत (शत.ब्रा.१.७.३.८) तीच नावे अथर्व १५·५·१–७ मध्ये रुद्राची असून त्या त्या नावांनी आवाहन करून तो

---

६. तसेच :

**या ते रुद्र शिवा तनूः शिवा विश्वाहभेषणी ।**
**शिवा रुद्रस्य भेषजी तया नो मृड जीवसे ॥**

नमक १०·२

७. **परि णो रुद्रस्य हेतिर्वृणक्तु परित्वेषस्य दुर्मतिरघायोः ।**

नमक १०.९

८. **मीढुष्टम शिवतम शिवो नः सुमना भव ।**
**परमे वृक्ष आयुधं निधाय, कृत्तिं वसान आचर पिनाकं बिभ्रदागहि ॥**

नमक १०.१०

सर्व दिशात संरक्षण देतो असे म्हटले आहे. अग्नीची पृथिवी, अंतरीक्ष व द्युलोक ही जी तीन स्थाने आहेत. (ऋ. १०.८८.१०) तीच रुद्राचीही स्थाने आहेत (तै. सं. नमक ११.११). अग्नीच्या निळ्या व निळ्या–तांबड्या ज्वाळा **'नीलग्रीव'** व **'नीललोहित'** ही रुद्राची विशेषणे स्पष्ट करतात. धूमशिखाव्याप्त अग्नि म्हणजे **'कपर्दि'** रुद्र व धूमशिखाविरहित अग्नि म्हणजे **'व्युप्तकेश'** दिसतो.

रुद्र हा यज्ञतत्त्व असलेला अग्नि आहे ही कल्पना ऋग्वेदात, **'गाथपतिं मेधपतिं रुद्रं जलाषभेषजम्'** (ऋ. वे. १.४३.४) तसेच ऋ. वे. (४.३.१, २.१.६, ३.२.५ इ. ठिकाणी तसेच अथर्वात (७.८७.१) मध्ये आढळते.

रुद्राचे पुराण कालापर्यंत यज्ञाग्नीशी साहचर्य कायम राहिले व त्यामानाने सोम, वायु इ. देवतांशी संबंध जरा मागे पडले.

## ब्राह्मण–ग्रंथातील रुद्र

अथर्व वेदातील रुद्राचे उग्र स्वरूप ब्राह्मण ग्रंथातही आढळते. उदाहरणार्थ प्रजापतीला वाटलेल्या कन्येच्या अभिलाषेबद्दल शिक्षा देण्यासाठी सर्व देवांनी आपले उग्रत्व संघटित करून रुद्र निर्माण केला व त्याने प्रजापतीला शिक्षा म्हणून भोसकले (ऐतरेय ब्राह्मण १३.९.१०)

कौषीतकी ब्राह्मणांत (अध्याय ६.१.९) भव, शर्व, पशुपति, उग्र, महादेव, रुद्र, ईशान व अशनि या शिव नावांचे विवरण केले आहे. ऐतरेयाप्रमाणे रुद्राच्या उग्रत्वाचे या ब्राह्मणात प्रदर्शन नाही. पण शतपथ ब्राह्मणात मात्र त्याचे रौद्ररूप व स्वभाव दाखवला आहे. उदा. शत. ब्रा. २.६.२.६ मध्ये रुद्र हा यज्ञकर्त्याचे गोधन हिरावून घेण्यास टपलेला असतो तेव्हा त्याच्या हवीला तूप लावू नये अशी सूचना आहे. जेथे चार रस्ते मिळतात अशी स्थाने रुद्राला आवडतात तेथे त्याचा हविर्भाग द्यावा (शत. ब्रा. २.६.२.७) रुद्राचा हविर्भाग दिल्यानंतर पाठीमागे वळून न पाहता परतावे व पाण्याने आत्मशुद्धी करावी (शत. ब्रा. २.६.२.१८)

यजुर्वेदातील (तैत्ति. सं व वाज. सं) शतरुद्रीयात रुद्राची उग्र व मंगल अशी दोन्ही स्वरूपे वर्णन केली आहेत. तशा स्वरूपाची वर्णने शतपथात असली तरी रुद्राचे उग्रत्व जास्त जाणवते.

यज्ञविधीबद्दल प्रसंगवशात सांगितलेल्या कथा जरी ब्राह्मण ग्रंथात आल्या-तरी यज्ञकाळात झालेल्या वादविवाद–चर्चामधून उदय पावलेल्या उपनिषत्कारांना रुद्राच्या दिव्य, भव्य उदात्त व मंगल स्वरूपाचे दर्शन झाले.

## उपनिषत्कालीन रुद्र

उपनिषत्काल हा भारतीय विचार–विकासाच्या इतिहासातील एक उज्ज्वल कालखंड होता. दीर्घकालीन यज्ञ चालताना येत असलेल्या अडचणी व तदनुषंगिक होणाऱ्या चर्चेतून जे विचारधन बाहेर पडले त्यातील काही भाग उपनिषदांचे रूपाने आपल्यापर्यंत पोचला. त्यातील विचारस्वातंत्र्य–संसार तरून जाण्याला 'यज्ञ' ही नाव 'अदृढ' आहे. (**प्लवा ह्येते अदृढा यज्ञरूपाः** — मुण्डक १.२.७) असा यज्ञसंस्थेवरच हल्ला चढविण्याचे धैर्य–आजच्या काळातसुद्धा विलोभनीय वाटते. या उपनिषद्ग्रंथाचे तीन कालखंड आहेत. त्यापैकी प्राचीन उपनिषदात छांदोग्य (२.२४.१,१०; ३.७.१, ३, ४; ३.१६. ३, ४ ) बृहदारण्यक (१.४.११, १२; २.२.२; ३.९.२,४) वगळता रुद्राचा कुठेच उल्लेख नाही.[९]

## उपनिषत्कालीन रुद्र

छांदोग्यात रुद्रविषयक पुढील माहिती आहे.

'मध्याह्न सवन रुद्रांचे आहे' (२.२४.१.१०); रुद्रांच्या जीवनाश्रयभूत द्वितीय अमृताची उपासना सांगताना 'हे अमृत रुद्र इन्द्रमुखाने पितात पण देव केवळ त्या अमृताला बघूनच तृप्त होतात; जो हे अमृत जाणतो तो रुद्रापैकी एक होऊन इंद्रमुखाने हे अमृत पाहूनच तृप्त होतो. रुद्रांच्या भोगकालाची मर्यादा (वसूंच्या दुप्पट) (३,७. १,३,४); प्राण सर्वांना रडवतात किंवा ओरडावयास लावतात म्हणून प्राण रुद्र आहेत (**प्राणा वाव रुद्रा एते हीद, ँ सर्व, ँ रोदयन्ति**) मी प्राणरूप रुद्रांचे मधून कधीही नष्ट न होवो' अशी प्रार्थना केल्यास मनुष्य निरोगी (**अगदो**) होतो (३.१६.३.४)

बृहदारण्यकात त्याहूनही कमी उल्लेख आहेत. प्रारंभी ब्रह्म एकटे होते. त्याने देवळातील क्षत्रिय–इंद्र, रुद्र इ. निर्माण केले. (पुढे ब्रह्माने) वैश्यजाति निर्माण केली. त्यात वसुगण इ. आहेत (१.४.११,१२); मध्यम प्राणरूप शिशुच्या नेत्रात जी लाल रेषा आहे तिच्याद्वारा रुद्र मध्यम प्राणाशी अनुगत होतो (२.२.२)

पुढे बृहदारण्यकाच्या ३ ऱ्या अध्यायात शाकल्य–याज्ञवल्क्य संवादात: 'रुद्र अकरा आहेत' व 'पुरुषामध्ये जे दहा प्राण (कर्मेंद्रिये व बुद्धींद्रिये-त्यांच्या शक्ती) व अकरावा आत्मा (मन) हेअकरा रुद्र आहेत. ते मृत्युसमयी रडवतात

---

९. केन. २५ मधील उमा हैमवतीचा उल्लेख रुद्राचा मानता येणे कठीण आहे.

म्हणून त्यांना 'रुद्र' म्हटले आहे (**अस्माच्छरीरान्मर्त्यादुत्क्रामन्त्यथ रोदयन्ति, तद्यद् रोदयन्ति तस्माद्रुद्रा इति**) (३·९·२·४)

प्राचीन उपनिषदात रुद्र विषयक एवढीच माहिती आहे.

मध्यकालीन उपनिषद् श्वेताश्वतर हे पाशुपत दर्शनाचा आधार आहे. त्यात रुद्र हा ब्रह्मपर (३·७) व ब्रह्मयोनि (५·६) असे म्हटले असले तरी त्याचा अर्थ 'ब्रह्माहून श्रेष्ठ' असा नसावा. या उपनिषदात सांख्ययोग, व वेदान्त दर्शनातील काही संज्ञा (उदा. प्रधान, माया, प्रकृति) आढळतात. इ एच जॉन्स्टनमते या उपनिषदात सांख्यमताचे सर्वांत प्राचीनरूप आढळते[१०].

श्वेताश्वतर उपनिषदाचे तपशीलवार विवेचन 'पाशुपतदर्शन' या प्रकरणात केले असल्यामुळे येथे एवढाच उल्लेख केला आहे.

श्वेताश्वोत्तरकालीन उपनिषदे तुलनया बरीच अर्वाचीन आहेत व त्यांची शैली प्राचीन उपनिषदांसारखी भासली तरी भाषेचा अर्वाचीनपणा, सांप्रदायिकता व अवैदिक परंपरांचा आढळ (उदा. बौद्ध महायानपंथाचे 'स्वसंवेद्य,' इस्लामी अल्लोपनिषद्[११], अक्कब्बरोपनिषद्, ख्रिस्ती 'ख्रिस्तोपनिषद्') यामुळे ती प्राचीन उपनिषदांपेक्षा वेगळी वाटतात[१२]. त्यापैकी बऱ्याच जुनी वाटणाऱ्या उपनिषदांत शैव दर्शनाबद्दल पुढील माहिती मिळते. उदा. **अथर्वशिर उप.** मध्ये भस्मधारण विधि व पाशुपत व्रत (६७), पशुपाशविमोक्ष (६८); **कैवल्य उप** २·५ व **जाबाल उप** (३) मधील 'शतरुद्रीय माहात्म्य' **मैत्री उप** (७·८) मधील शैवपंथाचे उल्लेख इ.

मुक्तिकोपनिषदात उल्लेखलेल्या उपनिषदांचे आधारे प्रा. कृष्णराव गजेंद्रगडकरांनी लिहिलेल्या 'नव–उपनिषदातील तत्त्वज्ञान' (Neo–upanishadic

---

१०. "Some Sarikhya and Yoga Conepts of the s'vetas'vatara Upanisad" – JRAS, 1930, Pp. 855–74.

११. याचा समावेश 'शाक्तोपनिषदा' मध्ये केला आहे. जगदीश शास्त्री संपादित 'उपनिषत्संग्रह' (मोतीलाल बनारसीदास, दिल्ली १९७०)

१२. रंगराव दिवाकरांनी या परंपरेचे 'भारतीय मनाची सर्जनशीलता' असे कौतुक केले आहे. प्रा. कृष्णराव गजेंद्रगडकरांच्या Neo–Upanishadic Philosophy या पुस्तकाची प्रस्तावना पृ. ६ (भारतीय विद्याभवन–बुक युनिव्हर्सिटी सेरीज)

Philosodhy[13] ) या पुस्तकात (पृ. ४१–४४) शिवाच्या पाच स्वरूपांचे–शिव, रुद्र, पशुपति, सदाशिव आणि महादेव यांचे वर्णन केले आहे.

(१) **शिवस्वरूप** :

सरभोपनिषदात शिवाच्या पौराणिक पराक्रमांचे वर्णन केले असून, तो सच्चिदानंद स्वरूप आहे व त्याच्या अनुग्रहाने साक्षात्कार होतो असे म्हटले आहे. **दक्षिणामूर्ति** उपनिषदात दक्षिणामूर्ति शिवाच्या उपासनेने सर्व कामना पूर्ण होतात असे सांगितले आहे. संसारचक्रातून फक्त शिवच सोडवतो असे **अथर्वशिख उपनिषद्** म्हणते. **शिवोपनिषदात** लिंग हे शिवाचे प्रतीक असून त्याची उपासना कशी करावी याचे मार्गदर्शन आहे.

(२) **रुद्र** :

**जाबालोपनिषदात** याज्ञवल्क्यांनी अंतकाळी ब्रह्मज्ञान होण्यासाठी रुद्रोपासना सांगितली आहे. **नीलरुद्रोपनिषदात** रुद्राचा पराक्रम व कृपाळूपणा सांगितला असून तो योग्यापेक्षा भक्तांना ( अंत्यजानासुद्धा ) दर्शन देतो असे म्हटले आहे. **अव्यक्तोपनिषदात** ब्रह्मदेवाची सृष्टिव्यवस्था चालू ठेवण्यासाठी शिवाने ब्रह्मदेवाला अर्धनारीश्वररूपात दर्शन दिले व ते पुरुष व स्त्री असे विभक्त करून सृष्टिक्रम चालू केला. **अथर्वशिर** उपनिषदात रुद्र व ब्रह्म एकच आहेत व त्याच्या ध्यानाने मोक्षप्राप्ती होते असे सांगितले आहे.

(३) **पशुपति** :

**जाबाल्युपनिषद्** याचा पाशुपतसंप्रदायाशी संबंध वाटतो. सर्व प्राणी हे पशू असून त्यांचा मालक भगवान ईश आहे असे त्यात प्रतिपादन आहे.

(४) **सदाशिव** :

**हंसोपनिषदात** योगमार्गाच्या पायऱ्या ( अवस्था ) वर्णन केल्या असून जीवात्मा शेवटच्या अवस्थेत पोचला की द्वंद्वातीत होतो व सर्वव्यापी एकरूप होतो म्हटले आहे.

(५) **महादेव** :

**भस्मजाबाल** उपनिषदात मदादेव ॐकारस्वरूपी आहे असे सांगून त्याचे पौराणिक वर्णन–भस्मचर्चित अंग, भाळी त्रिपुंड्र इत्यादी असून तो तुरीयावस्थेत

---

१३. Bhavan's Book University Series, Bharatiya Vidya Bhavana, Bombay, 1959

असतो. भक्तिपूर्वक बिल्वपत्रांनी संतुष्ट होऊन सायुज्यता देतो असे म्हटले आहे. शैव संप्रदायाचे विशेष-भस्मधारण, रुद्राक्ष (अक्षमाला) कपाळावर त्रिपुण्ड्र, यज्ञोपवीत इत्यादींचे महत्त्वही भिन्नभिन्न उपनिषदांत काय सांगितले आहे याचा सारांश दिला आहे.

सारांश निरनिराळे शिवोपासनेचे पंथ रूढ झाल्यानंतर आपल्या आचार-विचारांना प्राचीन परंपरेचा आधार आहे हे दाखविण्यासाठी 'उपनिषद्' हे प्राचीन सन्माननीय नाव धारण करून हे लेखन केले गेले हे मान्य. पण अथर्वशिरस, जाबाल, मैत्री यांसारख्या उपनिषदांतून प्राचीन परंपरेचे ( आणि जुन्या भाषेचे ) अवशेष आढळतात त्यामुळे ही उत्तरकालीन उपनिषदेसुद्धा शिवोपासनेच्या दृष्टीने वाचनीय आहेत.

## महाभारतातील रुद्र-शिव

श्रीकृष्णाने महाभारतकालीन घडामोडीत प्रभावीपणे भाग घेतल्यामुळे मभा. (महाभारत) "वैष्णव" असावे असे सकृद्दर्शनी वाटते. पण कौरव व पांडव पक्षांतील प्रमुख व्यक्ती शिवभक्त होत्या व त्यांनी शैव-संप्रदायाचा स्वीकार केला होता असे दिसते. उदा. श्रीकृष्णाने उपमन्यूचे शिष्यत्व स्वीकारून पाशुपतव्रतपालन करून शिवाला प्रसन्न करून घेतले [१४] व त्याच्या कृपेने त्याला सांब हा पुत्र झाला (अनुशासन-अध्याय १४ व १८) यातच उपमन्युकृत शिव सहस्रनाम स्तोत्र (१७) व पराशर, मांडव्य इत्यादी ऋषींनी केलेल्या शिवस्तुती येतात. ( अनु. १८ ) पुढे [१५] (अनु. १६०,१६१) युधिष्ठिराने श्रीकृष्णाला दुर्वासांनी काय ज्ञान दिले हे विचारले असता तो शंकराचे माहात्म्य सांगतो व प्राचीन काळापासून चालत आलेल्या महादेव, महेश्वर, रुद्र इ. शिवाच्या संज्ञांचा अर्थ सांगतो. ही पारंपरिकता (अनु. १६१.४ व १६२.२३ मध्ये) 'शतरुद्रीय' या उल्लेखावरून स्पष्ट होते. दुसरा भारतीय वीर अर्जुन. त्याने उग्र तप करून शिवाकडून पाशुपत अस्त्र मिळविले (वन. अध्याय ३८--४०). अश्वत्थामा रुद्रांशाने उत्पन्न झाला ( आदि ६७.

---

१४. काश्मीरी शैव लेखक कृष्णाला शैव मानतात व भगवद्गीता हा शैवसंप्रदायी ग्रंथ असल्यामुळे त्यातील अवतरणे देतात-

१५. त्याआधी अध्याय १४०-१४५ शंकराने हिमालय भस्म करून पुन्हा पूर्ववत केला व उमेला प्रवृत्तिपर व निवृत्तिपर धर्मांचा उपदेश केला आहे.

★ यातील संदर्भ मभा. ( महाभारता )च्या गोरखपूर आवृत्तीतील (सं. २०१३) आहेत.

७२-७३). गांधारीला शंभर पुत्र होण्याचे वरदान (आदि १०९,१०) व द्रौपदीच्या पूर्वजन्मात पाच पती मिळण्याचा वर ( आदि १६८-६.१५, १९६-१६-३० ), जरासंधाला बलप्राप्ती ( सभा. अ. १४.६४-६५), व्यासांना पुत्रप्राप्ती ( शान्ति-३२३. २७-२९) शिवाच्या कृपेमुळेच झाली. शैवमार्गातील लिंग माहात्म्य, गुरु-भक्तीची आवश्यकता, शिवानुग्रहाने इष्टप्राप्ती मभा. मध्ये ठिकठिकाणी वर्णन केली आहे. शिवस्तुती तर जागोजाग आढळतात. उदा. कृष्णार्जुनांची पाशुपतास्त्र प्राप्तीसाठी स्तुती (द्रोण ८०), त्रिपुरवधासाठी देवर्षींनी केलेली स्तुती (कर्ण ३३. ५५-६२), अश्वत्थाम्याने पांडवशिबिरावर हल्ला करण्यापूर्वी केलेली स्तुती (सौप्तिक ७), उपमन्यूने केलेली शिवस्तुती (अनुशासन १४-१९३ व पुढे) इत्यादी.

## शैवदीक्षेचे वर्णन

उपमन्यूने आपल्यास कशी दीक्षा दिली ते कृष्ण सांगतो : " नंतर ८ व्या दिवशी डोक्याचे मुंडन करून, तुपाने माखून,[१६] हातात दंड व दर्भ घेऊन वल्कले धारण करून व कंबरेस मेखला बांधून घेतलेल्या मलात्या ब्राह्मणाने दीक्षा दिली." (अनुशासन १४. ३७९-८०)

दीक्षेचे महत्त्व शैव मतात (उदा. सिद्धांत शैवमत) आज सुद्धा आहे.

दीक्षा घेतल्यानंतर योगसाधना व तपश्चर्या यावर शैवपंथात भर होता. त्याच पर्वात पुढे १४५ व्या अध्यायात उमा-महेश्वर संवादात अहिंसेवर भर दिसतो. केवळ कृष्ण-उपमन्यु-आख्यानावरून नव्हे तर इतर ठिकाणी शैवपंथीयांनी यज्ञ-यागादी कर्मकांडापेक्षा योग, तपश्चर्या व भक्ती यांचा स्वीकार केल्याचे आढळते. महत्त्वाची गोष्ट अशी की महाभारतात शैव-वैष्णव कलह नाही. मभा. मध्ये लिंगपूजा आहे पण तिचा विचार स्वतंत्र केला आहे.

## शिवपुराणातील शैव पंथ

शिवमाहात्म्यदर्शक कथा, स्तोत्रे इ. सर्व पुराणांत ( तथाकथित वैष्णव व शाक्त पुराणात सुद्धा ) असली तरी शिवमाहात्म्याचे सर्वात विस्तृत विवेचन शिवपुराणात आहे व ते आगमांचे आधारे केले असल्यामुळे त्याला विशेष महत्त्व आहे.

---

१६. इतर पुराणात शिवदीक्षेच्या वर्णनात तुपाने माखल्याचा उल्लेख येत नाही.

शिवपुराण महापुराण मानावे की नाही हा प्रश्न विवाद्य असला,[१७] तरी इतर महापुराणांच्या मानाने त्यात शैवमत व शैव संप्रदायांची चर्चा अधिक आहे. ते महापुराण नसले तरी त्याचा उल्लेख अल्बिरुनीने केला असल्यामुळे[१८] ते ख्रि. श.च्या १० व्या शतकापेक्षा अर्वाचीन नाही. शिवपुराण हा एक ग्रंथ नसून (१) विद्येश्वर, (२) रुद्र, (३) शतरुद्र, (४) कोटिरुद्र, (५) उमा, (६) कैलास, (७) वायवीय या सात संहितांचा तो संग्रह ग्रंथ आहे. यातील वायवीय संहिता व वायुपुराण या दोहांचा वक्ता वायुदेव असला तरी वायुपुराण हे वायवीय संहितेशी संबंध नसलेले पुराण आहे.[१९] इतर पुराणांपेक्षा तुलनया अर्वाचीन असलेल्या या ग्रंथात भिन्नशैवपंथांचे दर्शन होते हा या पुराणाचा विशेष असल्यामुळे मी त्या पंथांचे या पुराणाचे आधारे दिग्दर्शन करीत आहे. सात स्वतंत्र संहितांच्या संयुक्त पुराणातील अनुक्रम न स्वीकारता कालानुक्रमे ज्यांचा आधी विकास झाला असे मानले जाते अशा सांप्रदायाबद्दल शिव पुराणातील वर्णन पाहू.

## कोटिरुद्र संहिता

या संहितेत शांकराद्वैताला जवळचा वाटण्यासारखा मोक्षमार्ग सांगितला आहे. अध्याय ४१ मध्ये मुक्तिनिरूपण करताना (१) सारूप्य (२) सालोक्य (३) सान्निध्य (समीपता) आणि (४) सायुज्य या चार मुक्ती असून यांचा दाता केवल शिवच आहे असे म्हटले आहे (४१.२–४) या खेरीज 'कैवल्य' नावाची पाचवी मुक्ती असून सत्य, ज्ञान अनंत, सच्चिदानंद स्वरूप शिव नामक जे परब्रह्म

---

१७. भागवत, ब्रह्मवैवर्त, कूर्म, लिंग, मार्कंडेय, पद्म, वराह आणि विष्णु या (महा) पुराणांच्या मते 'शिवपुराण' हे महापुराण आहे. पण मत्स्य, नारद व अग्नि या (महा) पुराणांनी दिलेल्या महापुराणांचे यादीत शिवपुराणाचे नाव नाही. अशा बाबतीत 'बहुसंख्य पुराणांचे मत' हा निकष वापरता येत नाही असे विंटरनिट्झनी मागेच कलकत्ता रिव्हयू ( डिसेंबर १९८४.) मध्ये स्पष्ट केले आहे. डॉ. अ. दा. पुसाळकर शिवपुराणाला महापुराण मानत नाहीत. Studies in Epics and Puranas of India, भारतीय विद्याभवन, मुंबई १९६३, पृ. ६८–७३)

१८. Alberuni 's India–Sachar Vol. I, p. 130

१९. अधिक चर्चा माझ्या आगामी वायुपुराणाच्या Ancient Indian Tradition and Mythology या मोतीलाल बनारसीदास दिल्ली या प्रकाशन-संस्थेमार्फत प्रसिद्ध होत असलेल्या ग्रंथमालेत) प्रस्तावनेत करीत आहे.

आहे. त्या शिवस्वरूपाच्या ज्ञानाने किंवा त्याच्या भजनाने ती प्राप्त होते (४१.७–१६) ज्ञानापेक्षा भजन सुकर आहे. भक्ती व ज्ञान हे भिन्न नाहीत. भक्तिविरोधकांना ज्ञान लाभ होणार नाही पण शंभूची भक्ती करणारांना तावडतोब ज्ञान होते.[२०]

४२ व्या अध्यायात आब्रह्मस्तंबपर्यंत (ब्रह्मदेवापासून गवताचे काडीपर्यंत) जे दिसते ते शिव आहे. नानात्व कल्पना (विविधता किंवा निराळेपणाची कल्पना) मिथ्या आहे शिव सृष्टीच्या प्रारंभी, मध्ये व शेवटी (अस्तित्वात) असतो. तो कर्ता, भर्ता, हर्ता, साक्षी व निर्गुण आहे. तो सर्वांचे मूळ कारण आहे. पुरुषासह (समन्वित) प्रकृती त्याच्यापासून निर्माण झाली. विविधतेने नटलेले विश्व (बीजातून वृक्षाप्रमाणे) त्याच्यापासूनच निर्माण होते व त्याच्यातच विलीन होते. अध्याय ४३ मधील 'ज्ञाननिरूपण' जरा शांकरमतासारखे अद्वैतपर आहे. शिवाने इच्छामात्रेकरून विश्व निर्माण केले पण ज्याप्रमाणे आकाशस्थ ज्योती (तारे, चंद्र इ.) सरोवरादिकांच्या जलामध्ये प्रतिबिंबित होतात तसा तो जगापासून अलिप्त आहे. (४३.४–७) शिवदर्शनासाठी वेदान्तमार्गाचा आश्रय करावा (१२) अग्नि प्रत्येक काष्ठात असतो पण तो मंथन करून काढावा लागतो त्याप्रमाणे भक्ति आदी साधन जो करतो त्याला शिवदर्शन होते हे निश्चित (१३–१४) ज्याप्रमाणे माती वा सोने उपाधीमुळे (मातीची निरनिराळ्या आकारांची भांडी, सोन्याचे अलंकार) भिन्न वाटतात (पण मुळात माती व सुवर्ण म्हणून एक असतात.) त्याप्रमाणे शंकर एकच आहे पण भ्रान्तीमुळे नानास्वरूपाचा वाटतो. कार्य व कारण यात वास्तविक भेद नाही. तो भेद केवळ भ्रांतीमुळे भासतो. भ्रांति नष्ट झाली की भेद नष्ट होतो[२१] (१५–१७) बीजातून वृक्ष निर्माण होतो व त्या वृक्षाच्या फळातून परत बीज निर्माण होते त्याप्रमाणे ज्ञानी हा बीजाप्रमाणे आहे. मानव व शिव जरी एक असले तरी अहंकारयुक्त तो मानव अहंकार वियुक्त तो शिव[२२] (२२–२३)

---

२०. विज्ञानं न भवत्येव द्विजा भक्तिविरोधिनः ।
शंभुभक्तिकरस्यैव भवेज्ज्ञानोदयो द्रुतम् ॥

– शिव कोटिरुद्र. ४१.२५

२१. कार्यकारणयोर्भेदो वस्तुतो न प्रवर्तते ।
केवलं भ्रान्तिबुद्धयैव तदभावे स नश्यति ।।

– शिव. ४.४३.१७

२२. साहंकारस्तया जीवस्तन्मुक्तः शंकरः स्वयम् ।
जीवस्तुच्छः कर्मभोगी निर्लिप्तः शंकरो महान् ॥

– शिव. ४.४३.२३

ज्याप्रमाणे सोन्यातील हीणकसामुळे सोन्याची किंमत कमी होते व ते हीण नाहीसे केले म्हणजे त्याला मूळ सोन्याचे मोल येते त्याप्रमाणे जीव सुद्धा 'संस्कृत' झाला की शिव होतो (२४-२५) त्यासाठी प्रथम सद्गुरू मिळवून भक्तिभावाने त्याला शिवस्वरूप मानून उपासना करावी म्हणजे सर्व पापादि मल नाहीसे होऊन तो अहंकार मुक्त होऊन शंकराच्या कृपेने पुन: शिवत्व पावतो. तो जीवनमुक्त होऊन देहपातानंतर शिवाशी एकरूप होतो (२६-३०)

सारांश हा अद्वैत शैवमार्ग व शंकराद्वैत यांत बरेच साम्य दिसते. उदा. ब्रह्म किंवा शिव हे एकमेव सत्य आहे. नानात्व मिथ्या आहे. ही विविधता वा भेद अविद्येमुळे भासतो. कार्यकारणात भेद नाही ब्रह्म प्राप्ती वेदान्ताच्या अभ्यासाने-निदिध्यासाने-मिळते त्याचप्रमाणे शिवाच्या कृपे (अनुग्रहा) मुळें मुक्ती मिळते भक्तीमुळे ज्ञानप्राप्ती होते. भक्तीमुळे प्रेम व भगवत्प्रेमामुळे सत्संग व या संतामधून सद्गुरुप्राप्ती होते व सद्गुरूना शिव मानून उपासना केल्यास पापनाश व ज्ञानप्राप्ती होते.

या मतातील गुरूचे माहात्म्य व शिवाच्या अनुग्रहाची आवश्यकता वगळल्यास हा सांप्रदाय शांकर मतास जवळचा वाटतो.

## शिवपुराण – कैलाससंहिता

शिवपुराणातील ६ व्या (कैलास) संहितेतील १६ व्या अध्यायात 'शिवतत्त्ववर्णन' व १७ व्या अध्यायात 'शिवाद्वैत ज्ञान' आहे. यापैकी शिवतत्त्ववर्णनावर काश्मीरी शैवमताची (ईश्वराद्वयवादाची) छाप आहे हे त्यात वसुबंधूच्या 'शिवसूत्रा'चा उल्लेख करून 'चैतन्यमात्मा' (१-१), 'ज्ञानं बन्धः' (१-२) या सूत्रांची अवतरणे देऊन जे विवेचन केले आहे (शिव. ६-१६-४४-४७) व पुढे 'स्पंद' तत्त्वाचा उल्लेख आहे त्यावरून वाटते. पण पुढे जे 'शिवाद्वैतज्ञान' आहे, ते श्रीकण्ठाच्या ब्रह्ममीमांसा भाष्यातील विशिष्टाद्वैत वाटते असे सुरेंद्रनाथ दासगुप्तांचे मत आहे [२३]

१६ व्या अध्यायाचा उद्देश वामदेवाचे मन 'शिवाद्वैत महाकल्पवृक्ष भूमि' करण्याचा असला [२४] तरी स्कंदाने ते मत सुसूत्र न मांडता पौराणिक पद्धतीने इतर विषयांची मिसळ करून मांडले आहे ते असे.

---

२३. A Hist. ot Indian Philosophy Vol. V. P. 101

(तळटीप २४ पान १३ वर पहा.)

ज्या अर्थी सर्व विश्वातील प्राणिमात्रात स्त्री-पुरुष हा भेद आढळतो, त्या अर्थी त्यांचे मूळ कारणात तसा भेद असला पाहिजे. सांख्यांनी प्रकृति–पुरुष हे विश्वाचे मूळ कारण मानले आहे परब्रह्म सच्चिदानंद स्वरूप नपुंसकलिंगी असले तरी त्यातील सत् (पुरुष, विमर्श, शिव), चित् (स्त्री, प्रकाश, शक्ति) या दोहोमुळे जग निर्माण झाले. परमात्म्यात शिव (सत्) व शक्ति (चित्) नेहमी एकत्र असतात आणि शिव शक्तींच्या संयोगामुळे आनंद निर्माण होतो [२५] हे 'सच्चिदानंद' (ऐत. उप. ५--३) मधील 'प्रज्ञान' हा चैतन्याचा पर्याय असून, 'चैतन्यमात्मा' शिवसू ४, १-१) चा अर्थ विश्वाच्या बाबतीत सर्व ज्ञान–क्रियात्मक जे स्वातंत्र्य (असते) तो ज्याचा स्वभाव आहे असा आत्मा आहे. [२६] या आत्मस्वरूपाच्या ज्ञान व क्रिया यांच्या बद्दलचे मर्यादित ज्ञान म्हणजे 'बन्ध' होय –(१६–४६). ज्ञान व बल पराशक्तीचा पहिला स्पंद असून, ज्ञान, क्रिया व इच्छा हे शंकराचे तीन नेत्र (दृष्टित्रयम्) आहेत. शिवशक्ति समायोग हा परमात्मा आहे व या पराशक्तीपासून अनुक्रमे चित्शक्ति⟶ आनंदशक्ति⟶ इच्छाशक्ति— ज्ञानशक्ति ⟶ क्रियाशक्ति अशा पाच शक्ती निर्माण होतात (५४—५५)

आपल्या इच्छेप्रमाणे जग निर्माण करणाऱ्या महेशाचा पहिला परिस्पंद शिव होय. (७०) शिवापेक्षा आपण व जग भिन्न नाही हे ज्या पशूला (संसारबंधनातील माणसाला) समजले त्याला मोह पडत नाही (७६). कारण पशू हा

---

(तळटीप २४ पान १२ वरून पुढे चालू.)

२४. वामदेवाने स्कंदाला सुस्पष्ट विनंती केली होती.

> उत्पाटयाज्ञानसंभूतं संशयाख्यं विषद्रुमम् ।
> शिवाद्वैतमहाकल्पवृक्षभूमिर्यथा भवेत् ॥
> चित्तं मम यथा देव बोध्यो ऽस्मि कृपया तव ।

शिव. ६.१६. ११ व १२ अ

२५. एवं शिवत्वं शक्तित्वं परमात्मनि दर्शितम् ।
शिवशक्त्योस्तु संयोगादानंदः सततोदितः ॥

शिव ६-१६-३३

२६. चैतन्यमिति विश्वस्य सर्वज्ञानक्रियात्मकम् ।
स्वातंत्र्यं तत्स्वभावो यः स आत्मा परिकीर्तितः ॥

शिव ६. १६. ४५

मायाशक्तीमुळे आपले परमैश्वर्य मर्यादित केलेला शिव आहे. पशूच्या ठिकाणी (कला (किंचित् कर्तृत्व), विद्या (ज्ञान, 'किञ्चित्तत्त्वैकसाधनम्') राग (आसक्ती), काल व नियति (=मी हे कर्तव्य आहे की नाही याची जाणीव)[२७] अशा पाच शक्ती असतात.

अद्वैत शैव वादात द्वैत सहन केले जात नाही. द्वैत हे नश्वर आहे अद्वैत हे श्रेष्ठ व शाश्वत आहे.

शिव पुराणातील या वर्णनावरून काश्मीर शैव मत (त्रिक) श्रीकण्ठाचे विशिष्टाद्वैत मत या दोहोंचे मिश्रण असलेले हे अध्याय निखळ अद्वैत मताचा प्रसारक करीत नाहीत.

शिव पुराणाच्या रुद्रसंहितेत सतीखंडात (अध्याय २३) भक्ति व ज्ञान यात भेद नाही असे सांगून नव विधा भक्तीचे विवेचन केले आहे.

## शिवपुराणातील पाशुपत दर्शन व योग

शिवपुराणात सर्वात तपशीलवार विवेचन पाशुपत दर्शन व पाशुपत योग यांचे आहे. (वायवीय संहिता पूर्वभाग अध्याय संख्या ३५ व उत्तरभाग अध्याय संख्या ४१, पृष्ठे ९४३–१११८ आद्यन्त धरून) पण हे दर्शन लकुलीश पाशुपत दर्शनाप्रमाणे वेद-प्रणीत नसून शैव आगमांवर आधारलेलें आहे[२८] या संहितेतील पाशुपत योग पातंजल योगा पेक्षा थोडा निराळा आहे.[२९] मी येथे आलेल्या पौराणिक पाशुपत दर्शनाची संक्षिप्त रूपरेषा मांडत आहे.

'शिवतत्त्वज्ञान' या शिव-वायवीय १-५ अध्यायात वायु व नैमिष्यारण्यातील मुनी यांच्या संवादात पाशुपत तत्त्वज्ञानाविषयी वायु सांगतो. "पशु, पति व पाश यांचे ज्ञान करून घेऊन त्यावर निष्ठा ठेवल्यास सुख मिळते. कारण दुःख अज्ञानामुळे होते ते ज्ञान झाल्यावर नाहीसे होते. पशु, पाश व पति या अनुक्रमे

---

२७. इदं तु मम कर्तव्यम् इदं नेति नियामिका। नियतिस्यात् शिव.६-१६-८३

२८. शिवागमोक्तं यज्ज्ञानं तदत्र ज्ञानमुच्यते ।।
श्रीकण्ठेन शिवेनोक्तं शिवायै च शिवागमः।
शिवाश्रितानां कारुण्याच्छ्रेयसामेकसाधनम् --शिव. वायवीय २. ७. ३८-३९

२९. सुरेंद्रनाथ दासगुप्ता - हिस्ट्री ऑफ इंडियन फिलॉसॉफी खंड ५ वा पृ. १२३–१२९

अजड जड व (दोहोंचा) नियंत्रक अशा वस्तु (लकुलीशतत्त्वज्ञानात याना 'पदार्थ' ही संज्ञा दिली आहे) आहेत. हे अनुक्रमे 'अक्षर' 'क्षर' (नाशवंत) व 'क्षराक्षरपर' (क्षर व अक्षर यांच्यापलीकडील) आहेत. (सांख्यदर्शनातील) प्रकृति 'क्षर' आहे व पुरुष 'अक्षर' आहे. प्रकृति ही माया असून तिने पुरुषाला वेढले. माया ही माहेश्वरी शक्ती असून मलाने चित् (पुरुष) झाकले गेले आहे. हा मल अनादि पण मोक्षप्राप्तीमुळे सान्त आहे. आपल्या पूर्वकर्मांची परिणती म्हणजे प्रकृति, प्रधान, अव्यक्त ज्या पद्धतीने होती ती कला. कला, विद्या, राग (आसक्ति) काल व नियति ही पुरुषाची पंचकृत्ये आहेत (सांख्य दर्शनातील प्रकृति व या दर्शनातील प्रकृति या थोड्या भिन्न संकल्पना आहेत) [शिव-वायवीय १-५-१० ६०] ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत सर्व पशू असून ते पाशबद्ध होऊन सुखदुःखे भोगतात. व ईश्वराचे प्रेरणेप्रमाणे अगतिकपणे स्वर्गात वा नरकात जातात. उपर्युक्त (७-१. ५-६१-६३)

पुढील म्हणजे ६ वा अध्याय श्वेताश्वतर उपनिषदावर आधारलेला आहे. त्यात इतर उपनिषदातील मंत्र आहेतच. त्या अध्यायात शिव व ब्रह्म यांचे ऐक्य मानून शैवमत उपनिषदातील मंत्रांचे आधारे माडले आहे. शिव ब्रह्माप्रमाणे एकमेवाद्वितीय असला तरी माया ही शिवाची शक्ति असून, तिच्यामुळे विश्व भासते असे म्हटले असले तरी शिव व माया (अविद्या, प्रकृति) यांचे संबंध तितकेसे स्पष्ट मांडले नाहीत. विश्वाचे नियमन करणारा काल हे शिवाचे सामर्थ्य (० ची शक्ती) असली तरी स्वत: शिव कालातीत आहे (शिव ७. १. ७. ७) ईश्वराचे महत्वाचे कार्य पशूंवर अनुग्रह करणे आहे. कर्मवाद मान्य असला तरी अनुग्रहांतहीं शिवाचे इच्छास्वातंत्र्य आहे.[३०] अनुग्रह म्हणजे पशूंच्या कल्याणार्थ शिवाची इच्छा हा निराकार[३१] शिवाचा स्वभाव आहे, मल हा सर्व पशूंच्यामध्ये असला तरी शिव त्यांच्या ठिकाणी व्यापून उरला असल्यामुळे जसजसा मल नाहीसा होतो तसतसे पशूमध्ये अंगभूत शिवत्व वाढत जाते. शिव अकर्ता असला तरी लोहचुंबकाच्या आकर्षणामुळे लोहकणांची हालचाल होऊन त्यांना विशिष्ट आकार येतो त्याप्रमाणे शिवाच्या केवळ अस्तित्वाने जगाचा व्यवहार चालतो. ज्ञान हे परोक्ष व अपरोक्ष असे द्विविध असते. परोक्षज्ञान हेतु वगैरे तर्कशास्त्राधारे होते, पण अपरोक्ष ज्ञान श्रेष्ठप्रतीच्या अनुष्ठानाने प्राप्त होते. अपरोक्ष ज्ञानाशिवाय मोक्ष नाही हे निश्चित (शिव ७-१.३१.९८-१०० पुढे ३३ व्या अध्यायात पशुपतीचे व्रत कसे करावे त्याचे विधान सांगितले आहे.

---

**३०. अनुग्राह्यानपेक्षोऽस्ति न हि कश्चिदनुग्रहः ।**
**अतः स्वातन्त्र्यशब्दार्थाननपेक्षत्वलक्षणः ॥ शिव ७, १, ३१-७**

**३१. शिवाचे निराकारत्व शिव ७, १, ३१.९ व पुढे**

वायवीय संहितेच्या दुसऱ्या भागातील शैवतत्त्वज्ञानात थोडा फरक आहे. भगवान शिव (पति) स्वत:च पशूंना मल, माया इ. अशुद्ध पाशांनी बांधतो. व त्याची जर निटं (सम्यक्) उपासना केली तर सोडवतो.[३२]

सांख्यांच्या २४ तत्त्वांना 'विषय' म्हटले असून हे मायेने (प्रकृतीने) निर्माण केले आहेत. ईश्वरी (शिवाच्या) इच्छे नुरुप हे 'संसारचक्र' चालू असते. प्रकृति व पुरुष यांचा उपयोग घेणाऱ्या शिवाळा उत्तरकालीन उपनिषदाप्रमाणे 'ईशान' म्हटले आहे. पंचमहाभूते आत्मा (जीव), चंद्र व सूर्य या त्याच्या अष्टमूर्ति आहेत रंजल्या गांजल्याना संरक्षण देणे, सर्वांचा उपयोगी पडणे हे ईश्वरी उपासना आहे. सारांश हे जग हे शिवाची शक्ति महादेवी हिच्यापासून झाले असून ती शिवाच्या आधीन असते. किंबहुना शिवा शिवाय शक्ति व शक्ति-शिवाय शिव असूच शकत नाही. प्रकृतीतील गुणसाम्य (equilibrium in sattva, rajas and tamas) बदलले (नाहीसे झाले) की नाद निर्माण होतो व नादापासून बिंदु निर्माण होतो बिंदूपासून सदाशिवाची उत्पत्ती होते; सदाशिवापासून महेश्वर व महेश्वरापासून शुद्ध विद्या निर्माण होते. सारांश शिव-शक्ति समायोगाने शिवाला शक्तिमान् म्हटले आहे. व शक्ति व शक्तिमान् (शक्ति व शिव) यांच्यापासून उत्पन्न झालेले हे जग शाक्त व शैव आहे.[३३] दयाप्रमाणे आईबापाशिवाय पुत्राची उत्पत्ती होत नाही त्याप्रमाणे भव (शिव) व भवानीशिवाय हे चराचर विश्व होऊ शकणार नाही. स्त्री पुरुषापासून झालेले विश्व स्त्रीपुंसात्मक असते.

शैव व पातंजल योगात पारिभाषिकसंज्ञा सारख्या दिसल्यातरी शैव योग पातंजल योगापेक्षा भिन्न आहे. परंतु तो भाग तत्त्वज्ञानात येत नाही.

कूर्म, ब्रह्मांड, वायु इ. पुराणात पाशुपत दर्शन व योग यांची माहिती येते पण सर्वात तपशीलवार चर्चा शिवपुराणात केली असल्यामुळे त्या पुराणाच्या आधारे पुराणांतील रुद्र शिवाची व शैवतत्त्वज्ञानाची चर्चा येथे केली आहे.

---

३२. मल-मायादिभिःपाशैः स बध्नाति पशून् पतिः ।
स एव मोचकस्तेषां भक्त्या सम्यगुपासितः ।। शिव. ७, २. २, १२

३३. एवं शक्ति-समायोगाच्छक्तिमानुच्यते शिवः ।
शक्ति-शक्तिमदुत्थं तु शाक्तं शैवमिदं जगत् ।।

यथा न जायते पुत्रः पितरं मातरं विना ।
तथा भवं भवानीं च विना नैतच्चराचरम् ।
स्त्रीपुंसप्रभवं विश्वं स्त्रीपुंसात्मकमेव च ।। शिव–वायवीय २. ४. ३६–३७

## पुरवणी-टीप

### शिव-लिंग

शैव दर्शनात शिव-लिंग म्हणजे शिव-शिस्न मानत नाहीत. त्यांच्या मते लिंग हे परब्रह्माचे प्रतीक आहे. काल, स्वभाव, नियती इ. कारणांचे ते कारण आहे (श्वेता. १-३) परब्रह्म, सहस्रशीर्षादिसंपन्न विश्वपुरुष व शिव हे श्वेताश्वतर, व महाभारतकाळात एकरूप मानले जाऊन शिवलिंगाचा माथा -सहस्रशीर्ष, खालील बाजू सहस्रपात् व इतर बाजू सहस्रबाहू असे मानण्यात आले असावे असे सी. व्ही. नारायण अय्यर यांनी म्हटले असले, [१] तरी लिंगपुराण अ. १७ मध्ये ब्रह्मदेव व विष्णू यांच्यामध्ये श्रेष्ठ कोण हा तंटा व पुढे युद्ध सुरू झाले तेव्हा अग्निस्वरूप लिंग प्रगट झाले. ब्रह्मदेव व विष्णू यांना त्या लिंगाचा आदी व अंत सापडला नाही अशी कथा आहे. [२]

पुराणे ही वेदांचे उपबृंहणपर असल्यामुळे शिवलिंगाचे अग्निस्वरूप म्हणजे वेदकालापासून रुद्र व अग्नी यांची जी एकरूपता मानली गेली तिचाच पुनरुच्चार ब्रह्मदेव-विष्णुयुद्धाची पार्श्वभूमी सांगून केला आहे. यज्ञकुण्डातील प्रज्वलित अग्नी व शिवलिंग यांच्या आकार-साम्यावरून ही कल्पना सुचली असेल. पण शिवलिंगाची मुद्रा, बैठक, रुद्रन्यासविधि, बिल्वदलमाहात्म्य, संततधाराभिषेक इ. अनेक बाबतीत जेंव्हा यज्ञाग्नीची उपासना व शिवोपासना यात साम्य आढळते [३] तेव्हा शिवोपासना ही यज्ञसंस्थेची कालमानाने सुधारलेली आवृत्ती आहे असे वाटते. पुढे निरनिराळ्या प्रकरणांत लिंगविषयक शैव सांप्रदायांची मते दिली आहेत त्यावरून लिंग = शिस्न हे समीकरण कोणत्याही संप्रदायाला मान्य नाही असे लक्षात येईल. शिवैक्य व शिवदर्शन हे ध्येय मानणाऱ्या शिवभक्तांना ही कल्पनाच करवणार नाही.

---

१. Origin and Early History of S'aivism in South India -पृ-५२

२. हीच कथा इतर पुराणांत उदा. कूर्म १. २६. ६६-९९,

शिव-रुद्रसंहिता, सृष्टिखंड अ ७४५-५० जवळजवळ त्याच शब्दांत आली आहे.

३. श्री. ग. बा. दंडगे यांनी रुद्र, यज्ञ व शिवलिंग पृ. ४-४४ (महाराष्ट्र ग्रंथ भांडार, कोल्हापूर), रूद्राध्याय प्रस्तावना (म. ग्रं. भांडार कोल्हापूर) यज्ञ व लिंग यांच्या उपासनेतील साम्य तपशीलवार दिले आहे.

श्री. दंडगे यांच्याशी कित्येक बाबतींत मी सहमत नसलो तरी त्यांची भूमिका विचारार्ह आहे.

## प्रकरण पहिले

# ल (न) कुलीश–पाशुपत दर्शन

'पाशुपत' संज्ञेचा अर्थ–पाशुपततत्त्वज्ञान विषयक साहित्य-वेदकाल-आरण्यक 'तैत्तिरीय–' श्वेताश्वतर ' उपनिषद्–पाशुपत 'चर्या ' बुद्ध–पूर्वकालीन–आजीवक व पाशुपत–ब्राह्मण्याची अट–ल (न) कुलीशकृत पाशुपतसूत्र– 'लकुलीश' रूप अधिक योग्य–पाशुपतसूत्र व तैत्तिरीय आरण्यक–पाशुपतसूत्रांतील विशेष–हरदत्तकृत गणकारिका–भासर्वज्ञ व रत्नटीका–माधवाचार्यकृत सर्वदर्शन संग्रह–जैन ग्रंथकार व पाशुपत–शंकराचार्यांची ब्रह्मसूत्र २·२·३७ वरील भाष्य लकुलीश पाशुपतांना उद्देशून नाही–लकुलीश पाशुपतमताचा भौगोलिक प्रसार.

### लकुलीश पाशुपत तत्त्वज्ञान

१. पति (कारण) २. पशु (कार्य)–विद्या, ज्ञान–मीमांसा–प्रमाण–कला व सांख्य–पशु–मल–पंचक–मलमुक्ततेसाठी उपाय–३. योग परिशिष्ट योग्याची दिनचर्या– ४. विधि ५. दुःखान्त (मोक्ष) समालोचन.

संक्षिप्ते : पासू – पाशुपत सूत्र. रटी– रत्नटीका

गका – गणकारिका सदसं–सर्व दर्शन संग्रह

## ल (न) कुलीश पाशुपत दर्शन

'पशु' म्हणजे बद्ध जीव[१] व त्यांचा 'पति' म्हणजे पशूंचा निर्माता व रक्षणकर्ता.[२] 'पशूनां पतिः' (तैत्ति. सं. ४·५·२·१; वाजसनेयी सं. १६·१७, मैत्रायणी सं. २.९.३; काठक सं. १७.१२) हे शिवाचे अभिधान असून, त्याला उपर्युक्त संहितांतून नमस्कार केला आहे. 'पशुपति' हे शिवाचे अभिधान आहे· हे **'पशुपतये शिवाय शङ्कराय... स्वाहा'** या आश्वलायन गृह्यसूत्रावरून (२.२.२) स्पष्ट होत आहे. सारांश 'पशुपति' म्हणजे महादेव, त्याने प्रणीत केलेले 'दर्शन' वा 'शास्त्र' ते पाशुपत दर्शन. या दर्शनाचा प्रणेता शिव – श्रीकण्ठ होता, असे महाभारतात, शांतिपर्वात म्हटले आहे.[३] व श्रीकण्ठ हा लकु–लीशाचा मानवी गुरू असावा असे डॉ. रा. गो. भाण्डारकरांना वाटते.[४]

## पाशुपत-तत्त्वज्ञान विषयक साहित्य

पशुपतिरुद्राच्या उपासनेचे प्राचीनत्व कितीही असले तरी तिचे तात्त्विक स्वरूप दाखवणारे वाङ्मयीन पुरावे[५] तै. सं. मधील रुद्राध्याय, वाज. सं. तील शतरुद्रीय यांमध्ये वेदकाळात आढळतात.[६] आरण्यक काळात तैत्तिरीय आरण्यक १७ मध्ये या उपासनेचे स्वरूप अधिक स्पष्ट होते.

विशेषतः तै. आ. १७-१-५ हे पाच मंत्र नकुलीशाच्या पाशुपत सूत्रांच्या

---

**१. साङ्ख्ययोगेन ये मुक्ताः साङ्ख्ययोगेश्वराश्च ये ।**
**ब्रह्मादयस्तिर्यगन्ताः ते सर्वे पशवः स्मृताः ।**
**-- पासू. (पाशुपत सूत्र) कौंडिन्य**
**पंचार्थ भाष्यात उद्धृत.**

लिंगपुराणमते 'ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत सर्व प्राणी पशू होत.
**ब्रह्माद्याःस्थावरान्ताश्च पशवः परिकीर्तिताः ।**

**२. आप्ति पाति च तान् पशूनित्यतः पतिर्भवति ।**
**– कौण्डिन्य, पंचार्थ भाष्य, पृ. ५**

**३. उमापतिर्भूतपतिः श्रीकण्ठो ब्रह्मणः सुतः ।**
**उक्तवानिदमव्यग्रो ज्ञानं पाशुपतं शिवः ।।**
**– म. भा. शान्ति ३४९.६७**

**४. वैष्णविझम् अँड शैविझम्**

५. ऋ. वे. १.११४.९ मध्ये रुद्र 'पशूंचा पालक' (पशुप) आहे एवढेच म्हटले आहे. तै. सं. सारखे तपशीलवार वर्णन नाही.

६. तै. सं. व वाज. सं. मधील बरेच मंत्र समान आहेत. यावरून रुद्रशिवो-पासना तत्कालीन यजुर्वेद–परंपरेत लोकप्रिय असावी.

तत्त्वज्ञानाचा–ईश्वर किंवा 'पति' संकल्पनेचा–मुख्य आधार आहेत.[७] संहिता किंवा आरण्यक कालापेक्षा उपनिषत्–कालामध्ये–मुख्यतः श्वेताश्वतर उपनिषदात–पाशुपत–तत्त्वज्ञानाचे अधिक तपशीलवार विवेचन आहे. श्वेताश्वतर पाणिनि–पूर्वकालीन की उत्तरकालीन हा विवाद्य मुद्दा सोडला तरी ते उपनिषद् सध्याच्या भगवद्गीतेपेक्षा अधिक प्राचीन आहे हे निश्चित. आणि वैष्णव मतात जे भगवद्गीतेला स्थान आहे तसे शैवमतात श्वे. उ. स (श्वेताश्वतर उपनिषदास) आहे.[८] पाशुपतसूत्रांस त्या तत्त्वज्ञानाचा आधार असल्यामुळे त्यातील प्रमुख–संकल्पना पाहू –

१. ईश्वर एक आहे.

यःकारणानि... अधितिष्ठत्येकः – १.३
क्षरात्मानाशवीते देव एकः – १.१०
द्यावाभूमीजनयन् देव एकः – ३.३
देव एकः समावृणोति – ६.१०　　　　इ.

हा एकेश्वरी सिद्धान्त श्वे. उ. मध्ये अनेक ठिकाणी ठासून मांडला आहे. पासू. (पाशुपत सूत्रामध्ये) 'ईश्वर एक आहे' असे म्हणून नकुलीश थांबला नाही तर त्याने इतर देव व पितर यांच्या उपासनेला (श्राद्धकृत्ये इ. ना) बंदी घातली आहे.[९]

२. पासू. मधील 'पति' संकल्पनेसारखाच श्वे. उ मधील ईश्वर सर्व विश्वाचा निर्माता, नियंता, संरक्षक व संहारक आहे[१०] (श्वे. उ. ५.३, ४.९, १.८ इ.) तो विश्वान्तार्यामी व त्याचबरोबर विश्वोत्तर (transcendental) आहे[११] (श्वे. उ. १.१६, ३.११, ३.१३, ५.१३, ३.१४ इ.). हा सर्वव्यापी, सर्वकर्ता

---

७. तपशीलवार विवेचन –'पति'– विभागात पुढे केले आहे.

८. प्रा. डॉ. रा. ना. दाण्डेकर, वैष्णविझम अँड शैविझम पृ. ७२–७३
R. G. Bhandarkar As an Indologist (BORI 1976)
– A Symposium

९. देववत् पितृवच्च । उभयं तु रुद्रे देवाः पितरश्च । पासू. २.१०.११ व त्यावरील कौण्डिन्याचे भाष्य.

१०. श्वे. उ. ५.३ एकैकंजालं बहुधा विकुर्वन्नस्मिन्क्षेत्रे संहरत्येष देवः ।
४.९ अस्मान् मायी सृजते विश्वमेतत् ।
१.८ संयुक्त मेतत्... भरते विश्वमेषः ।

११. श्वे. उ. १.१६ सर्वव्यापिनात्मानं क्षीरे सर्पिरिवार्पितम् ।
३.११ ...सर्वभूतगुहाशयः । सर्वव्यापी स भगवान्... ।
३.१३ ...पुरुषोऽन्तरात्मा सदा जनानां हृदये संन्निविष्टः ।

एकमेवाद्वितीय देव रुद्र (शिव) आहे.[१२] 'तो विश्वनिर्माता विश्वव्यापक शिव आहे. त्याला जाणले असता परम शांति प्राप्त होते.' (श्वे. उ. ४.१४). 'शिव हा सर्व भूतांमध्ये गूढ विश्वव्यापक आहे. त्याला जाणले असता मनुष्य सर्व 'पाशां'तून मुक्त होतो, (श्वे. उ. ४.१६). यावरून ऋग्वेदात नसले तरी उपनिषत्कालात 'शिव' हे रुद्र नाम रूढ झाले होते. तशीच त्याची 'महेश्वर' (श्वे. उ. ६.७), 'भगवत्' (श्वे. उ. ५.४), महान पुरुष (श्वे. उ. ३.८) इ. पासू. मध्ये आलेली अभिधाने आढळतात. श्वे. उ. मध्ये पुरुष सूक्त व शतरुद्रिय यातील मंत्र आढळतात. इतकेच नव्हे तर तैत्तिरीय संहिता व आरण्यकातील संकल्पना त्यात अधिक स्पष्ट मांडल्या आहेत. त्यामुळे तै. सं., तै. आ., श्वे. उ. याकडून आलेली वैदिक परंपरा नकुलीशाने पासू. त ग्रथित केलेली दिसते.

परंतु वरील ग्रंथांवरून पाशुपतांच्या तत्त्वज्ञानाची कल्पना आली तरी 'चर्ये'–ची–व्रतांची कल्पना येत नाही. पाशुपतांचा योगमार्ग प्रणवोपासना–

**स्वदेहमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम् ।**
**ध्याननिर्मथनाभ्यासाद्देवं पश्येन्निगूढवत् ॥ श्वे. उ. १.१४**

या मंत्रात स्पष्ट दिग्दर्शित झाली आहे. पण पाशुपत व्रताचे दुसरे वैशिष्टय म्हणजे आपली निंदा लोकाकरवी करवून आपले पापक्षालन व्हावे याचा वस्तुपाठ म्हणून दारुवनात शिवाने (स्वतः कामशून्य होता तरी) ऋषिकन्या व ऋषिपत्न्यांकडे पाहात कामुक हावभाव केले. (याला 'शृंगारण' ही संज्ञा आहे) व ऋषींच्या शिव्या खाल्ल्या[१३] असे कूर्मपुराणात (२.३९–१५–१७) वर्णन आहे त्याप्रमाणे 'क्राथन', 'शृंगारण', 'अवितद्‌भाषण' हे जे प्रकार पासू. मध्ये दिले आहेत[१४] त्यांचा श्वे. उ. मध्ये उल्लेख नाही. परंतु ते उल्लेख तत्त्वज्ञानात्मक ग्रंथात नाहीत म्हणून त्या काळातील भिक्षु–परंपरेत ते उल्लेख नसतील असे म्हणता येत नाही.

---

१२. श्वे. उ. ३.२ एको हि रुद्रो न द्वितीयाय तस्थुर्य इमाँल्लोकानीशत ईशनीभिः ।

१३. भस्मपाण्डुरदिग्धांगो नग्नो विकृतलक्षणः ।
उल्मूकव्यग्रहस्तश्च रक्त पिंगललोचनः ॥१५॥
क्वचिच्च हसते रौद्रं क्वचिद् गायति विस्मितः ।
क्वचिन्नृत्यति शृंगारी क्वचिद् रौति मुहुर्मुहुः ॥१६॥
आश्रमे ह्यटते भिक्षुर्याचते च पुनः पुनः–

१४. त्यांचे सविस्तर वर्णन पुढे 'योग' व 'द्वार' या उपविभागात दिले आहे.
येन परिभवं गच्छेत् । (पासू. ३.१८), उन्मत्तो मूढो इत्येवं मन्यन्त इतरेजनाः । (पासू. ४.८), निन्द्यमानश्चरेत् (पासू. ४.१४) व त्यावरील कौण्डिन्यभाष्य पाहा.

पासू. (ख्रिस्ताब्द दुसरे शतक) कौण्डिन्यकृत पंचार्थभाष्य' (ख्रिस्ताब्द ४ थे–५ वे शतक) आणि कूर्म व इतर पुराण ग्रंथ (ख्रिस्ताब्द ५ वे ते ९ वे शतक) यामध्ये ज्या अर्थी पापक्षालनाच्या या लोकनिंद्य मार्गाचे वर्णन येते त्या अर्थी तत्पूर्वीच्या ब्राह्मणभिक्षु परंपरेत तो असावा–निदान गौतमबुद्धापूर्वीच्या काळी 'आजीवक' नामक जी कडक वैराग्य पाळणारी भिक्षुपरंपरा होती त्यामध्ये तरी हे प्रकार निश्चित होते. उदाहरणार्थ महावीराचा ज्येष्ठ समकालीन व आजीवकांचा तिसरा व शेवटचा तीर्थंकर 'मंखलि गोसाल' याने आपल्या अखेरच्या दुखण्यात आपल्या अनुयायांचे मार्गदर्शनार्थ–पिणे, गाणे, नाचणे, असंबद्ध बोलणे इ. जे प्रकार केले[१५] ते पासू. मध्ये सांगितलेल्या शृंगारण, अवितत्करण, अवितद्भाषण इ. आचारधर्माप्रमाणे आहेत. मंखलि < मस्करिन् याचा अर्थ पाणिनीने 'बांबूचा दण्ड धारण करणारा परिव्राजक' असा जरी दिला असला तरी तो बाजूला सारून पतंजलीने 'कर्मे करू नका. शांति हीच श्रेयस्कर आहे.' असा उपदेश करणारा परिव्राजक तो 'मस्करिन्' असा अर्थ दिला आहे ( **'न वै मस्करो'स्यास्ति इति मस्करी परिव्राजकः। माकृत कर्माणि शान्तिर्वः श्रेयसीत्याहतो मस्करी परिव्राजकः।**– महाभाष्य (कीलहॉर्न आवृत्ती III पृ. ९३) ). पातंजल महाभाष्य, जैन व आगम पाली आगम जवळ जवळ समकालीन असल्यामुळे पतंजलीने 'मस्करिन्' चा केलेला अर्थ त्याकाळात रूढ असावा.

भगवती सूत्रात जैनांनी जरी आजीवकांबद्दल व मंखलि गोसालाबद्दल पूर्वग्रह दूषित व अनादराने लिहिले असले तरी अंगुत्तर निकायात (III P. 383) श्रेष्ठ बुद्धशिष्य आनंद सांगतो त्यावरून बुद्ध महावीरांचा आणखी एक ज्येष्ठ समकालीन 'पूरण कस्सप' (पूर्ण काश्यप) याच्या मते 'सर्वश्रेष्ठ (परम सुक्क = परमशुक्ल) मानव[1] या वर्गात (आजीवकांच्या तीर्थंकर परंपरेतील) नंदवच्छ, किस–संकिच्च व मक्खलि गोसाल (अर्धमागधी–मंखलि गोसाल) येतात.

आजीवकांच्या 'किसवच्छ' या आचार्याने दण्डकी–राजाच्या कुंभवती नगरीत जाऊन (पाशुपत सूत्रात सांगितल्याप्रमाणे) स्वतःची अपकीर्ती करवून घेण्याचे व्रत स्वीकारले. परिणामतः तेथील नागरिकांनी त्याच्यावर थुंकणे, तुच्छतेने वागवणे वगैरे त्याचा अपमान करण्याचे प्रकार केले. परंतु त्याच्या दहनप्रसंगी

---

१५) भगवती सूत्र 'शत' १५. महावीर व मंखलि गोसाल यांच्या झालेल्या कडाक्याच्या भांडणानंतर ही नोंद झाली आहे. महावीराला प्रथम मंखलि गोसालाबद्दल आदर होता म्हणून तो तपश्चर्येची पहिली ६ वर्षे गोसालाच्या सहवासात राहिला. तपश्चर्येच्या प्रारंभी महावीर सचलेक होता पण दुसऱ्या वर्षी त्याने गोसालाप्रमाणे दिगंबरत्व स्वीकारले. (तसेच ERE मधील हर्न्लेचा आजीवकांवरील लेख पाहा.)

अनेक तपस्वी त्याला आदरांजली वाहण्यासाठी उपस्थित होते व देवांनी स्वर्गातून त्याच्या शरीरावर पुष्पवृष्टी केली असे सरभंग–जातकात सांगितले आहे. (Jataka Tales V p. 125)

डॉ. दे. रा. भांडारकरांच्या मते अशोकाच्या ७ व्या स्तंभलेखात 'बाभनेसु आजीविकेसु' असा ब्राह्मण आजीविकांचा उल्लेख आहे. यावरून लकुलीशापूर्वी ते मत रूढ असावे (मग लकुलीशाचा काळ रा. गो. भांडारकर म्हणतात तसा ख्रिस्तापूर्वी २०० असो वा दे. रा. भांडारकर म्हणतात त्याप्रमाणे ख्रिस्तोत्तर २०० असो. कोणताही काळ मानला तरी अशोकशासने त्यापूर्वी निदान शतक दीडशतक खोदली गेली होती.) आणि असे असेल तर महाभारतात (शांति ३४९.६७) नमूद केलेला श्रीकंठ हा (शिवावतार मानला गेलेला) पाशुपतमताचा पहिला मानवी प्रवर्तक असावा.

आजीवक पाशुपत होते असे मला म्हणावयाचे नाही. काही ब्राह्मण आजीवक असले तरी सर्व आजीवक ब्राह्मण होते असे त्यांच्याबद्दलच्या उल्लेखांवरून वाटत नाही.

(ल) नकुलीशाने केवळ ब्राह्मणांना पाशुपतदीक्षेसाठी पात्र ठरवले असले तरी उपमन्यूने पाशुपतदीक्षा दिलेला वासुदेव कृष्ण (मभा. अनुशासन १४.३७९ व पुढे) ब्राह्मण नव्हता. जैन आचार्य हरिभद्र (ख्रि. श. चे ८ वे शतक) याचे 'षड्दर्शन समुच्चयात' पाशुपतव्रत घेण्यास त्याकाळी ब्राह्मण्याची अट शिथिल झालेली दिसते. पाशुपतांचे 'भरट', 'भक्त', 'लैंगिक', 'तापस' इ. पोटभेदांचा उल्लेख करून तो म्हणतो, "भरटादीनां व्रतग्रहणे ब्राह्मणादिवर्णनियमो नास्ति' (१२६५) त्याचा टीकाकार गुणरत्न तीच वस्तुस्थिती नमूद करतो.

ख्रि. श. चे १४ व्या शतकाचे मध्यास होऊन गेलेल्या राजशेखरसूरि या जैन ग्रंथकाराने आपल्या 'षड्दर्शन–समुच्चयात' अब्राह्मण पाशुपतांचा निर्देश करताना ही दीक्षा घेणारा ब्राह्मणच असला पाहिजे असा निर्बंध नसल्याची समकालीन वस्तुस्थिति नोंदली आहे. तो म्हणतो :

**भरटानां व्रतादाने वर्णव्यक्तिर्न काचन ।**
**यस्य पुनः शिवे भक्तिर्व्रती स भरटो भवेत् ॥**

**– गणकारिका Appenpix III पृ. ३६ वरून उद्धृत**

शक्यता अशी आहे की वेदपरंपरेने आलेल्या पाशुपत–दीक्षेचे अधिकारी ब्राह्मण असावेत व आगमोक्त दीक्षेचा अधिकार अ-ब्राह्मणांना असावा.

### ल (न) कुलीशकृत पाशुपतसूत्र[16]

16 संपादक अनंतकृष्णशास्त्री: पाशुपतसूत्रम् (कौण्डिन्यविरजित पंचार्थ–भाष्यासह त्रिवेंद्रम् १९४०

श्वे. उ. नंतर महत्त्वाचे पुस्तक म्हणजे ल (न) कुलीश– विरचित 'पाशुपतसूत्रम्' या ठिकाणी माधवाने वापरलेल्या 'नकुलीश' या रूपाऐवजी विकल्पाने रूढ असलेले 'लकुलीश' हे रूप मी वापरत आहे. कारण त्याच्या भारतभर पसरलेल्या मूर्ती हातात 'लकुल' (=लकुट 'सोटा') असलेल्या आहेत. पुराणांतून तेच रूप आढळते. लकुलीश हा शिवाचा २८ वा अवतार आहे असे कूर्म पु. १–५३ व शिव पु. वायवीय संहिता २.९.५ मध्ये म्हटले आहे. लकुलीशाचा जन्म कारवाण (तहशील–डभई, जि. बडोदा) येथे विश्वराज नामक एका अत्रिगोत्री अग्निहोत्र्याच्या घराण्यात झाला. तो थोडा मोठा झाल्यावर उज्जैनीला गेला. तेथे ब्रह्मावर्ताहून आलेल्या कुशिक नामक ब्राह्मणास त्याने 'पाशुपतसूत्र' म्हणून प्रसिद्ध असलेली १६८ सूत्रें शिकवली.

(न) लकुलीशाच्या काळाबद्दल मतभेद आहेत. डॉ. रा. गो. भांडारकर तो ख्रिस्तापूर्वी दुसऱ्या शतकात झाला असे मानतात व डॉ. दे. रा. भांडारकर दुसऱ्या चंद्रगुप्ताच्या काळातील मथुरेच्या उत्कीर्ण लेखावरून त्याचा काळ ख्रिस्तोत्तर २ रे शतक ठरवितात (Ep. Indica XXI. 17) विद्वानांचा कल त्याला ख्रिस्तोत्तर २-ऱ्या शतकात मानण्याकडे आहे. पण हा काळ मान्य करण्यात अडचण अशी आहे– हरिभद्रसूरीच्या 'षड्दर्शन समुच्चयात' (गुणरत्न टीकेत), राजशेखरसूरीने (ख्रि. श. १४ वे शतक) आपल्या 'षड्दर्शनसमुच्चया'त लकुलीशापासून त्याचा भाष्यकार राशीकर अथवा कौण्डिन्य याच्यापर्यन्त पुढील गुरुपरंपरा दिली आहे–

(१) नकुलीश, (२) कौशिक, (३) गार्ग्य, (४) मैत्रेय (५) कौरुष (६) ईशान, (७) परगार्ग्य, (८) कपिलाण्ड, (९) मनुष्यक, (१०) कुशिक, (११) अत्रि, (१२) पिंगलाक्ष, (१३) पुष्पक, (१४) बृहदार्य, (१५) अगस्ति, (१६) सन्तान, (१७) कौण्डिन्य अथवा राशीकर व (१८) विद्यागुरू.

या यादीचे महत्त्व असे की भासर्वज्ञाने प्रत्येक पाशुपताने रोज नियमाने या गुरुपरंपरेचे स्मरण करावे असे रत्नटीकेत म्हटले आहे. या यादीत (२) व (१०) या ठिकाणी कौशिक–कुशिक येतात. यापैकी नेमक्या कोणत्या कुशिकाचा उल्लेख मथुरा–उत्कीर्ण लेखात आहे हे निश्चित नाही. अन्तर्गत पुराव्यावरून राशीकर कौण्डिन्याचा काळ ख्रिस्ताब्द ३५० पूर्वीचा दिसतो.[१७] हे जर खरे मानले व २५ वर्षांची एक पिढी मानली तर नकुलीश त्याच्या पूर्वी निदान ४०० वर्षापूर्वी झाला असला पाहिजे. नकुलीशाचा काळ अशाप्रकारे ख्रिस्तापूर्वी २०० वर्षे मानला तर पतंजलीने पाणिनि ५.२.७६ वरील भाष्यात केलेले शिवभागवतांचे उल्लेख, पतं-

---

१७. एस्. व्ही. पाठक– हरिपाद चक्रवर्ती–पाशुपतसूत्रम् प्रस्तावना, पु. ११

जली हा लकुलीश शिष्य होता ही इण्डोनेशियातील परंपरागत माहिती यांचा मेळ बसतो.[१८] लकुलीशाचे कुशिक, गार्ग्य, कौरुष व मैत्र हे चारीही शिष्य ऐतिहासिक पुरुष होते हे त्यांच्या विषयींच्या उत्कीर्ण लेखांतील व इतरत्र आलेल्या उल्लेखांवरून दिसते.[१९]

राशीकर– कौण्डिन्याबद्दल विशेष माहिती मिळत नाही. त्याच्या भाष्याची भाषा पातंजल महाभाष्यासारखी सोपी, ओघवती आहे. शंकराचार्यांच्या काळात जी न्यायघटित भाषा वापरून पूर्वोत्तर पक्ष करण्याची भाष्यपद्धती रूढ झाली तिचा विकास अजून झालेला नव्हता. लकुलीशाच्या त्रोटक सूत्रापेक्षा कौण्डिन्याच्या 'पंचार्थभाष्यावरूनच' आम्हाला तत्कालीन पाशुपत तत्त्वज्ञानाची माहिती मिळू शकते हे त्याचे महत्त्व आहे. मी त्या भाष्याचा पुरेपूर उपयोग करून घेतला आहे.

मोक्षमार्गाचे विवेचन करणाऱ्या या सूत्रग्रंथात लकुलीशाने (१) कारण, (२) कार्य, (३) योग, (४) विधि आणि (५) दुःखान्त या पाच 'अर्थांचे' विवरण केले आहे. यापैकी (१) कारण (पति) व (२) कार्य (पशू) यांनाच 'पदार्थ' (तत्त्व, Metaphysical किंवा Philosophical categories) म्हणता येईल. यापैकी कारण (पति, शिव, ब्रह्म) ही संकल्पना वैदिक (तैत्तिरीय) परंपरेतील आहे. मोक्षप्राप्तीसाठी ब्रह्माचा जप करावा (अत्रेदं ब्रह्म जपेत्) ही सूचना १.३९,२.२१, ३.२०,४.२१ व ५.४१ या पाच ठिकाणी दिलेली आहे आणि या प्रत्येक सूत्रानंतर ब्रह्मसंकल्पना स्पष्ट करण्यासाठी या परिच्छेदात पुढे दिल्याप्रमाणे विशेषणे वापरली आहेत आणि विशेष असा की ही सर्व विशेषणें तैत्तिरीय आरण्यकाच्या महानारायणीय उपनिषदातून (१७.१–५) शब्दशः घेतली आहेत. उदा. १.३९ नंतर ब्रह्मकल्पना स्पष्ट करण्यासाठी पुढील विशेपणे योजली आहेत इतकेच नव्हे तै. आ. १७.१ हा मंत्रच पासू. १–४० ते १–४४ पर्यंत भिन्नसूत्रे म्हणून वापरला आहे. तो मंत्र असा :

**तै. आ. १७.१ सद्योजातं प्रपद्यामि सद्योजाताय वै नमः ।**
**भवे भवे नातिभवे भवस्व मां भवोद्भवाय नमः ॥ १५ ॥**

याच्या आधारावर रचलेंली पासू.

**१.४० सद्योजातं प्रपद्यामि । १.४१ सद्योजाताय वै नमः ।**

---

**१८. एस्. व्ही. पाठक– उपर्युक्त ग्रंथातून उद्धृत पृ. १२**
**१९. उपर्युक्त पृ. १३**

१.४२ भवे भवे नातिभवे । १.४३ भजस्व माम् ।

१.४४ भवोम्द्वः ।

आता तै. आ. १७.२ हा मंत्र व पासू. २.२१ मध्ये ज्या ब्रह्माचा जप करावयास सांगितले ती पासू. २.२२ ते २.२७ अखेरची ब्रह्मविवरणात्मक सूत्रे पाहाः

तै. आ. १७.२ वामदेवाय नमो, ज्येष्ठाय नमः, श्रेष्ठाय नमो, रुद्राय नमः ।
कालाय नमः, कलविकरणाय नमो बलविकरणाय नमो
बलप्रमथनाय नमः, सर्वभूतदमनाय नमो मनोन्मनाय नमः ॥

या मंत्रावर आधारलेली सूत्रेः

पासू. २.२२ वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमो रुद्राय नमः ।
पासू. २.२३ कालाय नमः । पासू. २.२४ कलविकरणाय नमः ।
पासू. २.२५ बलप्रमथनाय नमः । पासू. २.२६ सर्वभूतदमनाय नमः ।
पासू. २.२७ मनोन्मनाय नमः ।

तै. आ. १७.३ व पासू ३.२१–२६
अघोरेभ्योऽथ घोरेभ्यो घोरघोरतरेभ्यः ।
सर्वतः सर्वसर्वेभ्यो नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः ॥

पासू. ३.२१ अघोरेभ्यः । पासू. ३.२२ अथ घोरेभ्यः ।
पासू. ३.२३ घोरघोरतरेभ्यश्च । पासू. ३.२४ सर्वेभ्यः ।
पासू. ३.२५ शर्वसर्वेभ्यः । पासू. ३.२६ नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः ।

४. तै. आ. १७.४ तत्पुरुषाय विद्महे महादेवाय धीमहि ।
तन्नो रुद्रः प्रचोदयात् ॥

पासू. ४.२२ तत्पुरुषाय विद्महे । पासू. ४.२३ महादेवाय धीमहि ।
पासू. ४.२४ तन्नो रुद्रः प्रचोदयात् ।

५. तै. आ. १७.५ व पासू. ५.४२–४७
ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानाम् ।
ब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मा शिवो मे अस्तु ॥

पासू. ५.४२ ईशानः सर्वविद्यानाम् । पासू. ५.४३ ईश्वरः सर्वभूतानाम् ।
पासू. ५.४४ ब्रह्मणोऽधिपतिर्ब्रह्मा । पासू. ५.४५ शिवो मे अस्तु ।
पासू. ५.४६ सदा । पासू. ५.४७ शिवः ।

हा लकुलीश पाशुपत पंथ वेदपरंपरेतून– मुख्यतः तैत्तिरीय परंपरेतून–आला आहे हे दाखवण्यास वरील तैआ. आणि पासू. चे ऐक्यात्म्य पुरे आहे.

सायणाचे मते हे पाच मंत्र शंकराच्या पाच तोंडांचे द्योतक आहेत. त्यातील सद्योजात (१७.१) पश्चिम मुख, वामदेव (१७.२) उत्तरमुख व त्याच्या ज्येष्ठ, श्रेष्ठ, रुद्र, काल, कलविकरण, बलविकरण, बलप्रमथन, सर्वभूतदमन व मनोन्मन या नऊ शक्ती दाखवतात. तैआ. १७.३ मधील अघोर हे दक्षिणमुखाचे नाव असून अघोर, घोर व घोरघोरतर ही त्याची सात्त्विक, राजस व तामस स्वरूपे आहेत. तैआ. १७.४ मधील ईशान हे पूर्वेकडील मुखाचे नाव असून, तैआ. १७.५ मधील ईशान हे 'ऊर्ध्व–वक्त्रा'चे (वरच्या बाजूच्या मुखाचे) नाव आहे.

कौण्डिन्याने दिलेला वरील मंत्रांतील सूत्रांचा अर्थ सायणापेक्षा निराळा आहे हे पुढे स्पष्ट होईलच. कालदृष्टचा कौण्डिन्य (इ. स. चे ४ थे किंवा ५ वे शतक) व नकुलीश (इ. स. चे २ रे शतक किंवा इ. स. पूर्व २ रे शतक) सायणा· पूर्वी निदान ९ शतकापूर्वी होऊन गेले असल्यामुळे वेदपरंपरेत कौण्डिन्याला अभिप्रेत असलेला अर्थच त्या काळी रूढ असण्याची शक्यता आहे. या मंत्रांचा आणखी विशेष म्हणजे हे मंत्र पाशुपत योगाच्या भिन्न–प्रगत अवस्थांत अनुक्रमाने चिंतन करावयाचे असतात. (पाशुपत योग पाहा.)

उदाहरणार्थ प्रथमावस्थेत शिवमंदिरात राहून भस्मस्नान, निर्माल्य धारण, हसित (शिवाप्रमाणे अट्टहास करणे) इ. उपहारांनी (व्रत किंवा नियम यांनी) शिवसेवा करीत असतांना '**सद्योजातं प्रपद्यामि**' इ. (तै. आ. १७.१) चा जप करावयाचा. दुसऱ्या अवस्थेत यम–नियमयुक्त कठोर तप करावयाचे असून इतर देव किंवा पितर यांच्या उपासना न करता अनन्यभावाने शंकराची उपासना करावयाची असते, त्या अवस्थेत "**वामदेवाय नमो ज्येष्ठाय नमो**" इ. (तै. आ. १७.२) चा जप सांगितला आहे. तिसऱ्या अवस्थेत अहंकार व पाप झाडून टाकण्यासाठी इतर लोक जेणेकरून आपला अपमान वा निंदा करतील असे (अंतर्यामी शुद्ध राहून) वर्तन करावे. उदाहरणार्थ वेड्यासारखे केस, दाढी, नखे वाढवून हिंडणे, रूप यौवनसंपन्न स्त्रियांबद्दल (अभिलाषा न बाळगता) कामचेष्टा करणे इ. परंतु निंदा वा अपमानानी मानसिक तोल न घालवता '**अघोरेभ्योऽथ घोरेभ्य**' इ. (तै. आ. १७.३) चा जप करावयाचा. चौथ्या अवस्थेत आपली विद्या व तपस्या गुप्त राखण्यासाठी ओसाड घर किंवा गुहेत राहण्याबरोबर मुद्दाम उन्मत्त किंवा मूढ असल्यासारखे दाखवणे व त्याचबरोबर '**तत्पुरुषाय विद्महे**' इ (तै. आ. १७.४) चा जप सांगितला आहे. याच्याच प्रगत अवस्थेत स्मशानात झाडाखाली किंवा आकाशाखाली रुद्राचे ठिकाणी लक्ष केंद्रीभूत करावयाचे असते. शेवटच्या (पाचव्या)

अवस्थेत '**ईशानःसर्वभूतानाम्**' (तै. आ. १७.५) चा जप सांगितला आहे. यावरून या मंत्रांना लकुलीश पाशुपत दर्शनात किती महत्त्व दिले आहे हे लक्षात येईल.

या त्रोटक पण सुबोध १६८ सूत्रांवरून तत्कालीन पाशुपत सांप्रदायाची पुढील वैशिष्टयें दिसतात.

(१) केवळ दुःखान्त म्हणजे मोक्ष नव्हे. महेश्वरात विलीन होणे म्हणजे अद्वैतवादी मानतात तसा मोक्ष नसतो. जीव किंवा आत्मा त्या अवस्थेत महेश्वरासारखा दृक्शक्ति व क्रियाशक्ति या ऐश्वर्याने संपन्न असतो. यात दुःखमुक्ती येतेच. मोक्षावस्थेत जीव महेश्वराचे समीप पण स्वतःचे स्वतंत्र व्यक्तिमत्त्व राखून असतो.

(२) पाशुपतदर्शनात कैलास किंवा शिवलोक (वैकुंठ इ.) पौराणिक कल्पनेला स्थान नाही.

(३) मनुष्याच्या कर्माप्रमाणे मनुष्याला गती मिळते पण नियतिवाद किंवा कर्मवादाचा प्रभाव नाही. ईश्वरी अनुग्रहाने मलनाश (पापनाश) होऊन मोक्ष (दुःखान्त) प्राप्त होतो. मोक्ष ही मानवी कर्तृत्वापेक्षा ईश्वरी अनुग्रहावर अवलंबून असणारी गती आहे.

(४) ईश्वरी अनुग्रहाचे महत्त्व. माणसाने कितीही सत्कर्मे व तपश्चर्या केली तरी परमेश्वरी कृपेखेरीज दुःखान्त (मोक्ष) [२०] नाही.

(५) पुनर्जन्म कल्पनेचा स्पष्ट उल्लेख नाही.

(६) सगुण–निर्गुण उपासना पद्धतींचा उल्लेख नाही.

(७) केवळ ॐकार जपावर भर. '**ओङकारमभिध्यायीत**' (पासू. ५.२४) सूत्रावर कौण्डिन्याने भाष्यात म्हटले आहे, '**ओङकार एव ध्येयो नान्य इत्यर्थः**" भासर्वज्ञाने गणकारिकावरील आपल्या टीकेत (रत्नटीका पृ. ११) म्हटले आहे·

**दुःखान्तनिमित्त–ध्यानैकविषयत्वम् ओङ्कारत्वम् ।**

(८) मायावादाचा किंवा वेदान्तमताचा किंवा जैन बौद्ध मतांचा उल्लेख नाही.

(९) ग्रंथ संपताना शेवट दाखविण्यासाठी निदान शेवटच्या शब्दाची किंवा शब्दसमूहाची पुनरावृत्ती करतात. उदा. ब्रह्मसूत्राचे शेवटी 'अनावृत्तिः शब्दात्

---

**२० तस्मात् प्रसादात् स दुःखान्तः प्राप्यते, न तु ज्ञान–वैराग्य–धर्मैश्वर्य त्याग-मात्रादित्यर्थः ।**

अनावृत्तिः शब्दात्। अशी पुनरुक्ती असते. या ग्रंथात तसे केले नाही. नुसता 'शिव.' (५.४७) असाच शेवट केलेला आहे.

## हरदत्तकृत गणकारिका [२१] (गका.)

कौण्डिन्यानंतरचा प्रसिद्ध लेखक हरदत्ताचार्य (खि. श.) ८००–९००)त्याने फक्त ८ कारिकांमध्ये पाशुपत शास्त्राचे सर्व विषय सुसूत्र मांडले आहेत. फक्त विषयांचे शीर्षक देऊन ते श्लोकबद्ध (किंवा गाथाबद्ध) करावयाचे ही जुनी भारतीय पद्धत आहे. गुरू प्रत्येक शीर्षकाचे विवेचन करीत व त्या शीर्षकांच्या कारिका शिष्य पाठ करत. उदाहरणार्थ गणकारिकेत पाशुपत योगासंबंधी पुढील ८ पंचके समजून घेण्यास सांगितली आहेत.

आठ पंचके : लाभ, मल, उपाय, देश, अवस्था, विशुद्धि, दीक्षाकारी व बल:

**लाभा मला उपायाश्च देशावस्था विशुद्धया ।**
**दीक्षाकारी बलान्यष्ट पञ्चकास्त्रीणि वृत्तयः ॥ ]**

हे सर्व पारिभाषिक शब्द आहेत. गुरुमुखाने किंवा भासर्वज्ञाच्या यावरील 'रत्नटीका' या विवेचनानेच हे अर्थ स्पष्ट होतात.

उदा. 'लाभ' म्हणजे (पाशुपत मार्गाने) केल्या जाणाऱ्या उपायांचे फळ (**विधीयमान उपाय फलं लाभः ।** ); 'मल' म्हणजे आत्म्याचे ठिकाणी मिथ्याज्ञान, अधर्म, सक्ति (आसक्ति), संगच्युति व पशुत्व हे असलेले दुष्टभाव. [२२] हे या तंत्रात (पाशुपतशास्त्रात) सोडावयाचे असतात.

या कारिकांचे विवेचन पुढे आले आहे. या कारिकांचे वैशिष्टच असे की अवस्थाभेदाचे पायावर यांची एका कोष्टकात मांडणी पुढीलप्रमाणे करता येते. मात्र या सर्व पारिभाषिक संज्ञा असल्यामुळे भासर्वज्ञाचे टीकेवरून यांचा अर्थ स्पष्ट होऊन पाशुपतमार्गाचे आकलन होऊ शकते.

---

२१. सी. डी. दलाल यांनी प्रथम १९२० मध्ये या कारिका भासर्वज्ञाचे भाष्यासह व हरिभद्रकृत षड्दर्शनसमुच्चय, माधवाचे सर्वदर्शनसंग्रह, राजशेखरसूरीचे षड्दर्शनसमुच्चय यातील पाशुपतमतावरील उताऱ्यासह प्रसिद्ध केल्या. त्यात त्यांनी कारवाण–माहात्म्य व विशुद्ध मुनीचेही पाशुपत दर्शनावरील प्रकरणे दिली आहेत.

**२२. मिथ्याज्ञानमधर्मश्च सक्तिहेतुश्च्युतिस्तथा ।**
**पशुत्वमूलं पञ्चैते तन्त्रे हेयाधिकारिकाः ॥ गका ९**

## गणकारिका–पृथक्करण

| गणकारिका | अवस्था | व्यक्त | अव्यक्त | जय | छेद | निष्ठा |
|---|---|---|---|---|---|---|
| ५ अ | भेद | १ | २ | ३ | ४ | ५ |
| ६ ब | लाभ | ज्ञान | तप | (देव) नित्यत्व | (सदैव रुद्रात) स्थिति | सिद्धि |
| ७ | (लाभासाठी) उपाय | वास | चर्या | जप व ध्यान | सदा रुद्र– स्मृति | प्रसाद |
| ८ | मल | मिथ्याज्ञान | अधर्म | सवित-हेतु | च्युति | पशुत्व |
| ४ | (मल) विशुद्ध किंवा शुद्धि | अज्ञाननाश (हानि) | अधर्म-नाश (हानि) | सवित-हेतु– निराकरण (संगकरहानि) | च्युति हानि (निराकरण) | पशुत्व शुद्धि (हानि) |

टीप : कारिका ४ : अज्ञानहान्यधर्मस्य हानिः सङगकरस्यच । च्युतिहानिः पशुत्वस्य शुद्धिः पञ्चविधा स्मृता ।

वानगीदाखल दिलेल्या वरील कोष्टकाच्या आधारभूत कारिका तळटीपेत[२३] आहेत.

### काही पारिभाषिक शब्दांचा थोडा खुलासा :–

अवस्था म्हणजे लाभ प्राप्तीपर्यंत ज्या एका विशिष्ट प्रकाराने (अवस्थान) राहावयाचे ती. (१) व्यक्त– (लोक निंदा स्तुतीबद्दल औदासीन्य दाखवून) भस्म-स्नान, लिंगधारण इ. प्रकटपणे करणे; (२) अव्यक्त– लोकात अज्ञात रीतीने व्रत-

---

२३ ५ अ. व्यक्ताव्यक्तं जयच्छेदो निष्ठा चैवेह पञ्चमी ।

६ ब. ज्ञानं तपोऽथ नित्यत्वं स्थितिः सिद्धिश्च पञ्चमी ।

७. वासश्चर्या जपध्यानं सदा रुद्रस्मृतिस्तथा ।
प्रसादश्चैव लाभानामुपायाः पञ्च निश्चिताः ॥

८. मिथ्याज्ञानमधर्मश्च सक्तिहेतुश्च्युतिस्तथा ।
पशुत्वमूलं पञ्चैते तन्त्रे हेयाधिकारतः ॥

पालन; (३) **जय–** मन व इंद्रियावर ताबा (४) **छेद–**शेवटची अवस्था (**अवसानावस्था**) माधवाने सदसं मध्ये 'दान' पाठ घेतला आहे (५) **निष्ठा–** सर्व साधक व्यवसायातून संपूर्ण निवृत्ति (**अत्यंतोपरमः**) माधवाने– 'महेश्वराचे ठिकाणी अविच्छिन्न भक्ति' (**महेश्वरे सततमविच्छिन्ना भक्तिः**) असा अर्थ घेतला आहे. या अवस्थाभेदाप्रमाणे ही ८ पंचकें मांडून त्यांचा परस्परसंबंध व्यक्त केला आहे. रत्नटीकेत या पारिभाषिक संज्ञा स्पष्ट केल्या आहेत.

## भासर्वज्ञ

गणकारिकेच्या प्रस्तावनेत सी. डी. दलालांनी म्हटल्याप्रमाणे भासर्वज्ञाचे मूळचे नाव 'भाव-सर्वज्ञ' असावे. पाशुपत आचार्यांच्या नावांची सुरुवात 'भाव'ने असे (उदा. भावबृहस्पति, भावशंकर) हे वेरावळ प्रशस्तीवरून (वलभी सं. ८५०) व अचलगड उत्कीर्ण लेख (सं. १३५२) यावरून दिसते. व ते त्याचे खरे नाव होते हे त्याच्या 'न्यायभूषण' या न्यायसारटीकेच्या पुष्पिकेवरून दिसते. त्याने दिङ्.नाग, धर्मकीर्ति इ. बौद्ध नैयायिकांचे खंडन केले यावरून तो मोठा नैयायिक होताच पण गण-कारिकेवर लिहिलेल्या रत्नटीकेवरून तो पाशुपतसांप्रदायिक होता व पाशुपत योगात त्याची प्रगती होती असे दिसते. [२४] त्याने कौण्डिन्य-भाष्याचा सखोल अभ्यास केला होताच पण काही बाबतीत त्याने कौण्डिन्योत्तर काळात पडलेली भर नमूद केली आहे. उदाहरणार्थ : लकुलीश (व कौडिन्य) फक्त ॐकाराचा जप सांगतात, तर भासर्वज्ञ पंचाक्षरी मंत्राचा उल्लेख करतो. नमस्कार करताना लकुलीशापासून राशीकरान्त आचार्य परंपरेला वंदन करावे असे म्हणतो (पृ. १९) भासर्वज्ञाने हरदत्ताच्या संक्षिप्त गणकारिकांचे विस्तृत विवेचन करून पाशुपत तत्त्वज्ञान व विशेषतः त्यांचा परमार्थमार्ग अधिक स्पष्ट केला ही त्याची महत्त्वाची कामगिरी आहे. [२५]

## माधवाचार्यकृत सर्वदर्शनसंग्रह

यानंतर वैदिक परंपरेतील महत्त्वाचा ग्रंथकार सर्वदर्शनसंग्रहकार माधव (ख्रिस्त शकाचे १४ वे शतक). माधवचार्यांनी तीन अवैदिक व बारा वैदिक

---

**२४. गका ७ वरील टीकेत पाशुपतयोगाचे वर्णन करताना तो म्हणतो : इत्याह भगवानाचार्यः स्वामी मम येनाहमज्ञानार्णवाद् उत्तारितः।**

**२५. भासर्वज्ञाच्या न्यायसारावरील टीकेचे महत्त्व सांगताना राजेश्वरसूरि (ख्रि. श. १४ चा मध्य) हा जैन लेखक म्हणतो :**

**न्यायसाराभिधे तर्के टीका अष्टादश स्फुटाः।**

**न्यायभूषणनाम्नी तु टीका तासु प्रसिद्धि भाक्–षड्दर्शनसमुच्चय (शैवमतम्)**

दर्शनांचे तत्त्वज्ञान संक्षिप्तपणे व सुसूत्रपणे मांडून त्यात कोणते दोष आहेत यांचे दिग्दर्शन केले आहे व शेवटी (तेरावे) शांकराद्वैत दर्शनच कसे बुद्धीला पटणारे व सर्वश्रेष्ठ आहे हे दाखवले आहे. वैदिक दर्शनांपैकी (१) नकुलीशपाशुपत (२) शैव (३) प्रत्यभिज्ञा व (४) रसेश्वर ही शैव दर्शने आहेत.[२६] माधवाचार्यांनी 'नकुलीश' हे रूप 'लकुलीश' ऐवजी वापरले आहे. या दर्शनाचा सारांश देताना प्रथम पाशुपत सूत्रावरील कौण्डिन्य भाष्य, हरदत्ताची गणकारिका व त्यावरील भासर्वज्ञाची रत्नटीका आधारास घेतली आहे. सूत्रबद्ध मांडणी, संकल्पना स्पष्ट करणारे समर्पक शब्द यामुळे हे प्रकरण वाचल्यावर (ल)नकुलीश पाशुपत तत्त्वज्ञान ग्रहण होण्यास अडचण वाटत नाही. प्रस्तुत प्रकरणात मी माधवाचार्यांचा आधार अनेक ठिकाणी घेतला आहे.

माधवाचार्यांनी पाशुपतांचे तत्त्वज्ञान व आचारधर्म सांगून त्यांच्या तत्त्वज्ञानाचे इतरापासून विशेषही पुढीलप्रमाणे स्पष्ट केले आहेत.

(१) दुसऱ्या ठिकाणी (सांख्य, योग इ. दर्शनांत) दुःखनिवृत्ति हाच दुःखान्त (मोक्ष) आहे. येथे (या लकुलीश पाशुपत दर्शनात दुःखान्तात दुःखनिवृत्ति तर आहेच पण त्या शिवाय) परमेश्वरी ऐश्वर्याची (ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती) प्राप्ती असते. (२) इतर शास्त्रांत कार्याला (effect) पूर्वी अस्तित्व नसते ते नंतर येते. पण येथे पशु आदि कार्य नित्य मानले आहे. (३) इतर शास्त्रात कारण सापेक्ष असते ( = कार्यकारणभाव म्हणजे कार्याच्या अपेक्षेने जे कारण असते तेच त्याच्या कारणाच्या अपेक्षेने कार्य होते). पण या (पाशुपतशास्त्रात) कारण एकच. तो भगवान होय व तो निरपेक्ष आहे. (४) इतर शास्त्रांत योगाचे फळ कैवल्य (प्रकृतीपासून मुक्त झालेला आत्मा) आहे. पण येथे परमेश्वरी ऐश्वर्य व दुःखान्त हे (पाशुपतयोगाचे) फळ आहे. (५) इतर शास्त्रातील स्वर्गादि फळे पुनरावृत्ति (संसारात पुनर्जन्म) देणारी आहेत. पण येथे परमेश्वराशी समीपता देणारे व पुनरावृत्ति नसणारे (मोक्ष) हेच फळ आहे.[२७]

---

२६. इतर शैवदर्शनांचा त्या त्या प्रकरणात परामर्श घेतला आहे.

२७. हे किती थोडक्यात माधवाचार्यांनी मांडले आहे पाहा :

तथा हि – अन्यत्र दुःखनिवृत्तिरेव दुःखान्तः। इह तु पारमैश्वर्यप्राप्तिश्च। अन्यत्राभूत्वा भावि कार्यम्। इह तु नित्यं पश्वादि। अन्यत्र सापेक्षं कारणम्। इह तु निरपेक्षो भगवानेव। अन्यत्र कैवल्यादिफलको योगः। इह तु पारमैश्वर्यदुःखान्तफलकः। अन्यत्र पुनरावृत्तिरूपस्वर्गादिफलको विधिः। इह पुनरपुनरावृत्तिरूपसामीप्यादिफलकः। – सर्वदर्शनसंग्रह पृ. ७५

## जैन लेखक–हरिभद्र, गुणरत्न व राजशेखर सूरी

स्वत: पाशुपत वा वैदिकधर्मानुयायी नसले तरी आपल्या समकालीन पाशुपतांची जीवनपद्धती व काही अंशी तत्त्वज्ञान यांची माहिती हरिभद्रसूरी (ख्रि. श. चे ८ वे शतक) व त्याचा टीकाकार गुणरत्न सूरी आणि राजशेखर सूरी (ख्रि. श. १३००–१३५० चे सुमारास) या जैन ग्रंथकारांनी दिली आहे.

आचार्य हरिभद्राच्या षड्दर्शनसमुच्चयावरील[२८] टीकेत गुणरत्न लिहितो :

प्रथमत: नैयायिकांची (अथवा यौगांची) आचार पद्धति सांगतो. ते दण्ड धारण करतात. मोठे (प्रौढ) कौपीन घालतात व कांबळे पांघरतात. ते जटाधारी, भस्म चोपडलेले व यज्ञोपवीत धारण करणारे असतात. ते कमण्डलुधारक आहेत. त्यांचा आहार नीरस असतो. ते बहुधा वनात झाडाखाली राहून कंदमुळांचा आहार घेतात. ते आतिथ्यशील असतात. काही सपत्नीक असतात पण त्यांच्यापैकी जे श्रेष्ठ आहेत ते एकटे (निस्त्रीक) राहतात. ते पंचाग्निसाधन कटाक्षाने करतात (**पंचाग्निसाधनपरा:**). **ते हात (दंड), जटा इ. ठिकाणी प्राणलिंग धारण करतात.**[२९] उत्तम अशी संयमावस्था प्राप्त झालेले नग्न हिंडतात. सकाळी शौचमुखमार्जन झाल्यावर तीन त्रिकाळ अंगाला भस्म लावून शिवध्यान करतात. यजमान हात जोडून त्यांना 'ॐ नम: शिवाय' म्हणतो तेव्हां गुरू 'नम: शिवाय' असे उत्तरादाखल म्हणतात.

त्यांचा ईश्वर सर्वज्ञ, सृष्टीचे (उत्पत्ति-स्थिति) संहार करणारा आहे. त्याचे अठरा अवतार [३०] आहेत. ते असे : (१) नकुलीश, (२) कौशिक, (३) गार्ग्य, (४) मैत्र्य, (५) कौरुष, (६) ईशान, (७) पारगार्ग्य, (८) कपिलाण्ड,

---

२८. **हरिभद्रसूरिविरचित – षड्दर्शनसमुच्चय, भारतीय ज्ञानपीठ, १९७०,** **पृ. ७६–७८.**

२९. **या वरून लिंगधारणाची प्रथा बसवपूर्वकाळी रूढ होती हे स्पष्ट होते.**

३०. कूर्म, शिव इ. पुराणात शिवाचे २८ अवतार दिलेले आहेत. परंतु या जैन ग्रंथकाराला ती कल्पना दिसत नाही. (न) लकुलीश (या पुराणमताप्रमाणे शिवावतार असलेल्या) मूळ गुरूपासून विद्यागुरूपर्यंत जी १८ पाशुपत आचार्यांची परंपरा झाली तेच शिवाचे 'अवतार' मानून तेच त्यांचे पूज्य तीर्थंकर (तीर्थेश) आहेत असे गुणरत्नाचे मत दिसते.

(९) मनुष्यक, (१०) कुशिक, (११) अत्रि, (१२) पिंगल (पिंगलाक्ष), (१३) पुष्पक, (१४) बृहदार्य (बृद्धाचार्य) (१५) अगस्ति, (१६) संतान, (१७) राशीकर, (१८) विद्यागुरू हे त्यांचे तीर्थेश. त्यांना ते पूजनीय मानतात.

पाशुपतांच्या सर्व तीर्थांचे ठिकाणी 'भरट' च पुजारी असतात.

असेच बाह्यवेष (लिंग) देव इ. वैशेषिकांचे आहेत. वैशेषिक व नैयायिकात प्रमाण, तत्त्व इ. च्या संख्येत फरक असला तरी तसा फारसा तात्त्विक मतभेद नाही. दोघेही (वैशेषिक व नैयायिक) तपस्वी असले तरी आचारभेदामुळे त्यांच्यात (१) शैव, (२) पाशुपत, (३) महाव्रतधर व (४) कालमुख असे चार प्रमुख भेद आहेत. त्यांच्यामध्ये 'भरट', 'भक्त', 'लैंगिक' 'तापस' इत्यादि अंतर्भेद आहेत. 'भरट' वगैरेंची व्रते घेण्याला ब्राह्मण असायला पाहिजे असा नियम नाही. ज्याची शिवाचे ठिकाणी भक्ती आहे तो भरटादि व्रते घेऊ शकतो. परंतु शास्त्रामध्ये नेहमी नैयायिकांना 'शैव' व वैशेषिकांना "पाशुपत" म्हणतात व नैयायिकशास्त्राला (दर्शनाला) "शैव" म्हणतात व वैशेषिक दर्शनाला 'पाशुपत' म्हणतात.

हे मी जसे ऐकले व जसे पाहिले तसे येथे सांगत आहे (**इदं मया यथाश्रुतं यथादृष्टं चात्राभिदधे**) या पेक्षा अधिक माहिती त्यांच्या ग्रंथावरून मिळवावी.

(या नंतर त्याने प्रमुख नैयायिक व वैशेषिक दर्शनावरील प्रमुख ग्रंथांची यादी दिली आहे.)

राजशेखरसूरीने आपल्या 'षड्दर्शनसमुच्चयात' वरील प्रमाणेच माहिती दिली आहे. गुरुपरंपरेच्या नावात (१२) पिंगलाक्ष व (१४) बृहदाचार्य असे किरकोळ फरक आहेत. त्याने विशेष म्हणजे न्याय – वैशेषिकांची मोक्षसंकल्पना म्हणजे दुःखांत आहे असे स्पष्ट म्हटले आहे.

**आत्यन्तिकस्तु दुःखानां वियोगो मोक्ष उच्चते।**

यावरून हे पाशुपत लकुलीश-पाशुपताहून भिन्न असावेत असे दिसते. कौण्डिन्य भाष्यावरूनसुद्धा लकुलीश पाशुपतमतापेक्षा दुसरे (ईश्वर निमित्तकारण मानणारे) मत असावे असे दिसते. अर्थात् ते लकुलीशापेक्षा अधिक प्राचीन असावे.

(न) लकुलीश पाशुपत मतात ईश्वर किंवा पति हा उपादान कारण व निमित्तकारण असल्यामुळे 'पत्युरसामञ्जस्यात्' हे ब्रह्मसूत्र (२. २. ३७) हे त्या पाशुपतमताला उद्देशून नसावे. त्याचप्रमाणे त्यावरील शांकरभाष्य "माहेश्वर

ज्याला पशुपति म्हणतात .. तो 'पशुपति ' ईश्वर (जगाचे केवळ) निमित्त कारण आहे असे ते वर्णन करतात"[३१] इ. टीका लकुलीश पाशुपत मताला उद्देशून नाही हे स्पष्ट होते. भामती व रत्नप्रभा सुद्धा याबाबतीत स्पष्ट आहे. त्यामुळे ही टीका लकुलीश पाशुपत मताला उद्देशून आहे असे म्हणणे अवाजवी ठरेल.

## भौगोलिक प्रसार[३२]

भौगोलिक दृष्टचा या संप्रदायाचा प्रसार भारताच्या अनेक प्रान्तात आढळतो. लकुलीशाचा जन्म गुजरातमध्ये कारवाण येथे व तो धर्मप्रसारार्थ उज्जैनला (मध्यप्रदेशात) गेला व त्याला कुशिक, गार्ग्य इ. शिष्य होते हा उल्लेख मागे आलाच आहे. यांपैकी कुशिकाच्या शिष्यपरंपरेचा टप्पा चंद्रगुप्ताच्या मथुरा उत्कीर्ण लेखात व वि. सं १०२८ (खि. श ९७८) मधील नरवाहनाच्या (राजस्थानातील) उदयपूर शिलालेखात उल्लेख येतात. गार्ग्यांचा शिष्यपरंपरेचा (तपोराशि, वाल्मीकि राशि इ.) व लाट (दक्षिण गुजरात), केदार, प्रयाग, श्रीपर्वत (आंध्र), रामेश्वर ही पाशुपत केंद्रे असल्याचे उल्लेख शार्ङगदेवाच्या (इ. स. १२७४–९६) सिव्रा प्रशस्तीन (Ep. Ind. p 282) आहेत. युवानच्वांग (खिश ६२९–६४५) या चिनीप्रवाशाला पाशुपत (Po–shu–po–lo) क्षेत्रे पुढील ठिकाणी आढळले. जालंधर, अहिच्छत्र, मलकूट (केरळ), माळवा, महेश्वर, खोतान. बिहारमध्ये खि. श. ९–१० शतकातील लकुलीश मंदिरे सिंधभूम जिल्ह्यात आहेत. आसाममधील इंद्रपालाच्या (इ. स. ११ वे शतक) ताम्रपटात **'जयति पशुपतिः प्रजाधिनाथः'** म्हटले आहे. यावरून त्या भागात पशुपतीचे माहात्म्य होते. नेपाळमधील पशुपतिनाथाचे मंदीर अशोक मौर्याचे काळापासूनचे असून अशोक-कन्या चारुमतीने तेथे यात्रेसाठी जाऊन पूजा केल्याची कथा आहे. ओरिसामध्ये लकुलीश व त्याच्या शिष्यांच्या सुरेख मूर्ति परशुरामेश्वर (पराशरेश्वर) (इ. स. ७५० चे सुमारास), कपिलेश्वर, मुक्तेश्वर (इ. स. ९५० चे सुमारास) इ. भुवनेश्वरातील मंदिरात असल्याचे के. सी. पाणिग्रहिनी **'आर्केऑलॉजिकल रिमेन्स ॲट भुवनेश्वर'** मध्ये नमूद केले आहे. दक्षिण भारतात पाशुपतमताचे पुनरुज्जीवन करण्यासाठीं लकु-

---

**३१. माहेश्वरास्तु मन्यन्ते... पशुपतिरीश्वरो निमित्तकारणमिति वर्णयन्ति। ब्रह्मसूत्र – शांकरभाष्य (रत्नप्रभा – भामती–आनन्दगिरीय व्याख्यात्रयोपेत) धूपकर – बाक्रेसंपादित, निर्णयसागर, (१९०४), पृ. ४८८.**

३२. यातील काही संदर्भ Pranabanand Jash कृत Hiostory of s'aivism पृ. ३५–४९ मधील आहेत.

लीशाने 'चल्लुक' अवतार धारण केला असे हेमवती उत्कीर्ण लेखात म्हटले आहे. (JBBRAS XXII, p.101) कालामुख हे ब्राह्मण पाशुपत लिंगपूजक मठसंस्थापक व विद्यादान करणारे होते (रा. गो. भांडारकर, वैष्णविझ्म अँड शैविझम्, पृ. १७१). महाराष्ट्रात एलेफंटा (मुंबईजवळच्या) लेण्यांतील मूर्ति (relief–paneis) लकुलीश पाशुपताशी संबंधित आहेत (Charles D. Collins: Elephanta and the Ritual of Lakulis'a Pas'upata—JAOS 102-4 (Oct–Dec. 1982) Pp 605–617.

सारांश वेदकालापासूनची प्राचीन परंपरा असलेला व अखिल भारतात पसरलेला हा महत्त्वाचा संप्रदाय आहे. याचे वैदिक व अवैदिक असे दोन भाग मानले तर अवैदिक पाशुपत तत्त्वज्ञानाचे फारसे साहित्य उपलब्ध नाही व त्यांच्यामध्ये वामाचार शिरल्यामुळे त्यांच्या आचारधर्माची घृणास्पद उदाहरणे संस्कृत साहित्यात आढळतात.

शैव तत्त्वज्ञानाच्या पुस्तकात आचारधर्मापेक्षा विचारप्रणालीला जास्त महत्त्व असल्यामुळे मागे वर्णन केलेल्या पाशुपत साहित्यातील पति (कारण), पशु (कार्य), योग, विधि व दुःखान्त या पाच 'अर्थांचा' येथे विचार केलेला आहे.

## पति

या दर्शनामध्ये भगवान् शिवाला 'पति' म्हटले आहे. सांख्ययोगाने मुक्त झालेले योगेश्वर, ब्रह्मदेव या पासून तिर्यंग्योनीतील प्राण्यापर्यंत (लिंगपुराणमते 'स्थावरा'पर्यंत) सर्व जीव बद्ध 'पशु' आहेत.[३३] शिव या पशूंची निर्मिती व संरक्षण करीत असल्यामुळे त्याला 'पति' म्हटले आहे.[३४] तो आपल्या सर्वव्यापित्वामुळे (विभुशक्त्या) आणि अनंत व अपरिमित असलेल्या ज्ञानशक्तीने (विप्रत्वाने-पासू. ५·२७) सर्वांचे रक्षण करतो. पशूंची आवड-निवड ('प्रवृत्ति-निवृत्ति') अस्तित्व (स्थिति), त्यांना इष्ट वा अनिष्ट असणारे लोक किंवा स्थान, शरीर, इंद्रियें व विषय त्याच्या (शिवाच्या) इच्छेवर अवलंबून असतात.[३५]

---

३३. साङ्ख्ययोगेन ये मुक्ताः साङ्ख्ययोगेश्वराश्च ये ।
ब्रह्मादयस्तिर्यगन्ताः सर्वे ते ते पशवः स्मृताः ।। पासू. पृ. ५
—कौण्डिन्य पञ्चार्थभाष्य उद्धृत,

३४. आप्ति पाति च तान् । पशूनित्यतः पतिर्भवति । कौण्डिन्य, पं. भा. पृ. ५

३५. तच्छन्दात् तेषां प्रवृत्तिनिवृत्तिः स्थितिरिष्टानिष्टस्थानशरीरेन्द्रिय विषयादिप्राप्तिर्भवति । पासू. कौण्डिण्य पृ. ५

इतकेच नव्हे तर ज्ञान, वैराग्य, धर्म, ऐश्वर्यत्याग इ. मुळे मोक्षप्राप्ती होत नसून त्याच्याच कृपेमुळे केवळ होते.[३६] तो नित्य, अविनाशी (**सत्**) असून त्याचे नित्यत्व मोक्षासारखे सादि (आरंभ असलेले) नसून अनादि (आद्य) आहे. सांख्य व योग या मतांतील पुरुष सुद्धा अनादि व नित्य असतो तसा शिव नाही, कारण त्याला सांख्यमतातील पुरुषाप्रमाणे जन्ममृत्यू नाहीत.[३७] तो **अजात** आहे. शिवाच्या '**सद्योजात**' या विशेषणाचे कौण्डिन्याने दिलेले हे विवरण सायणाच्या तै. आ. १७·१ मधील '**सद्योजात**' या संज्ञेच्या अर्थापेक्षा भिन्न आहे. सायणमते '**सद्योजात**' हे शंकराच्या पाच मुखांपैकी पश्चिकडील मुखाचे नाव आहे व तसे मुख असणाऱ्या परमेश्वराला (**तद्रूपं परमेश्वरम्**) वंदन असो असे सायण म्हणतो. पण '**सद्योजात**' मध्ये पतीचे (ब्रह्माचे) सत्त्व, आद्यत्व व अजातत्व हे विशेष येतात असे लकुलीशाचे मत आहे.

भासर्वज्ञांनी गका (गणकारिका) ६ वरील रटी (रत्नटीकेत) (पृ. ११) 'पति' संकल्पना स्पष्ट करताना निरतिशय दृक्शक्ति व क्रियाशक्ति म्हणजे पतित्व; या शक्तींशी (ऐश्वर्याशी) नित्य संबंध असणे म्हणजे 'सत्त्व' हे ऐश्वर्य प्रथमपासूनच असणे (**अनागन्तुकैश्वर्यत्वम्**) म्हणजे 'आद्यत्व' व अनादित्वामुळे **समस्तजन्मरहितत्व** हे त्याचे '**अजातत्व**' होय. असे म्हटले आहे. तो विश्वाचे निमित्त कारण व उपादान कारण आहे. विद्या, कला व पशू (देव, मनुष्य, तिर्यग्योनीतील प्राणी) ही कार्ये असून शिव या कार्यांची उत्पत्ती, स्थिति व लय (**उत्पत्त्यनुग्रहतिरोभाव**) आपल्या इच्छेप्रमाणे अनेकदा करतो. या कार्यांचे पलिकडे जाऊन ज्यांना मोक्षप्राप्ती हवी असेल त्यांनी त्याला शरण जावे. विद्या, कला व पशू निर्माण करणारा व संहार करणारा **भवोद्भव**, असा तो (शिव) शरणार्थीला मोक्ष देतो (रटी. पृ. ११) तो सर्वश्रेष्ठ (**वाम**) आहे. विद्या, कला व पशू यांचे हे विश्व आपल्या लहरीप्रमाणे निर्माण करणे, अनुग्रह (पालन) करणे व त्याचा संहार (तिरोधान) करणे ही त्याची क्रीडा असल्यामुळे त्याला **देव**[३८] (दिव्–क्रीडा करणे) म्हणतात. तो सिद्ध, साधक व पशू यांच्या

---

३६. **तस्मात् प्रसादात् स दुःखान्तः प्राप्यते । न तु ज्ञानवैराग्यधर्मैश्वर्यत्यागमात्रात् । पासू. पृ. ६**

३७. **या बाबतीत कौण्डिन्याने सांख्य मत नीट समजून घेतलेले दिसत नाही.**

३८. **क्रीडावानेव स भगवान् विद्या-कला-पशु-संज्ञकं त्रिविधमपि कार्यमुत्पादयन् अनुगृह्णाति तिरोभावयति चेत्यतो देवः । पासू. पृ. ५६**

**स्वेच्छयैवाशेषकार्योत्पत्त्यादिकारणस्वभावः क्रीडा, तद्धर्मित्वं देवत्वम् ।**
**रटी. पृ. ११**

अतीत व अत एव श्रेष्ठ आहे. स्वभावतः त्याची ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति सर्वश्रेष्ठ आहे म्हणून त्याला 'ज्येष्ठ'[३९] म्हणतात. वाईट कृत्याबद्दल तो पशूंचे मध्ये दरारा उत्पन्न करतो व त्यांच्या कर्मानुसार त्यांना पापपुण्य देतो म्हणून त्याला 'रुद्र'[४०] म्हणतात.

तो ह्या सर्व विश्वाचा–' ब्रह्मदेवापासून भूर्जवृक्षापर्यंत ' सर्व चराचर वस्तु–प्राणिमात्र–यांचा संहार करतो म्हणून त्याला 'काल' म्हणतात[४१] कौण्डिन्याचे शब्दात: 'काल्य' म्हणजे क्षेत्रज्ञ. तो चतुर्दश भुवनातील काल्यांचा (पशूंचा = जीवांचा) कला, शरीर, इंद्रिय, विषय यांच्यापासून वियोग करतो म्हणून त्याला काल म्हणतात.

'कला' म्हणजे पंचमहाभूतात्मक 'कार्य' व इंद्रियांपासून मन, बुद्धि, अहंकारापर्यंतचे 'कारण.' या 'कार्य' व 'करण' यांचे क्षेत्रज्ञाशी संयोजन शिव

---

३९. (सिद्ध–साधक–पशूंना. . . .च) प्रवृत्ति–निवृत्ति–स्थित्यादि–फलानाम्
इत्यतो ज्येष्ठः परतरः । परतमश्चेति । अकृतकं चास्यैश्वर्यम्–
दृक्क्रिया–लक्षणा शक्तिस्तत्त्वधर्मोऽस्य नित्यता ।।
श्रेष्ठोऽतः सर्वभूतेषु तस्मादेष परः स्मृतः ।। पासू. पृ. ५७
सिद्ध-साधक-पशुभ्यः परत्वं ज्येष्ठत्वम् । रटी. पृ. ११

४०. वस्तुतः रुद्– पासून 'रुद्र' हे रूप झाले आहे. पण कौण्डिन्याने रु = रुत (अभिलाष) + द्र = (द्रावणम्) अशी त्याची व्युत्पत्ती मानून 'रुतस्य भयस्य द्रावणात् संयोजनात् रुद्रः' असा अर्थ केला व आपल्या अर्थाच्या पुष्टचर्थं त्याने पुढील श्लोक उद्धृत केला आहे.
नानाविधैः कृतैर्यस्माद् भयैश्च विविधैस्तया ।
संयोजयति भूतानि तस्माद् रुद्र इति स्मृतः ।। पासू. पृ. ५८
भासर्वज्ञही ' भयसंयोजकत्व म्हणजे रुद्रत्व ' म्हणतो–
रटी. पृ. ११

संस्कृत ही बोलभाषा होती तेव्हां व्युत्पत्ती करताना धात्वर्थ (root-sense) लक्षात घेतला जाई. पुढे कशीही स्वतःला सोयीस्कर व्युत्पत्ती करीत त्याचे हे उदाहरण.

४१. अन्तरसृष्टयामपि संहारकर्तृत्वं कालत्वम् ।
रटी. पृ. ११
ब्रह्मादिभूर्जपर्यंतं जगदेतच्चराचरम् ।
यतः कलयते रुद्रः कालरूपी ततः स्मृतः ।। पाभू. पृ. ७३

करतो म्हणून त्यास '**कलविकरण**'[४२] म्हटले आहे. तो वर उल्लेखलेल्या कलांचा अधिष्ठाता असल्यामुळे त्याला '**सकल**'[४३] म्हणतात पण तो स्वतः मनाच्या वा कार्य–करणांच्या पलीकडील असल्यामुळे–तो स्वतः 'कार्य–करणरहित' असल्यामुळे– त्याला निष्कल, अकल अथवा 'अमन'[४४] म्हटले आहे.

धर्म, ज्ञान, वैराग्य इ. ना 'बल' अशी संज्ञा आहे. या बलांचा आपल्या इच्छेप्रमाणे जो लाभ, लोप वा आक्षेप करू शकतो व ही बलें ज्याच्यामध्ये सर्वांत जास्त एकवटलेली आहेत त्या शिवाला '**बलप्रमथन**'[४५] म्हटले आहे. सिद्ध व ईश्वर याशिवाय जे सर्व जीव त्यांचा 'सर्वभूत' या संज्ञेत अंतर्भाव होतो. या सर्वांना आपले स्थान, शरीर, इंद्रियविषय इ. बद्दल वाटणारी आसक्ति, वासना इ. ही ईश्वरकृत असतात. इतर जीवांचे हे वैगुण्य व ईश्वराचे या बाबतीतील श्रेठत्व यामुळे त्याला '**सर्वभूतदमन**'[४६] म्हटले आहे.

तो सलक्षण–विलक्षण, परिमित–अपरिमित अशा परस्पर विरुद्ध अर्थांचे कारण आहे. सुखकर अशा अनंत शरीरांचा तो अधिष्ठाता असल्यामुळे त्याला

---

**४२. विकरणत्वं नाम स्थानशरीरेन्द्रियविषयादिसन्निवेशेन विस्तरविभाग विशेषतश्च कार्यकरणाख्याभिः कलाभिर्धर्मज्ञानवैराग्यानैश्वर्यादिभिः क्षेत्रज्ञसंयोजनम्। पासू पृ. ७४**

**कार्यकरणाख्यानां कलानां स्थानशरीरादिभावेन संयोजकत्वं कलविकरणत्वम्। गका. पृ. ११**

**४३. कार्य–करणाधिष्ठातृत्वात् सकल इत्युपचर्यते। पासू. पृ. ७६**

**४४. एतादृशमनसः प्रतिषेधादत्र कार्य–करणरहितो निष्कलो भगवान् अमन इत्युच्यते॥ पासू. पृ. ७६**

**४५. धर्मादिबलानां यथेष्टं वृत्तिलाभलोपाक्षेपकर्तृत्वं बलप्रमथत्वम्।**

**–गका. पृ. ११**

**४६. देवमनुष्यादीनां स्थानशरीरेंद्रियविषयादिषु या रतिः... तत्सर्वमीश्वर-कृतमेव... एतद् भगवत्यभ्यधिकत्वं शेषेषु पुरुषेषु। न्यूनत्वं ज्ञात्वा युक्तं वक्तुं सर्वभूतदमनाय नमः। पासू. पृ. ७५, ७६**

**सर्वदेवमानुषतिरश्चां रतिरञ्जनाधिवासनाकर्तृत्वं सर्वभूतदमनत्वम्। गका. पृ. ११**

'अ–घोर '[४७] म्हणजे अतिशान्त व अनुग्रहकर म्हणतात त्याचप्रमाणे त्याचे उलट असलेली रूपे असल्यामुळे त्याला '**घोर** '[४८] ही म्हटले आहे.

त्याचप्रमाणे दुःखकारक अनन्त शरीरांचा अधिष्ठाता असल्यामुळे ईश्वराला '**घोरतर** '[४९] म्हटले आहे. त्याला 'सर्व' म्हणण्याचे कारण तो सर्व ठिकाणी व्यापून असतो–अशी त्याची 'कारणशक्ति' अव्याहत (undestructive) आहे. तो 'कार्यांचा '– विद्या, कला, पशू यांचा आधार व आश्रयस्थान असल्यामुळे त्याला 'शर्व '[५०] असे अभिधान आहे.

आतापर्यंत भगवान् शिवाच्या कारणत्व, नानात्व इ. विशेषांचा [५१] जो विचार केला त्याचा निर्देश '**तत्पुरुष**' मधील '**तत्**' ने होतो. तो सर्व विद्या, कला इ. 'कार्यांना' व्यापणारे अधिष्ठान असल्यामुळे आणि आपल्या इच्छेनुरूप तो असंख्य शरीरे वा इंद्रिये निर्माण करू शकत असल्यामुळे त्याला '**पुरुष**'[५२] म्हटले आहे. तो देवांचा देव आहे. विद्या, कला, पशु यांची उत्पत्ति, स्थिति, संहार, तिरोधान, अनुग्रह ही त्याची क्रीडा आहे. त्याची ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति सर्वश्रेष्ठ (**निरतिशयदृक्–क्रियाशक्तिमत्त्व**) असल्यामुळे त्याला '**महादेव**' म्हटले आहे तो विद्यादि सर्व कार्यांचा शास्ता असल्यामुळे त्याला '**ऋषि**' म्हणतात व सर्वज्ञतेने त्याने सर्व विश्व व्यापल्यामुळे त्याला '**विप्र**' म्हटले आहे. [५३] या ऋषित्वाचे व विप्रत्वाचे मोठे ऐश्वर्य त्याचे ठायी असल्यामुळे त्याला '**महेश्वर**'[५४] म्हणतात. धर्म, अर्थ, काम आणि कैवल्य (मोक्ष) यांचे साधन असणाऱ्या विद्यांचा तो स्वामी

---

४७. अघोराणि – अतिशान्तानि, अनुग्रहकराणीत्यर्थः । पासू. पृ. ८९
सुखकरानन्तशरीराधिष्ठातृत्वम् अघोरत्वम् । गका. पृ. ११

४८. घोराणि– अशिवानि, अशान्तानि, अननुग्रहकारीणीत्यर्थः । पासू. पृ. ८९

४९. पासू. पृ. ९०, गका पृ. ११

५०. शरणं सर्वपशूनां वृतमपि सर्वं ह्यशेषतो यस्मात् ।
शरणाद् वरणाच्च हरः शर्वः परिकीर्तितो गुरुभिः ।। गका पृ. २७

५१. पासू. १.३८,४०,४४; २.१,४.५,२३–२७ इ.

५२. सर्वविद्यादिकार्याणां व्याप्ताधिष्ठातृत्वं पूरणम्, यथेप्सितानन्तशरीरादिकरणशक्तिः पौरुष्यं, तदुभयं भगवतः पुरुषत्वमुच्यते । गका. पृ. ११

५३. तथा कृत्स्नं कार्यं विद्याद्यमीशत इत्यतः ऋषिः . . व्याप्तमनेन भगवता ज्ञानशक्त्या कृत्स्नं ज्ञेयमित्यतो विप्रः । पासू पृ. १२६, १२७

५४. पासू. पृ. १२८

असल्यामुळे त्याला '**ईशान**'[५५] असे संबोधतात, चेतन व अचेतन अशा सर्वभूत प्रकृतीचा तो मालक असल्यामुळे त्याला '**ईश्वर**'[५६] म्हणतात. ब्रह्मदेव–जो सर्व चेतन पदार्थापेक्षा भिन्न असा क्षेत्रज्ञ आहे व जो सर्वांचा पति आहे– त्याचाहि शिव हा '**अधि–पति**'[५७] (**पत्युः पतिः अधिपतिः**) आहे.

तो परिपूर्ण व परितृप्त आणि दुःखमुक्त असल्यामुळे त्याला '**शिव**'[५८] म्हटले आहे आणि हे शिवत्व नित्य (**सन्तत्, अव्युच्छिन्न**) असल्यामुळे त्याला '**सदाशिव**' म्हणतात व ही मुक्तांची नित्य अवस्था आहे.[५९]

पाशुपतसूत्रभर विखुरलेल्या सूत्रांतून जी महेश्वर संकल्पना व्यक्त होते ती वर दिली आहे. यातील अनेक विशेषणांचा सायणाने अर्थ निराळा केला असला तरी कौण्डिन्य हा सायणाचे आधी १००० वर्षे होऊन गेला असल्यामुळे व लकुलीशाने (इ. स. २००) त्याच अर्थी हे शब्द वापरले असणे शक्य असल्यामुळे मुळातील तैत्तिरीय आरण्यकातील मंत्रांचा कौण्डिन्याचा अर्थ अधिक प्राचीन व (बहुधा) मूळ परंपरेला धरून असावा. हे दर्शन वैदिक परंपरेवर आधारले आहे हे स्पष्टच आहे.

## २. पशु (कार्य)

पाशुपत दर्शनातील दुसरा 'अर्थ' पशु अथवा कौण्डिन्याचे परिभाषेत 'कार्य' होय. पतीपासून भिन्नता व अस्वातंत्र्य दाखविण्यासाठी 'बद्ध होतो तो पशु' (**पश्यनात् पाशनाच्च पशवः**) असे म्हटले असले तरी एका अर्थी जो पशूंची निर्मिती व पालन करतो तो पति या व्याख्याप्रमाणे पतीचे पतित्व पशूवर अवलंबून आहे. (**पतिः कस्मात् ? आप्ति पाति च तान् पशूनित्यतः पतिर्भवति। पासू. पृ. ५**)

'पशु' अर्थी कौण्डिन्याने 'कार्य' ही संज्ञा स्वीकारली असली तरी ती सांख्यांच्या कार्य-संकलपनेपेक्षा भिन्न आहे. सांख्यमते प्रकृतीच्या उलट 'विकृति' आहे, पण पाशुपतांच्या 'कार्यात' सांख्यमतातील 'विकृति' व प्रकृति आणि

---

५५. पासू. पृ. १४४

५६. पासू. पृ. १४५

५७. पासू. पृ. १४५

५८. पासू. पृ. १४६

५९. तदयं नित्यो दुःखान्त इति सिद्धम् । पासू. १४६

विकृति पेक्षा भिन्न असलेला ' पुरुष ' याचाही समावेश होतो. तसेच सांख्य मानतात तसा ' महत्–'ते ' महाभूत ' हा तत्त्वविकास पाशुपत मानत नाहीत. त्यांच्यामते पतीच्या शक्तीमध्ये हा कार्यविस्तार अस्तित्वात असून (विश्व) निर्मिती म्हणजे ईश्वरी इच्छेने त्यांचे झालेले प्रकटीकरण. पाशुपतमते चित् व अचित् स्वतंत्र असून ईश्वरी शक्तीमध्ये त्यांना स्वतंत्र अस्तित्व आहे. त्रिक शैव मताप्रमाणे नुसती ईश्वरी संकल्पना नाही. पशु हे नित्य, वास्तव, सत्य आहेत. वेदान्ती मानतात तसा भास, अध्यास वा विवर्त नाहीत. लकुलीशमत अद्वैती नसून द्वैताद्वैती आहे. आकाश एक असले तरी त्यात चांदण्या अनेक व भिन्न असतात तशी एकतेत विविधता असते. न्यायवैशेषिकांप्रमाणे पाशुपत असत्कार्यवाद मानत नाहीत.

वरील चर्चेवरून पति (कारण) व पशु (कार्य) यांचे संबंध स्पष्ट होतील. पति आणि पशु दोघेही नित्य असल्यामुळे,[६०] कार्य अथवा विद्या, कला व पशु पतीपासून ' उत्पन्न होतात ' हे म्हणणे अलंकारिक आहे. कौण्डिन्याने **'कलितासनम्'** या पासू. ५ वर टीका लिहितांना म्हटले आहे :

'पतीचे जे पतित्व, सामर्थ्य किंवा स्वभाव (तत्त्वधर्म) हे आसन आहे. त्यामध्ये बसतात म्हणून त्याला ' आसन ' म्हणतात (आस्तेऽस्मिन् आसनम्).... भगवान कार्याला जागा देतो म्हणून कार्य व कारण हे आसनस्थ आहेत **(तस्मादासनस्थं कार्यं कारणं चेति)**[६१] कार्य व कारण एकत्र असल्यामुळे निरनिराळ्या प्राण्यांची दुधे एकत्र मिसळतात असा ' वृत्तिसंकर ' होत नाही. डोळ्यातील तेज व सूर्याचे किंवा दिव्याचे तेज भिन्न असते तसे कार्य व कारण भिन्न व स्वतंत्र असतात.'[६२]

जे दुसऱ्यापेक्षा मोठे आहे ते लहानास व्यापते. उदा. महेश्वरतत्त्व हे पुरुषादि पंचवीस तत्त्वांना व्यापते. पण या व्याप्य–व्यापक भावांने संकर किंवा ' अपरि-

---

६०. नित्यं कार्यम् । कस्मात् ? । पत्युर्भवति । कारणेश्वरनित्यत्वात् पतिनित्यत्वम् । पासू पृ. ५९

६१. कलितं शोभितं– शब्दितं नभस्ताराभिरिवेत्यर्थः । अतोऽव्ययोऽमृतो भगवान् कामतः स्वशक्तिस्थं कार्यं स्वशक्त्या अध्यास्ते । तस्मादासनस्थं कार्यं कारणं च । –पासू. पृ. ५८

६२. आह– कार्यकारणयोर्वृत्तिसङ्कुरदोषो गोऽजाविमहिषीक्षीरवत् । तदुच्यते – न । . . . . दीपादित्यप्रकाशनयनरश्मिवच्चासङ्करः । –पासू. पृ. ५८

च्छेद–दोष ' येत नाही.[६३] उदाहरणार्थ पाण्यात जर हळद टाकली तर पाण्याची द्रवता व शीतलता व हळदीचा रंग व चव हे एकत्र (मिसळले) असले तरी भिन्नच असतात. त्याचप्रमाणे कारण व कार्य स्वतःचे अस्तित्व स्वतंत्र ठेवूनच परस्परात मिसळतात.

शिवाय कार्याशिवाय कारणाला अस्तित्व रहाणार नाही. जर पाल्यच नसतील तर पालक कसला ?[६४] कार्य (पशु) कारण (पति) यांच्यात फरक इतकाच की पति स्वतंत्र असतो व पशु अस्वतंत्र असतो.[६५]

कार्य या संकल्पनेचे स्पष्टीकरण पुढील वंश–वृक्षावरून येईल.




विद्या ही संज्ञाः

१) पशूंचा (जीवांचा) गुण

२) तिच्यामुळे होणारे ज्ञान

व ३) ज्ञेय असणारे पतीने प्रकट केलेले ज्ञान या अर्थी येते. विद्या हा पशूंचा (जीवांचा) गुण आहे ती दिव्याप्रमाणे स्वयंप्रकाश आहेच, पण ती इतरावरही प्रकाश पाडू शकते.[६६]

**स्वयंप्रकाशत्व व प्रकाशकता पाशुपत ज्ञानमीमांसेला आधारभूत आहेत.**

---

६३. एकोत्तरोत्कर्षेण व्याप्य–व्यापकभावेनावस्थितानां तत्त्वादीनां नापरिच्छेददोषः । –पासू. पृ. ५८

६४. पालको नित्यः । पालकनित्यत्वाच्च पाल्यमपि नित्यम् । कस्मात् ? । न ह्यसति पाल्ये पालक इत्येव । –पासू. पृ ६०

६५. अस्वतन्त्रं सर्वं कार्यम् । –षदसं पृ. ७४

६६. विद्या ... स्वपरान्यप्रकाशिका, प्रदीपवत् । –पासू. पृ. ९२

तिच्यामुळे ग्रंथान्तर्गत गूढ अर्थांचे स्पष्टीकरण होते अशी ती ' विप्रत्वलक्षणा ' आहे. तिच्या योगाने होणाऱ्या ज्ञानाने मलाचे स्वरूप, त्यापासून मुक्त होण्याचा उपाय व मलमुक्त झाल्यावर होणारा लाभ आपल्यास कळतो.[६७] पाच पदार्थ-विषयांचे खरेखुरे समग्रज्ञान हाच विद्यालाभ आहे असे रत्नटीकाकार म्हणतो.[६८] या ज्ञानाचे उलट, चुकीच्या प्रमाणांनी होणारे ज्ञान (**प्रमाणाभासजं ज्ञानम्**) मिथ्याज्ञान असून ते संशय, विपर्यय (उलट, सत्याला सोडून असलेले) इ. नी युक्त असते (गका. पृ. २२). विद्या जेव्हा इतर अर्थावर ' प्रकाश ' पाडत नाही (सत्य ज्ञान देत नाही) तेव्हां तिला **' अबोधस्वभावा '** म्हटले आहे. अबोधस्वभावामध्ये बऱ्या-वाईट कर्मांचे जीवावर होणारे परिणाम (धर्म, अधर्म) येतात.

पाशुपत ग्रंथकारांनी असे कुठेही स्पष्ट म्हटले नसले तरी ' धर्म ', ' अधर्म ' इ. संबंधीची जी ' अबोधस्वभावा विद्या ' आहे, तिचा नीतिमीमांसेशी संबंध येतो असे म्हणण्यास हरकत नाही.

अबोधस्वभावा विद्येचा तिसरा विभाग ' संस्कार '. या मतात संस्कार म्हणजे जीवाचे हातून घडणाऱ्या पाप-पुण्यांचा परिणाम नसून हा ज्ञात विषयांचा (**कर्मांचा नव्हे**) परिणाम आहे. या संस्कारामुळे स्मृतीचा उलगडा होतो. त्याचा स्मृतीशी संबंध आहे व स्मृतीमुळे निश्चित स्वरूपाचे ज्ञान होते. जेव्हां ज्ञात वस्तू व तिचा ज्ञापक शब्द यांचे स्मृतिद्वारा साहचर्य होते तेव्हाच त्या वस्तूचे निश्चित ज्ञान झाले असे म्हणता येते.

**बोधस्वभावा–विद्या : पोटभेद**

बोधस्वभावा विद्येचे दोन पोटभेद आहेतः (१) **विवेक-प्रवृत्ति** (भासर्वज्ञमते **वृत्ति**) व (२) **अविवेक–प्रवृत्ति** किंवा **सामान्यवृत्ति** (रटी. १०). विद्या हा पशु-गुण (व्यक्तीचा गुण, किंवा उपाधि) आहे. धार्मिक संबंधात जेव्हा भक्त अंतिम सत्याविषयींचे गुरूकडून होणारे विवेचन लक्षपूर्वक ऐकतो तेव्हा ' त्या अंतिम स्वरू-

---

**६७. विद्या नाम (सा), या ग्रन्थार्थवर्तिपदार्थानामभिव्यञ्जिका विप्रत्वलक्षणा । न्यायात् पदार्थानामधिगतप्रत्ययो लाभमलोपायाभिज्ञः (अधिगत-प्रत्ययस्य ?) विद्वानित्युचते । लकुलीशमते ' विप्र ' म्हणजे ज्ञानी.**
**–पासू. पृ. ८८**

**६८. तत्र पञ्चपदार्थविषयं समास–विस्तर–विभाग–विशेषोपसंहारनिगमन-तत्त्वज्ञानं प्रथमो विद्यालाभो ज्ञातव्यमिति चोच्यते । –गका पृ. ९**

पाची जाणीव ' (awareness) या रूपात बोधस्वभावा विद्या असते व तिच्या रूपाला विवेकवृत्ति (प्रवृत्ति) म्हणतात. [६९]

बोधस्वभाव विद्येचा दुसरा भाग सामान्यवृत्ति (**भासर्वज्ञ**) किंवा अविवेक-प्रवृत्ति (**माधव**). माधवाचे मते [७०] विवेकवृत्ति म्हणजे चित्त. कारण सर्व प्राणी बाह्यविषयरूप प्रकाशाने अनुगृहीत झालेल्या विवेचित व अविवेचित विषयाला एक-सारखेच (**सामान्येन**) जाणतात. पशूच्या विषयधर्मांना न जाणणारी जी विद्या ती **अबोधात्मिका**. त्या विद्येमुळे शास्त्र सांगण्याची आवश्यकता असते.

सामान्यवृत्ति किंवा अविवेकप्रवृत्ति विद्या हा पाशुपतांच्या इंद्रियसंवेद्य ज्ञान-मीमांसेचा ( Theory of empirical knowledge) पाया आहे.

लकुलीशाच्या त्या प्राचीन सूत्रावरील शंकरपूर्व काळातील प्राचीन भाष्यात (कौण्डिन्यकृत पञ्चार्थभाष्य) व भासर्वज्ञाची संक्षिप्त रत्नटीका यामध्ये पाशु-पतांच्या ' विद्या ' संकल्पनेवर एवढीच माहिती आहे. ती वंशवृक्षस्वरूपात संक्षिप्त-पणे अशी मांडता येईल.




## ज्ञानमीमांसा [७१]

पाशुपतमते (१) प्रत्यक्ष, (२) अनुमान व (३) आप्तवचन किंवा आगम ही तीन प्रमाणें (सत्यज्ञानाची साधनें) आहेत. त्यांच्या मते इतर शास्त्रकारांनी

---

६९. **विवेकवृत्तिः प्रायेणोपदेश व्यङ्ग्या न च तत्र समाख्यान्तरमस्ति ।**
**—रटी. पृ. १०**

७०. **बोधस्वभावा विवेकाविवेकप्रवृत्तिभेदाद् द्विविधा । सा चित्तमित्युच्यते । चित्तेन हि सर्वः प्राणी बोधात्मक प्रकाशानुगृहीतं सामान्येन विवेचितम-विवेचितं चार्थं चेतयत इति । तत्र विवेकप्रवृत्तिः प्रमाणमात्रव्यङ्ग्या । पश्वर्थधर्माधर्मिका पुनरबोधात्मिका विद्या । सदसं. पृ. ७३**

७१. **मुख्यतः पासू ७ चे आधारे**

मानलेली अर्थापत्ति, सम्भव, अभाव, ऐतिह्य व प्रतिभा ही या तीन प्रमाणांत सामावली जातात.

यापैकी 'प्रत्यक्ष' प्रमाणाचे 'इंद्रियप्रत्यक्ष' व आत्मप्रत्यक्ष असे दोन प्रकार आहेत. वस्तुत: हे सर्व जगत्–ज्यामध्ये 'इंद्रियांचे बाह्य वस्तूंशी अथवा जगतातील पदार्थांशी संबंध येऊन त्यांच्या द्वारा शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, घट इ. पदार्थांचे जे आकलन होते. ते इंद्रिय प्रत्यक्ष वस्तुत: इंद्रियें व बाह्यजगातील पदार्थ यांचे संबंध आणि धर्म, (पुण्य) अधर्म, (पाप) प्रकाश, देश, काल आणि परमेश्वरी चोदना इ. च्या सहकार्याने (शब्दश: अनुग्रहाने) होणारे इंद्रियप्रत्यक्ष (ज्ञान) हे खरे प्रमाण होय.[७२]

चित्त व अन्त:करण यांचा संबंध येऊन जे ज्ञान होते ते आत्मप्रत्यक्ष. चित्त म्हणजे ज्याच्या योगाने जीव घटादि पदार्थांना जाणतो ते (**चेतयते जानति येन तच्चित्तम।**) चित्त हा अन्त:करणाचा अवांतर भेद नसून जीवाची विषयज्ञानासाठी जी प्रवृत्ति तो जीव निष्ठ गुण विशेष म्हणजे चित्त.[७३] हा गुण बोधात्मक असल्यामुळे घटादि सर्व पदार्थांचे ज्ञान करून देतो. उदा. सूर्य किंवा दीप स्वत: प्रकाशरूप असल्यामुळे घटादि इतर पदार्थांना प्रकाशवतो. त्याप्रमाणे चित्ताचे कार्य आहे. (अधिक चर्चेसाठी "विद्या" पाहा)

## अनुमान

अनुमानसुद्धा प्रत्यक्षपूर्वक असते. ते चित्त, आत्मा आणि अन्त:करण यांच्या संबंधावर आधारलेले असते. पण त्याचा हेतु (आधार) स्मृति असून ती धर्म (पुण्य), अधर्म (पाप), प्रकाश, देश, काल व ईश्वरी प्रेरणा (चोदना) यामुळे जागृत होते [७४] आणि त्यावरून 'कारण' (पति) हा भावी सृष्टीचा कर्ता आहे असे

---

७२. **परमार्थतस्त्विन्द्रियार्थसम्बन्धव्यञ्जकसामग्र्यं धर्माधर्मप्रकाशदेशकाल चोदनाद्यनुगृहीतं सत् प्रमाणमुत्पद्यते । पासू. ७**

७३. **चित्तेन हि सर्वः प्राणी बोधात्मकप्रकाशानुगृहीतं सामान्येन विवेचितमविवेचितं चार्थं चेतयते । –सदसं पृ. ७३**

७४. येथे मूळ वाक्याचा शब्दश: अर्थ मी किंचित् बदलला आहे. ते वाक्य असे : **चित्तात्मान्तःकरणसम्बन्धसामग्र्यं च धर्माधर्मप्रकाशदेशकाल चोदनादिस्मृतिहेतुकम्, उत्पत्त्यनुग्रहतिरोभावकालादि ।** (सामग्र्य – Totality)

"अनुमान हे चित्त, आत्मा व अंत:करण यांच्या संबंधाचे साकल्य आहे. ते धर्म (पुण्य), अधर्म (पाप), प्रकाश, देश, काल, ईश्वरी प्रेरणा व स्मृति यांचे कारण आहे व (जगताची) उत्पत्ति, स्थिति, लय यांचे (कारण आहे)." –पासू. पृ. ७

अनुमान काढता येते अनुमान दोन प्रकारचे असतेः (१) दृष्ट (विशेषे करून पूर्वी पाहिले असलेले) व (२) सामान्यतः दृष्ट (सामान्यावरून universal अनुमानलेले किंवा पाहिलेले.) दृष्ट अनुमानाचे दोन प्रकार आहेत. (१) **पूर्ववत् दृष्ट**–पाहिलेल्या हेतु (कारणा)वरून आपण न पाहिलेला परिणाम किंवा कार्य अनुमानणे उदा. 'हा पूर्वी पाहिलेला सहा बोटांचा माणूस तोच हा आहे.' (२) **शेषवत्**–पाहिलेल्या कार्यावरून (effect वरून) न पाहिलेले कारण निश्चित करणे. उदा. शिंगे वगैरेवरून 'ही गाय आहे' हे अनुमान.

पाशुपतांच्या कल्पनेसारखी सांख्यांची 'वीत' व 'अवीत' अनुमानांची कल्पना दिसते. अक्षपादासारख्या नैयायिकांचे 'अनुमान' विषयक वर्गीकरण (पूर्ववत्, शेषवत्, सामान्यतो दृष्ट) (व उदाहरणे) यांचे पाशुपताशी साम्य दिसते.

## आगम

आगम म्हणजे महेश्वरापासून गुरूपरंपरेने चालत आलेले शास्त्र[७५]

## कला [७६]

अस्वतंत्र असते ते कार्य. या कार्याचा दुसरा प्रकार 'कला.' 'कला' ही पाशुपतांची एक पारिभाषिक संज्ञा आहे. ही चेतनाचे आधीन–अस्वतंत्र–पण स्वतः अचेतन असते. तिचे प्रकार दोनः कार्यसंज्ञक व करणसंज्ञक. जिला 'कार्य' (effect) म्हणतात ती पृथिवी, आप इ. पाच तत्त्वें व गंध, रस, रूप, स्पर्श, शब्द हे त्याचे पाच गुण मिळून दहा प्रकारची आहे. जिला 'करण' –संज्ञा आहे ती पाच कर्मेंद्रिये, पाच ज्ञानेंद्रिये व अंतःकरणत्रय मिळून तेरा प्रकारची आहे. वास्तविक अन्तः-

---

७५. **आगमो नाम आ महेश्वराद् गुरुपारम्पर्यागतं शास्त्रम्।**
**…… रुद्रप्रोवाच (पासू ५.८) वचनात् सिद्धिः।– पासू पृ. ७**

७६. **पासू. २.२४ व भाष्य; षदसं. पृ. ७३–७४; गका रटी पृ. १०–११**
**चेतनानाश्रितत्वे सति निश्चेतना कला। साऽपि द्विविधा, कार्याख्या करणाख्या चेति। तत्र कार्याख्या दशविधा पृथिव्यप्तेजोवाय्वाकाश–गन्ध–रस–रूप–स्पर्श–शब्दलक्षणा, करणाख्या तु त्रयोदशविधा, पञ्च कर्मेन्द्रियाणि पञ्चबुद्धीन्द्रियाण्यन्तःकरणत्रयं चेति –रटी. पृ. १०–११**

करण एक आहे पण निश्चय, अभिमान व संकल्प या त्याच्या त्रिविध व्यापारामुळे ते बुद्धि, अहंकार व मन असे भिन्न मानून 'अन्तःकरणत्रय' हा शब्दप्रयोग केला आहे. या संकल्पनेचे सांख्यांच्या २३ तत्त्वव्यापक प्रधानसंकल्पनेशी साम्य दिसते. कलेचे स्वरूप पुढील प्रमाणे मांडता येईल.




## पशु

तिसरे अस्वतंत्र पण चेतनयुक्त कार्य म्हणजे पशु. ते 'साञ्जन' (शरीराशी संबद्ध) व 'निरञ्जन' (तसा संबंध नसलेले) असे दोन प्रकारचे आहेत.[७७] या (पाशुपत) शास्त्रात सिद्धपुरुष व ईश्वर याखेरीज सर्व सचेतन (प्राण्यांना) 'पशु' म्हटले आहे. "सांख्ययोगाने जे मुक्त झाले आहेत आणि सांख्ययोगावर ज्यांचे प्रभुत्व आहे ते ब्रह्मदेवापासून तिर्यग्योनीतील प्राण्यापर्यंत पशू मानले गेले आहेत."[७८] त्यांना पशू म्हणण्याचे कारण पशू बंधात (बंधनात) असतात. स्वतंत्र नसतात. त्यांची कार्य करण्याची शक्ती (कारणशक्ती) ही मर्यादित केली गेलेली असते (**कारणशक्तिसन्निरोधलक्षण**) आणि त्याचे ठिकाणी ऐश्वर्य किंवा ज्ञान–शक्ति व क्रियाशक्ती हे ईश्वरी गुण असत नाहीत. आणि हेच अनैश्वर्य म्हणजे बंध होय व तो बंध अनादि (पण सान्त) असतो. पति व पशु दोघेही चेतनावान् आहेत खरे. पण 'कार्य' व 'करण' संज्ञा असणाऱ्या कलारूपी पाशांनी पशू बद्ध आहेत. ते

---

७७ हे पासू. पृ. ५ मधील कौण्डिन्य भाष्याचे जवळजवळ शब्दशः भाषांतर आहे.

७८ साङ्ख्ययोगेन ये मुक्ताः साङ्ख्ययोगेश्वराश्च ये ।
ब्रह्मादयस्तिर्यगन्ता सर्वे ते पशवः स्मृताः ।।

पासू. ५ पञ्चार्थभाष्यात उद्धृत.

तुलनार्थ : ब्रह्माद्याः स्थावरान्ताश्च देवदेवस्य धीमतः ।
पशवः परिकीर्त्यन्ते संसारवशवर्तिनः ।।

– तत्त्वप्रकाश I पृ. ३१

शब्द, रूप, रस, गंध इ. विषयांच्या आधीन असल्यामुळे ते अस्वतंत्र आहेत व हे अनैश्वर्य त्यांचा बंध आहे. प्रलयकाली पशूंच्या कला (सांख्याचो 'तत्त्वें') विलीन होतात तेव्हां सुद्धा पशू स्वतंत्र नसतात. कारण प्रलयानंतर त्यांना त्यांच्या कर्मी-प्रमाणे जन्म मिळतो.[७९]

या जीवांना पशु म्हणण्याचे दुसरे कारण ते वस्तुत: पतीप्रमाणे विभु (सर्वव्यापी) व चेतनायुक्त आहेत पण त्यांचे ज्ञान व अनुभव त्यांच्या शरीरापुरतेच मर्यादित असते.[८०] त्याच्या बाहेर त्याची व्याप्ती नसते. प्रलयकालात कलांचा (कार्यकारणांचा) लोप झाला तरी प्रलयकालानंतर ते स्वतन्त्र नसल्यामुळे त्यांना त्यांचे कर्म (धर्म, अधर्म), देश, काल व ईश्वरी इच्छा याप्रमाणे शरीर मिळते.[८१]

पाशुपतमते आत्मा नित्य आहे. तो चेतन व क्षेत्रज्ञ आहे. तो कार्य व करण यांना व्यापतो. रूप, रस, गंध इ. विषयांचा भोक्ता आहे. विचार करणे, बोलणे, जाणणे इ. त्याची क्रिया आहे. सुख, दु:ख, इच्छा, द्वेष, प्रयत्न, चैतन्य इ. त्याची बाह्य लिंगे (खुणा, चिन्हे) आहेत.[८२]

सारांश पशू व पति चेतनायुक्त आहेत. सर्वव्यापी आहेत, पण पशु क्षेत्रज्ञ व पति सर्वज्ञ आहे. पण जेव्हां योगामुळे व तपस्येने तो वरच्या पातळीवर जाऊन महेश्वरात प्रवेश करतो तेव्हा त्याला सर्व सिद्धी प्राप्त होऊन अवध्य, अक्षर, अजर, अमर प्रतिहतगति होऊन तो भगवान महादेवाचा महागणपति होतो.[८३]

---

७९. 'पश्यनात् पाशनाच्च पशु:' या व्याख्येचे कौण्डिन्यकृत विवेचन.

८०. काश्मीरी अद्वैतमतातील 'प्रलयाकल' ही कल्पना यावरून घेतली असावी.

८१. काश्मीरी अद्वैतमतातील 'देहप्रमाता' ही संकल्पना अशा स्वरूपाची आहे.

८२. नित्यात्मा । पासू. ५.३

**आत्मा इति क्षेत्रज्ञमाह।... तस्मिश्चेतने आत्मशब्द:।**
**अततीत्यात्मा। आपूर्य कार्यकरणं विषयांश्चेतयतीत्यात्मा।...**
**स च श्रोता स्प्रष्टा द्रष्टा रसयिता घ्राता मन्ता वक्ता बोद्धा**
**इत्येवमादि:। . . . तस्य सुखदु:खेच्छाद्वेषप्रयत्नचैतन्यादिभिर्लिङ्गै रधिगम: क्रियते। – पासू पृ. १११–११२**

**८३. पासू. पृ. ४१–५१**

सारांश पाशुपतशास्त्रात पशु-संकल्पनेचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे केले आहे :




पाशुपतांच्या 'कार्य' संकल्पनेचे साकल्याने वर्गीकरण व स्पष्टीकरण पुढील पृष्ठावरील 'वंशवृक्षा' वरून होईल.

## कार्य

'कार्य' या संकल्पनेचे स्पष्टीकरण व संकलन पुढील 'वंशवृक्षावरून' होईल.



## मलपंचक

शैवदर्शनाच्या इतर शाखांत आणव, कार्मिक व मायिय असे तीन मल असल्यामुळे पशूला संसारचक्रात भ्रमण करावे लागते असे म्हटले जाते पण लकुलीश पाशुपत दर्शनात पुढील पाच मल सांगितले आहेत.[८४]

(१) मिथ्याज्ञान, (२) अधर्म, (३) सक्तिहेतु (४) च्युति व (५) पशुत्व व हे आपआपल्या अधिकाराप्रमाणे सोडावेत असे हरदत्ताने सांगितले आहे. त्या मलांचे स्वरूप असे:

१. **मिथ्याज्ञान** – शास्त्रीय प्रमाणाऐवजी प्रमाणाभासाने होणारे संशय, विपर्यय इ. चुकीचे ज्ञान,[८५] काम, क्रोध इ. कालुष्याचा अंतर्भाव मिथ्याज्ञानात होतो.[८६]

संशय, विपर्यय, काम, क्रोध इ.नी मन दूषित होत असल्यामुळे या सर्वांना एकाच विभागात घातले आहे.

२. **अधर्म** – केलेल्या पाप कृत्यांचा ते कृत्य करणारावर होणारा परिणाम. मिथ्याज्ञान, आसक्ती, च्युति इ. मलाचे प्रकार सांगितले असले तरी 'पाप' हा अधर्म या ठिकाणी अभिप्रेत आहे.[८७]

३. **सक्ति** – विषयसुखाबद्दल आसक्ती व या आसक्तीचा हेतू, यामुळे आत्मा आपण स्वतःच शरीर, प्राण, बुद्धी आहोत असे मानतो व त्यांच्याशी एकरूप होऊन विषयाबद्दल आसक्त होतो. लकुलीश पाशुपत मार्गाहून भिन्न मार्गांनी केलेल्या विधींचा हा परिणाम आहे

४. **च्युति** – जेव्हा रुद्रतत्त्वापासून चित्त किंचित् चळते पण विषयासक्त होत नाही. (शब्दशः– विषयाप्रत प्राप्त होत नाही) अशा चित्ताच्या चळण्याला च्युति म्हणतात या च्युताचे बीज अधर्म असल्याने त्यास मलत्व आले आहे.

५. **पशुत्व** – वस्तुतः पतीप्रमाणे विभुत्व (सर्वव्यापित्व) ज्ञानशक्ती,

---

८४. **मिथ्याज्ञानमधर्मश्च सक्तिहेतुश्च्युतिस्तथा ।**
**पशुत्व-मूलं पञ्चैते तन्त्रे हेयाधिकारतः ॥** –गका ८

८५. **मिथ्याज्ञानमुक्तं संशयविपर्ययादिलक्षणम् ।**
**तत्र प्रमाणाभासजं ज्ञान मिथ्याज्ञानमुक्तं**
**संशयविपर्ययादिलक्षणम् ।** –रटी ५३

८६. **कामक्रोधदोषाः कलुषं तस्याप्यज्ञाने ऽन्तर्भावः** रटी पृ. २२ ।

८७. **सत्यप्यज्ञानकलुषसङ्गच्युतिहेतोरधर्मत्वे पापाख्य एवात्राधर्मो ऽभिप्रेत इति च :** [ गकाच्या ८ व्या श्लोकातील अधर्मश्च ] **सूचयति ।** रटी पृ. २२

क्रियाशक्ती, असलेला जीव (पशु) मर्यादित शक्तीचा होतो. त्याचे कारण हा अनादि (पण) सान्त असलेला 'पशुत्व' नामक मल. हा नाहीसा झाला म्हणजे सिद्धत्व प्राप्त होतो व त्याला पतीप्रमाणे असलेली त्याची मूळची सर्वज्ञता, क्रियाशक्ती प्राप्त होते व मनोजवित्व, कामरूपित्व, धर्मित्व इ. ऐश्वर्य प्राप्त होते.[८८]

या मलपंचकापासून मुक्तता होण्यासाठी कोणते उपाय आहेत याचा विचार पुढे केला आहे.

वर सांगितलेल्या मलपंचकापासून मुक्त होण्यासाठी पुढील उपाय सांगितले आहेत:[८९]

**वासश्चर्या जपध्यानं सदा रुद्रस्मृतिस्तथा।**
**प्रसादश्चैव लाभानामुपायाः पंच निश्चिताः॥**[९०]

१. **वास**– गुरू करीत असलेला पारमार्थिक ऊहापोह समजण्याची बौद्धिक कुवत व तो आत्मसात करण्याची कुवत. 'ज्याला पूर्व व उत्तर वाक्यांशांची सुसंगती (अविरोध) तर्काने निश्चित कळते त्यालाच धर्म कळतो.[९१]

२. **चर्या**: धर्म (अथवा पुण्य) संपादनाचा उपाय म्हणजे चर्या हिचे वर्णन पासू १.२ पासून पासू. ४८ पर्यंत लकुलीशाने केले आहे. त्याच्या आधारे भासर्वज्ञाने वरील कारिकेतील 'चर्या' शब्दाची चर्चा करताना महेश्वराशी तादात्म्य होण्यासाठी जी शारीरिक, मानसिक, आध्यात्मिक प्रक्रिया वा आचार पद्धती सांगितली आहे तिचा 'चर्या' मध्ये समावेश केला आहे.

चर्येची तीन अंगे आहेत. (१) दान (२) याग (३) तप

(१) दान म्हणजे परमेश्वराला आत्मसमर्पण करणे. हे 'अतिदान' आहे असे मानले असून, संसारात पुन: जन्म न येणे (अनावृत्ति) हे त्याचे फळ आहे.

(२) याग म्हणजे (पाशुपत) शास्त्रात सांगितलेल्या भस्मस्नानादि क्रियांचे आचरण. यागाचे दोन प्रकार आहेत:

(अ) व्रत आणि (अ) द्वार धर्म आणि अर्थ यांचा साधक जो व्यापार त्याला विधी म्हणतात.[९२] त्यापैकी धर्माचा साधक असा हा प्रधानविधी आहे. तो

---

८८. रटी पृ. २३, पासू पृ. ४३–५१

८९. हरदत्तकृत गणकारिकांच्या आधारे.

९०. गका ७ हिचा अर्थ भासर्वज्ञाच्या रत्नटीकेच्या आधारे.

९१. **पूर्वोत्तराविरोधेन वाक्यार्थं ह्यविचालितम्॥**
**यस्तर्केणानुसन्धत्ते स धर्मं वेद नेतरः॥**

गका ७ वर भासर्वज्ञाने उद्धृत कारिका

९२. मदसं पृ. ७४–७५ चा संक्षिप्त अनुवाद.

धर्माचा हेतु असून त्याला चर्या म्हणतात. व्रत आणि द्वार हे चर्येचे दोन प्रकार आहेत. (१) व्रत पाच प्रकारचे असते ते प्रकार असे :

भस्मस्नान, भस्मशयन, उपहार, जप व प्रदक्षिणा. नकुलीशमते व्रतस्थाने त्रिकाळ भस्माने स्नान करावे. भस्मात शयन करावे. 'उपहार' म्हणजे नियम[९३] तो 'हसित गीत–नृत्य–हुडुक्कार–नमस्कार–जप्योपहारेणोपतिष्ठेत्' (पासू. १.८) या सूत्रात सांगितल्याप्रमाणे सहा अंगांनी युक्त आहे. त्याचा अर्थ : हसणे, गाणे, नृत्य, हुडुक्कार नमस्कार व जप्य मंत्र. या षडंग उपहाराने महेश्वराची सेवा अगदी नोकराप्रमाणे (भृत्यवत्) करावी. 'हसित' म्हणजे कंठ व ओठ कंपित करून 'ह ह ह ह' असा अट्टाहास (मोठ्याने हसणे) करणे गांधर्वशास्त्राच्या नियमानुसार महेश्वरासंबंधी गुणधर्मादिनिमित्तांचे चिंतन म्हणजे 'गीत'. नाट्यशास्त्राचे अनुसार तालावर पावले टाकणे, हातांनी मुद्रादि अभिनय करणे, मान, डोळे, तोंड, ऊर, खांदे, मांड्या इ अंग–प्रत्यंग उपांगसहित हावभाव करणे हे नृत्य. जीभ व तालु यांच्या संयोगाने होणारा बैलाच्या नादासारखा 'हुडुक्' असा आवाज करणे म्हणजे 'हुडुक्कार'. वेदतील 'वषट्' शब्दाप्रमाणे 'हुडुक्' हा पवित्र शब्दोच्चार आहे. जेथे पुष्कळ इतरेजन असतील तेथे हे गुप्तपणे करावे. बाकीची उपासना प्रकटपणे करावी.

नमस्कार व प्रदक्षिणा यांचा अर्थ स्पष्ट असला तरी नमस्कार मानसिक असावा (**मानसं तु नमस्करणं नमस्कारः।** पासू १४) असे कौण्डिन्याचे मत आहे.

जपामध्ये काही पायऱ्या व अवस्था आहेत. प्रथम (तै आ. १७.१) '**सद्योजतावर**' मन एकाग्र करावयाचे असते. जप करताना बाह्य विषयांपासून मन प्रयत्नपूर्वक काढून एकाग्र करावे लागते. हा '**प्रत्याहार–फल**' (प्रत्याहार ज्याचे फळ आहे असा) जप सामान्य किंवा खालच्या दर्जाचा (अपर) मानतात. पण प्रत्याहाराचा सराव झाला की मन आपोआपच अंतर्मुख होते. हा प्रत्याहार वरच्या दर्जाचा (पर) मानला गेला आहे. याची परिणत अवस्था 'समाधि' लागण्यात होते. हा समाधि–फल जप ही पाचवी व शेवटची पायरी अथवा अवस्था असून यात (तै आ. १७.५) 'ईशानावर' ध्यान केंद्रीभूत झालेले असते.

(आ) "**द्वार**" ही सार्वजनिक स्थळी आपले श्रेष्ठत्व लपविण्याची व लोकनिंदा ओढवून घेऊन तिच्या द्वारा आपले पाप नष्ट करण्याची पद्धत आहे. प्राचीन काळी आजीवक परंपरेत ही पद्धत होती हे बुद्धकालीन आजीवक तीर्थंकर मंखली गोसाल व त्याचे परात्परगुरू किसवच्छ[९४] यांच्या उदाहरणांवरून दिसते.

याचे 'क्राथन,' 'स्पन्दन,' 'मन्दन,' 'शृंगारण', 'अवितत्करण' व 'अवितद्भाषण' असे सहा प्रकार आहेत. झोप न लागलेल्या साधकाने झोप

---

९३. **उपहरणाद् उपहारो व्रतं नियम इत्यर्थः ।** –पासू १४

९४. सरभंगजातक (Jataka Tales V. P. 125.)

लागल्याप्रमाणे दाखवणे हे 'क्राथन'; कंपवात झाल्याप्रमाणे शरीराचे अवयव कंपयुक्त करणे हे 'स्पन्दन'; पाय निर्बळ झाल्याप्रमाणे चालणे हे 'मन्दन'; (मनातून कामविकाराचा अभाव असलाच पाहिजे पण) बाह्यात्कारे स्त्रियांकडे पाहून कामचेष्टा करणे हे 'शृंगारण'; आपण कार्याकार्यज्ञानशून्य आहोत हे दाखविण्यासाठी लोकनिंद्य कर्म करणे हे 'अवितत्करण' व परस्परविरुद्ध व पुष्कळदा अर्थहीन शब्द बोलणे याला 'अवितद्भाषण' म्हणतात.

**जप–ध्यान** : भासर्वज्ञाने 'जपध्यान' अशी संज्ञा वापरली आहे. चर्येतील जपाचा शारीरिक बाबीवर भर आहे व या ठिकाणी मानसिक बाबीवर भर आहे. जपपूर्वक ध्यान ही तिसरी अवस्था असून यामुळे 'अघोर' स्वरूपावर लक्ष केंद्रीभूत होते. 'धारणापूर्वक ध्यान' ही चौथी अवस्था असून हिच्यात 'तत्पुरुष' स्वरूपावर लक्ष केंद्रीभूत करावयाचे असते. शेवटच्या (ईशान स्वरूपावर लक्ष केंद्रीभूत करणाऱ्या) अवस्थेचा उल्लेख पूर्वी केलाच आहे

**(४) सदारुद्रस्मृति** : रुद्राचे अखंड स्मरण. यामुळे ध्येयवस्तूवरून (रुद्रावरून) मन विचलित होत नाही.

**(५) प्रसाद (कृपा)** : पशुत्वमलापासून संपूर्णतया मुक्त होण्यासाठी ईश्वरी अनुग्रहाची आवश्यकता असते त्यालाच येथे 'प्रसाद' म्हटले आहे.

**देश** : ज्या ठिकाणी राहून मोक्षासाठी प्रयत्न करावा अशी स्थाने : देवालय, भक्तजन वा साधकांच्या मेळाव्यांच्या जागा, गुहा, स्मशान व रुद्र (शेवटच्या अवस्थेत असणाऱ्या साधकाचा रुद्र हाच देश असतो.) भासर्वज्ञ रटी पृ-१६

**अवस्था** : मोक्षप्राप्तीसाठी प्रयत्न करणाऱ्याच्या अवस्था. व्यक्त, अव्यक्त, जय, छेद व निष्ठा. लाभप्राप्ती (महेश्वराशी युक्त होई) पर्यंत जे एकत्र अवस्थान असते त्याला 'अवस्था' म्हणतात, असे सदसं मध्ये म्हटले आहे. त्यापैकी पाशुपत-मार्गाची सर्व (बाह्य) चिन्हे वापरणे ही 'व्यक्त' अवस्था व ही बाह्य चिन्हे न वापरणे ही 'अव्यक्त' अवस्था आहे. 'जय' म्हणजे इंद्रियजय जगापासून संपूर्ण अलिप्तता याला 'छेद' म्हणतात, आणि सर्व कर्मांचा संपूर्ण त्याग याला 'निष्ठा' म्हटले आहे.

**शुद्धि** : वर उल्लेखलेल्या मार्गांनी पुढील पाच प्रकारची शुद्धी प्राप्त होते : (१) अज्ञान–नाश, (२) अधर्मनाश (३) आसक्ति नाश (४) ध्येयच्युति नाश (५) पशुत्व (मल) नाश.

**बल**: पारमार्थिक ध्येयप्राप्तीसाठी पुढील पाच प्रकारचे बल उपकारक आहे. (१) गुरुभक्ती–ती अशी की शास्त्रात सांगितले नसले तरी गुरोर्वाक्यं प्रमाणम्[९७]

---

९५. रटी पृ. १९.

९६ **व्यक्ताव्यक्तं जयच्छेदो निष्ठाचैवेह पंचमी –गका ५**

९७. **यदेव हि गुरोरभिप्रेतं तदेव विहितं शास्त्रानुक्तमपि। रटी पृ. ६.**

(२) बुद्धीचा प्रसन्नपणा, अकलुषत्व (३) आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक दु:खास कारणीभूत होणारे (स्तुति–निंदा, सुख–दुःख) इ. द्वंद्वावर विजय. (४) धर्म (५) सत्य ज्ञान

**दीक्षा** : परमार्थमार्गात प्रवेश करताना दीक्षा घ्यावी लागते पाशुपतमार्गात दीक्षा घेताना तिची पाच अंगे पुढ'लप्रमाणे सांगितली आहेत.[९८] (१) द्रव्य, (२) काल, (३) क्रिया (४) मूर्ति आणि (५) गुरू.

(१) ' द्रव्य ' या पारिभाषिक संज्ञचा अर्थ ' विद्याकलापशु ' ही संज्ञा असलेले त्रिविध कार्य त्यापैकी ' विद्ये'मध्ये पुढील विशेषांचा अंतर्भाव होतो. शिष्याच्या अंगी असलेली विद्या. हिच्यामुळे शिष्य दीक्षेला पात्र होतो. जिच्यामुळे आचार्य संपूर्ण दीक्षा देऊ शकतात ती आचार्यगत विद्या ; ' कला ' म्हणजे दर्भ, भस्म, चंदन, सूत्र (यज्ञोपवीत), फुलें, धूप व मंत्र आणि ' पशु ' म्हणजे ज्याला दीक्षा संस्कार करावयाचा तो ब्राह्मण[९९] सारांश ही वैदिक पाशुपत दीक्षा ब्राह्मणांच्या पुरती मर्यादित दिसते. हरिभद्र या ८व्या शतकातील जैन लेखकाने ही मर्यादा नमूद केली आहे.

(२) दीक्षेला योग्य काल सकाळ (पूर्वाह्ण) (३) क्रिया म्हणजे संस्कार कर्म (विधि). तो सस्कारकारिकेप्रमाणे करावयाचा असतो. (४) मूर्ति याचा अर्थ महादेव, यज्ञस्थळ इ पवित्र स्थानाच्या जवळ उजव्या हाताची जागा (५) गुरू– मानवी आचार्य[१००] (हा अपर गुरू) व त्याचा अधिष्ठाता भगवान् हा श्रेष्ठ (पर) गुरू.

---

९८. द्रव्यं कालः क्रिया मूतिर्गुरुश्चैवाह पंचमः ।। –गका ५

९९. अत्र विद्या-कला-पशुसंज्ञितं त्रिविधं कार्यं द्रव्यमित्युच्यते
तत्र विद्या तावच्छिष्यगता दीक्षाङ्गं यया शिष्यो दीक्षाधिकृतो भवति ।
यया त्वाचार्यः सम्पूर्णां दीक्षां निवर्तयति सा ऽऽचार्यगता विद्या ।
कला दर्भाद्या दीक्षाङ्गम् ।
उक्तंहि – पूर्वं दर्भाः पुनर्भस्म चन्दनं सूत्रमेव च ।
पुष्पाणि च पुनर्धूपं मन्त्रा एष क्रमः स्मृतः ।।
पशुः संस्कर्तव्यो ब्राह्मणः । गका ५ वरील रटी पृ. ८

१०० भासर्वज्ञाने स्वीकारलेली ' आचार्य ' शब्दाची व्याख्या :
आचारे स्थापयन् शिष्यान्यस्मादाचरति स्वयम् ।
आचिनोति च शास्त्रार्थानाचार्यस्तेन कीर्त्यते ।। –रटी पृ. ९.

तुलनार्थं– उपनीय तु यः शिष्यं वेदमध्यापयेद् द्विजः ।
सकल्पं सरहस्यं च तमाचार्यं प्रचक्षते ।। –मनु २.१४०

**(५) लाभ :**

दीक्षा कशाकरता घ्यावयाची ? तिच्यापासून होणारे लाभ पुढील प्रमाणे आहेत :[१०१] (१) ज्ञान, (२) तप, (३) नित्यत्व (४) स्थिति आणि (५) सिद्धि

(१) ज्ञान– पाशुपत तत्त्वज्ञानावर प्रभुत्व

(२) तप– भस्मस्नानादि विधी (दैनंदिन क्रिया) केल्यापासून मिळणारे पुण्य (**भस्मस्नानादि विधिजनितो धर्मस्तप:**) रटी पृ. १५

(३) नित्यत्व– गंगेच्या प्रवाहाप्रमाणे अखंड ध्येय वस्तूचे चिन्तन (**देवे भावाख्यामलक्षणं नित्यत्वम्...अव्युच्छिन्नप्रवाहो नित्यत्वं...यथा नित्यप्रवाहा गङ्गा–**। रटी. पृ. १६

(४) स्थिति– रुद्राचे ठिकाणी अत्यंत निश्चलपणे मन स्थिर होणे. चित्त असे स्थिर झाले की योग्यांची असंगित्वादि नऊ लक्षणे अंगी बाणतात.[१०२]

(५) सिद्धि– सिद्धांच्या अंगी असणाऱ्या शक्ती उदा. दूरदर्शन, दूर श्रवण, सर्वज्ञता, मनोजवित्व इ.

## तिसरा 'अर्थ'-योग

'योग' हा पाशुपतांच्या पाच अर्थांपैकी तिसरा 'अर्थ' आहे. पाशुपत चर्याप्रमाणे योगातही तत्त्वज्ञानाचा फारसा भाग नाही पण पाशुपतांची योगकल्पना पातंजल योगापेक्षा भिन्न असल्यामुळे व योगाला पाशुपत स्वतंत्र 'अर्थ' (category) मानत असल्यामुळे येथे संक्षिप्त दिग्दर्शन करीत आहे

पतंजलीप्रमाणे पाशुपत योग म्हणजे चित्तवृत्ति निरोध मानत नाहीत. योग म्हणजे आत्मा आणि ईश्वर यांचा संयोग. सांख्य व योग यांची 'कैवल्य' म्हणजेच दुःखान्त किंवा मोक्ष अशी कल्पना असल्यामुळे जडप्रकृतीपासून पुरुष किंवा आत्मा मुक्त करणे एवढेच त्यांचे ध्येय होते[१०३] पण ईश्वरवादी पाशुपतांना, महेश्वराशी एकरूप होऊन केवळ दुःखान्तच नव्हे तर ऐश्वर्य व महत्सुख हवे होते. त्याना साधन मार्ग या दृष्टीनी पातंजल मार्ग टाळता आला नाही हे खरे असले, तरी त्यांचा

---

१०१ **ज्ञानं तपोऽथ नित्यत्वं स्थितिः सिद्धिश्च पंचमी ।** –गका ६ (ब)

१०२ **दोषहेतुजालेभ्यश्छिन्नस्य मलाख्यानिवृत्तौ चित्तस्य रुद्रेऽवस्थानमत्यन्तनिश्चलत्वं स्थितिरुच्यते तत्समकालं योगिनोऽसङ्गित्वादीनि नव लक्षणानि भवन्ति ।** –रटी पृ. १६.

१०३ भासर्वज्ञाने 'हे मुक्तात्मे पारमेश्वरी ऐश्वर्य नसल्यामुळे आमच्यासारखेच (**पराभिप्रेता मुक्तात्मान: परमैश्वर्यविकलत्वादस्मादिवत्**) अशी त्याची चेष्टा केली आहे. गका पृ. १६.

कौण्डिन्याचे शब्दांत [१०४] "जीव सर्वव्यापी असल्यामुळे वस्तुत: महेश्वराशी वियुक्त नसतो पण अनादि मलामुळे त्याची ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती मर्यादित होते. हा अनादि मल किंवा बंध नाहीसा झाला की पशु व पति यांचे मीलन होते. हे मीलन पाशुपतशास्त्रात सांगितलेल्या समाधिलक्षण असलेल्या योग मार्गाने होते."[१०५] ह्या अष्टांग योगाच्या अंगांची नावे पातंजल योगाप्रमाणे (१) यम (२) नियम (३) आसन, (४) प्राणायाम, (५) प्रत्याहार, (६) ध्यान (७) धारणा व (८) समाधि अशी असला तरी त्यांचा आशय भिन्न आहे.

जर गुहेत किंवा ओसाड घरात राहून ध्यान व अध्ययन करीत देवाचे ठिकाणा निश्चल एकाग्रता साधली व जितेंद्रिय राहून परमेश्वराचे ठिकाणी लीन नित्ययुक्त राहिला तर सहा महिन्यात साधक-योग्याला सिद्धी मिळते. [१०६]

पाशुपतांचा योगसिद्धीवर विश्वास आहे.

पाशुपत योगाचे दोन प्रकार मानतात (१) क्रिया लक्षण व (२) क्रियोपरम लक्षण

## क्रियालक्षण योग

या योगामध्ये शारीरिक हालचालींना (गायन, नर्तन यांना सुद्धा) स्थान आहे. या योगाचे प्रथमावस्थेत भस्माने तीन वेळा स्नान करावयाचे. पाण्याने नाही. [१०७] भस्मातच झोपायचे, दोन स्नानांचे दरम्यान उच्छिष्टभक्षण, लघवी, शौच इ. केल्यास पुन:भस्मस्नान करावे ; [१०८] देवाचे निर्माल्य धारण करावे त्यायोगे भक्ति वाढते ; [१०९] वर वर्णन केलेली पाशुपत पंथाची बाह्य चिन्हे धारण करावीत. त्याने देवालयात एकवस्त्र वा विवस्त्र राहावे. [११०]कायावाचामनाने

---

१०४. पासू पृ. ६ व ४१.

१०५ इह तु **समाधिलक्षणे योगे संनियमः** । पासू ६

१०६. **शून्यागारगुहावासी । देवनित्यः । जितेन्द्रियः । षण्मासान्नित्ययुक्तस्य ।**
—पासू. ५ ९ ते १२ व त्यावरील कौण्डिन्यभाष्य

१०७. " **भस्मना त्रिषवणं स्नायित । न चाद्भिर्विपरीतत्वात् ।**
—पासू १.२ सदर पासू वर कौण्डिन्यभाष्य

१०८. भस्मनि शयीत । पासू १.३ अनुस्नानम् पासू. १.४ सवनत्रये स्नानस्यान्तरेष भुक्तोच्छिष्टभुक्तनिष्ठोवितमूत्र पुरीषोत्सर्गादिनिमित्तकं...तदनुस्नानं कर्त्तव्यम् । —कौण्डिन्य भाष्य

१०९. **निर्माल्यम्** । पासू १.५

११०. **एकवासाः । अवासावा** पासू. १० व ११

अहिंसा, ब्रह्मचर्य, सत्य, अस्तेय व वैराग्य पाळणे यांना यम[111] म्हणतात. त्यांचे कसाशीने पालन करावे. न रागावणे (अक्रोध), गुरुसेवा, पावित्र्य मिताहार व अप्रमाद हे नियम[112] होत. या यम-नियमांचे कठोर परिपालन करावे या अवस्थेतील योग्यावर 'घाणेरड्या गोष्टी (मूत्र पुरीष) पाहू नयेत, स्त्रिया व शूद्र यांच्याशी भाषण करू नयेत' अशी बंधने आहेत. पण भस्म आणणे, भिक्षा मागणे, पाणी आणणे. इ प्रसंगी ही बंधने पाळता आली नाहीत तर भस्म लावून शुद्ध व्हावे असा पर्याय सांगितलेला आहे[113]

पाप झाडून टाकण्याचा उपाय म्हणून प्राणायाम सांगितला आहे तत्पूर्वी देवालयात देवाचे दक्षिणेला पूर्वेला किवा उत्तरेला तोंड करून पक्ष, स्वास्तक किंवा सर्वतोभद्र आसन घालून बसावे व २०,२४ किंवा ३० मात्रापर्यंत (तितकी निमिषे) सावकाश प्राणायाम करावा नाकाशी पद्मपत्र धरले तरी श्वासाने हलता कामा नये इतका सावकाश रेचक करावा.[114]

पापक्षालनार्थ साधकाने '**सद्योजातं प्रपद्यामि सद्योजाताय वै नमः**' मंत्र अर्थ ध्यानी घेऊन चिंतन करावे. त्यानंतर शिवैक्य साधण्यासाठी शिवध्यानासक्त होऊन शिवाप्रमाणे अट्टहास, नृत्य गीत झाल्यावर त्याच्या बैला (नंदी) प्रमाणे हुडुक्कार करावा[115] ही योगाचा प्रथमावस्था साध्य झाल्यावर त्याला ज्ञानप्राप्ती होते. पाप क्षीण होते. या पुढच्या अवस्थेत सार्वजनिक ठिकाणी मागे वर्णन केल्याप्रमाणे क्राथन, शृंगारण, अवितद्भाषण इ. पाच गोष्टी करून लोकनिंदा संपादन करून आपला पापविनाश करून घ्यावा.[116] लकुलीशाने मागे इंद्राने या पाशुपत व्रतांचे असुरांचे मध्ये पालन केले अशी पुरातन कथा नमूद केली आहे. या व्रताने त्याने असुराच्या इष्टापूर्तीचे हरण केले. म्हणून जरी योगी अनिंद्य कृती करणारा असला तरी लोक निंदा करतील असे वर सांगितलेले क्राथन, मंदन इ. करून त्याने आपली

---

११९. **अहिंसा ब्रह्मचर्यंच सत्यासंव्यवहारकौ ।
अस्तेयमिति पञ्चैते यमा वै संप्रकीर्तिताः ॥**

११२. **अक्रोधो गुरुशुश्रूषा शौचमाहारलाघवम् ।
अप्रमादश्च पञ्चैते नियमाः सप्रकीर्तिताः** पासू. पृ. १६

११३. पासू १.१२ ते १५ व त्यावरील कौण्डिन्यभाष्य

११४. पासू. पृ. ३८–३९ कौण्डिन्याने प्राणायामाबद्दलची माहिती ठिकठिकाणी दिली असली तरी ती येथे अनावश्यक म्हणून दिली नाही.

११५. रटो. १८–१९ पासू १.८ व भाष्य प्रथमावस्थेतील योग्याच्या दिनचर्येचे वर्णन प्रस्तुत विभागाच्या परिशिष्टात दिले आहे

११६. रटा पृ. १९

निंदा झाली तरी आपला मनाचा तोल न जाण्याची दक्षता घ्यावी.[११७]

ही योगाची दुसरी पायरी वा अवस्था असून यात **'वामदेवाय नमः'** इ. मंत्रावर चित्त एकाग्र करावयाचे असते. या विधीने रुद्राशी सामीप्य प्राप्त होते व अज्ञान, कालुष्य इ. नाहीसे होऊन पुनः संसारात यावे लागत नाही. हाच एक सर्वश्रेष्ठ सन्मार्ग (**सत्पथ**) आहे या व्यतिरिक्त इतर (सांख्य, योग, पाषंड इ.) कुमार्ग (**कुपथाः**) आहेत. [११८]

ज्यात प्रत्यक्ष शारीरिक क्रिया कराव्या लागतात त्या **'क्रियालक्षण'** योगाचे वरीलप्रमाणे कौण्डिन्याने विवेचन केले आहे.

**क्रियोपरमलक्षण योग** [११९]

हा वरच्या दर्जाचा – प्रगत अवस्था असलेला योग असून यात मनाच्या एकाग्रतेवरच मुख्य भर आहे सातव्या गणकारिकेतील 'जपध्यान' याचे विवेचन करताना भासर्वज्ञाने या अवस्थांचा विचार केला आहे

योगाच्या या तिसऱ्या अवस्थेत योगी ओसाड घरात (शून्यागारात) किंवा गुहेत एकांतवासात राहून '**अघोरेभ्यः**' इ. तिसऱ्या मंत्रावर मन एकाग्र करतो. या जपाचे प्रकार दोन: (१) प्रत्याहार (विषयांतून मन संपूर्ण काढून घेणे) ही फलनिष्पत्ती असलेला (प्रत्याहार-फल) व (२) समाधिफल आसक्तियुक्त जप १०० वर्षे केला तरी प्रत्याहार साध्य होणार नाही. हे खरे असले तरी भासर्वज्ञ म्हणतो की, प्रत्याहाराचे पर व अपर असे दोन प्रकार आहेत मुद्दाम जाणीवपूर्वक (**अन्तःकरणपूर्वकः**) केलेला जप अपर आहे. असा जप दीर्घकाळ केला की चित्त शुद्ध (निर्मळ) होते आणि नंतर ते आपोआप (**प्रयत्ननिरपेक्षमपि**) अलातचक्राप्रमाणे सारखा ब्रह्मस्पर्श करीत ब्रह्मामध्ये स्थिर होते. [१२०] हा जाणीवपूर्वक केलेला प्रत्याहार 'पर' (श्रेष्ठ) आहे

---

११७. पासू. १०१–१०४

११८. पासू ४.१६ ते २० अखेरची सूत्रे व त्यावरील कौण्डिन्यभाष्य
**सर्वविशिष्टोऽयं पन्थाः।** ४.१६, **सत्पथः।** ४.१७, **कुपथास्त्वन्ये अनेन रुद्रसामीप्यं गत्वा।** ४.१९, **न कश्चिद् ब्राह्मणः पुनरावर्तते।** ४.२०
समीपता किंवा सामीप्य ही मोक्षकल्पना लकुलीशकाळी रूढ होती असे दिसते.

११९. रटी. १९–२१ व पासू. वरील कौण्डिन्यभाष्याचे आधारे या क्रियोपरमलक्षण योगाचे विवेचन केले आहे

१२०. **प्रयत्ननिरपेक्षमपि ब्रह्मण्यवालातचक्रवदवतिष्ठते।**
पेटलेली मशाल (किंवा उदबत्तीसुद्धा अंधारात जर गरगर फिरवली तर जे तेजाचे वर्तुळ दिसते त्याला अलातचक्र म्हणतात.)

चौथ्या अवस्थेत स्मशानवास सांगितला आहे. (पासू पृ. ३०) योगी-साधकाने स्मशानात आकाशाखाली किंवा झाडाच्याखाली योगसाधनेत व्यत्यय येऊ न देता राहावे त्याने सुख-दुःखादि द्वंद्व-भावनावर मात करावी व ईश्वर चिंतनात निमग्न राहावे. या अवस्थेत '**तत्पुरुषाय विद्महे**' या मंत्रावर मन केंद्रीभूत करावे. भासर्वज्ञ म्हणतो : तो योगी अनेक जन्मातील साठलेले कर्म जाळून खांबावर खिळा ठोकावा असे मन एकाग्र करतो. (रटी पृ. २०) ही एकाग्रता धारणापूर्वक जपाने होते तो विद्यंने अनुगृहीत झालेल्या बुद्धीने स्वतःचे चित्त आलबन-शून्य करतो. अशा धारणेने चित्त निर्मळ करून रुद्रतत्त्वात जर स्थापन केले तर ते बराच काळ (**सुदीर्घकालम्**) चळत नाही. जपपूर्वक ध्यानापेक्षा असे धारणासहित ध्यान श्रेष्ठ (परम्) आहे. अशा योग्याने सर्व अवस्थांमध्ये असताना मृत्यू येईपर्यंत ध्यान करावे. असे देवाशी एकरूप होणाऱ्या योगाला 'निष्ठायोग' किंवा देव-नित्यता म्हणतात. अशा अवस्थेतील योग्याने भिक्षापात्रात येईल ते – मग ते मांस किंवा मीठ असले तरीसुद्धा – खावे (पासू पृ. ११९)

शेवटच्या (पाचव्या) अवस्थेत योग्याने पारमेश्वरी अवस्थेत इतका सखोल प्रवेश केलेला असतो की समाधिद्वारा पारमेश्वरी सामर्थ्य ज्ञानशक्ती, क्रियाशक्ती इ.) त्या जीवाचे (पशूचे) अंगी येते. '**ईशानः सर्वविद्यानाम्**' (पासू पृ. ४२-४४) या पाचव्या मंत्रात म्हटल्याप्रमाणे तो धर्म, अर्थ, काम व कैवल्य (मोक्ष) साधक विद्यांचा ईश होतो. ही सायुज्यावस्था आहे. या अवस्थेत जीव कायमचा (सदा) शिव होतो. (शिवः) (पासू पृ ४६, ४७) काश्मीरी शैवमतातील 'सदाशिव' अवस्थेच्या संकल्पनेचा कदाचित् हा आधार असेल अशा रीतीने काळजीपूर्वक साधना करून ईश्वरकृपेमुळे जीव दुःखान्ता (मोक्षा) प्रत जातो. (पासू ५.४०)

**परिशिष्ट**

## योग्याची दिनचर्या (प्रथमावस्था)

या ठिकाणी भासर्वज्ञानी आपल्या गुरूंनी आपल्याला कशा स्वरूपाच्या चर्येचे परिपालन करावयास सांगितले[121] याचे वर्णन केले आहे त्यावरून योगाच्या प्रथमावस्थेतील दिनचर्या लक्षात येईल.[122] प्रथम देहशुद्धी झाल्यावर भस्म लावावयाचे. सूर्योदयापूर्वी दोन घटका (४८ मिनिटे) ब्राह्मी, वैष्णवी व रौद्री

---

१२१. इत्याह भगवानाचार्यः स्वामी मम येनाहमज्ञानार्णवादुत्तारितः । रटी. पृ. १९

१२२. रटी. पृ. १८ व १९ चे आधारे

गायत्रींनी – या अनुक्रमाने-पूर्वाहूण–संध्या करावयाची. नंतर शिवाच्या दक्षिण-मूर्तीला समंत्रक भस्म लावावयाचे. पुढे शिवाला प्रदक्षिणा करून त्याच्या भस्माकडे पाहात भगवान् शिव सूर्यरूपी आहे, असे मानून ध्यान करावयाचे.[१२३] तदनंतर शिवतत्त्वामुळ ज्यांची दृष्टी प्रसन्न झाली आहे, (शिवतत्त्वानुरंजितदृष्टये) अशा आचार्यांना किंवा वडीलभावाला निवेदन करून एका स्वच्छ, पवित्र एकांत स्थळी जाऊन पाच दर्भ पसरून रौद्र सवनापर्यंत तेथे (ध्यानस्थ) राहावयाचे. नंतर भगवंताला प्रणाम करून 'मी तुझी आज्ञा परिपालन करीत आहे' असे म्हणून जप करत करत आपले शरीर आपादतलमस्तक भरपूर भस्माने घासावे – असेच मध्याहून व अपराहूण संध्येच्या वेळी स्नान करावे. मध्याह्न संध्येच्या वेळी प्रथम ब्राह्मी नंतर डोक्यावर सूर्य असताना रौद्री व शेवटी वैष्णवी अन् सूर्यास्ताचे वेळी प्रथम रौद्री, नंतर वैष्णवी व शेवटी ब्राह्मी असे (गायत्री) जप करावयाचे असतात. (भस्म, स्नान झाल्यावर जप करीतच शिव मंदिरात जाऊन शंकराला अतिशय भक्तीने नमस्कार करून हळूहळू देवाच्या गाभाऱ्यात प्रवेश करावा. नंतर शिव-मूर्तीच्या दक्षिणेला गुडघे टेकून व छातीशी हात जोडून मूर्तीमध्ये साक्षात् भगवान् शिव आहे असे मानून 'हसित' वगैरे क्रियांनी शिवाची सेवा (उपहार) करावी. नंतर शिवाचे ध्यान करून (शिवध्यानासक्तः) त्याने पुनः पुनः अट्टहास करावा. त्यानंतर गीत व नृत्य करावे. नंतर वर सांगितल्याप्रमाणे बसून शिवाचे ध्यान करीत हुडुक्कार करावा व नमस्कार करून जप करावा. या ठिकाणी जप व नमस्कार या मानसिक क्रिया आहेत, नृत्य ही कायिक व हसित, गीत व हुडुक्कार या वाचिक क्रिया आहेत. अट्टहास करताना तीन दीर्घ उच्छ्वास घ्यावेत. गीतनृत्याची तीन आवर्तने करावीत. तीन वेळेला हुडुक्कार करावा. साठ (मानसिक) नमस्कार करावेत व पाच दर्भांची तीन आवर्तने करावीत. शिवास असा षडङ्ग उपहार अर्पण केल्यानंतर 'मी तुमच्या आज्ञेने अवभृथ स्नान करतो' असे शिवाला निवेदन करावे नंतर गाभाऱ्याचे बाहेर येऊन शिवाला नमस्कार करून जप करीत सावकाश तीन प्रदक्षिणा घालाव्यात. नंतर अवभृथ स्नान करून लकुशीलापासून राशीकरा-अखेर सर्व तीर्थंकराना (आचार्य परंपरेला) भक्तीने नमस्कार करून एक (किंवा) स्वतःच्या इच्छेनुरूप अनेक प्रदक्षिणा जप करीत घालाव्यात.

संध्याकाळी देवालयाजवळ दिवसा उजेडी जी नीट, स्वच्छ, शुद्ध आहे असे पाहिले आहे अशी जागा वस्त्राने झाडून ती भस्माने पवित्र करावी. त्या ठिकाणी झोप येईपर्यंत जप करीत बसावे. नंतर मंत्रानी संस्कार करून खूप भस्म पसरावे व पाच मंत्रांचे (तै. आ १७. १–५) आवर्तन करीत झोपावे. (योगाचे) प्रथमा-वस्थेत असे विधीचे पालन केल्यावर पाप क्षीण होऊन ज्ञान प्राप्त होते.

---

१२३. सूर्यरूपिणं भगवन्तं...प्रसन्नदृष्टचा भस्म पश्यन्तं ध्यायेत्। —रटी पृ. १८

## चौथा 'अर्थ' : विधि

पाशुपत दर्शनातील चौथा 'अर्थ' विधि. यामध्ये साधकाचे विरक्त जीवन, त्यातील ईश्वरभक्तिपर विधि, आणि इंद्रियसंयम इ. महेश्वर प्राप्तीच्या मार्गातील तपशील यतात. लकुलीशमते प्रकृति, पुरुष इ. तत्त्वांचे शाब्दिक वा बौद्धिक ज्ञानाने कैवल्यप्राप्ती वा मोक्ष मिळत नाही. परमेश्वरी साक्षात्कारासाठी वा परमेश्वरासारखे ऐश्वर्य असलेला दुःखान्त हवा असेल तर त्यासाठी पाशुपत संप्रदायातील 'विधि' या चौथ्या अर्थाचे परिपालन केले पाहिजे. 'विधि' मध्ये येणाऱ्या चर्यावगैरे व्रतवैकल्यांचे वर्णन आतापर्यंत केले असल्यामुळे येथे 'विधि' चे संक्षिप्त वर्णन दिले आहे.

विधीचे प्रकार दोन : (१) प्रधान व (२) अप्रधान. प्रधान विधीमध्ये (अ) व्रत आणि (आ) द्वार यांचा समावेश होतो. (अ) व्रतामध्ये भस्मस्नान, भस्मशयन, उपहार, जप व प्रदक्षिणा येतात. यातील उपहारात शिवप्रसादासाठी शिवासारखे हसित (अट्टहास), गीत, नृत्य, हुडुक्कार, जप इ. चा. समावेश आहे (आ) 'द्वारा' मध्ये मागे वर्णन केलेले 'क्राथन', 'स्पन्दन', 'मन्दन', 'शृंगार', 'अपितत्करण' 'अपितद्भाषण' ह्या क्रिया येतात.

(२) अप्रधान विधीत स्नान व भैक्ष्य यांचा समावेश आहे.

'विधि' या 'अर्थाचे' तत्त्वज्ञान या दृष्टीने चर्चा करण्यासारखे काही नाही.

## पाचवा 'अर्थ'. मोक्ष (दुःखान्त)

दुःखांत अथवा ज्यामध्ये सर्व दुःखांचे निराकरण (**अपोह**) असते[१२४] हा पाशुपत मतातील शेवटचा 'अर्थ'. याचे ज्ञान होणे हा परमपुरुषार्थाचे साधन असल्यामुळे त्याला जरी 'अर्थ' अथवा 'तत्त्व' म्हटले तरी दुःखान्त हा एका दृष्टीने परमपुरुषार्थरूपच आहे. याच्या प्राप्तीसाठी भस्मस्नानादि विधीसह जपध्यानादि योग सांगितला आहे. तथापि मनुष्य कितीही ज्ञानवैराग्यशील असला तरी ईश्वरी अनुग्रहाशिवाय दुःखान्त प्राप्ती होत नाही.[१२५]

दुःखान्ताचे प्रकार दोन : (१) अनात्मक व (२) सात्मक. अनात्मक दुःखान्त म्हणजे दुःखाचा अत्यंताभाव. ही न्याय-वैशेषिकांची अभावात्मक मोक्षकल्पना आहे. पाशुपत म्हणतात– दगडाला दुःख नसते. सर्व दुःखाचा अत्यंत उच्छेद–

---

१२४. गका पृ. ९

१२५. **तस्मात् प्रसादात् स दुःखान्तः प्राप्यते ।**
**न तु ज्ञानवैराग्यधर्मैश्वर्यत्यागमात्रात् । —पासू. पृ. ६**

दुःखरहितता–किंवा मोक्ष पाषाणामध्ये आढळते त्यामुळे या अभावात्मक अवस्थेला अनात्म, खालच्या अवस्थेचा मोक्ष (अपरमोक्ष) म्हटले आहे. सात्मक दुःखान्त किंवा 'परमोक्ष' ऐश्वर्ययुक्त असतो. ऐश्वर्ययुक्त म्हणजे ज्या अवस्थेत दृक्शक्ती (धी–शक्ति किंवा ज्ञान) व क्रियाशक्ती असते. असा दुःखान्त. दृक्शक्तीमध्ये दर्शन, श्रवण मनन, विज्ञान आणि सर्वज्ञत्व यांचा समावेश होतो दर्शनशक्तीमुळे परमाणु इतके सूक्ष्म, लपलेले किंवा कशाचेही आड असलेले (उदा. भिंतीपलीकडील), फार दूरचे पदार्थ दृग्गोचर होतात व स्पर्श, गंध, रस इ. विषयांचे असेच व्यापक ज्ञान होते. श्रवणशक्तीने अशेष-शब्दविषयकसिद्धिज्ञान मिळते. सूक्ष्म, दूरस्थ पशुपक्ष्यांना केलेल्या शब्दांचे ग्रहण करण्याच्या सिद्धींचा यात अंतर्भाव होतो. मननामुळे शास्त्रादिसाधनावर अवलंबून न राहता केवळ चिंतनाने सर्व विषयांचे ज्ञान होते. 'विज्ञान' म्हणजे सर्वशास्त्र.

ग्रंथांचे निःसंदिग्ध पांक्त (अमुक ओळीचा असा अर्थ आहे असे सांगण्याइतके) ज्ञान शास्त्रप्रवचनाला असे विज्ञान अर्थातच फार उपयुक्त असते. शेवटी 'सर्वज्ञत्व म्हणजे उक्त, अनुक्त विषयांविषयी संक्षिप्त व विस्तृत असे दोन्ही प्रकारचे तत्त्वव्याप्त व नेहमी उदित असलेले सिद्धिज्ञान.[१२६] या पाच प्रकारच्या दृक्शक्तीला धीशक्ति असेही म्हणतात.

क्रियाशक्ति तीन प्रकारची आहे.[१२७] (१) मनोजवित्व (२) कामरूपित्व व (३) विकरण–धर्मित्व या पैकी (१) मनोजवित्व म्हणजे मनोवेगासारखे अत्यंत शीघ्रगतिकत्व असा अर्थ नसून 'संकल्प करताक्षणीच सिद्धी होणे.' असा आहे.

---

१२६. तत्र दृक्शक्तिरेकाऽपि विषयभेदात्पञ्चविधोपचर्यते ।
**दर्शनं श्रवणं मननं विज्ञानं सर्वज्ञत्व चेति ।**
**तत्र सूक्ष्मव्यवहित-विप्रकृष्टाशेषचाक्षुषस्पर्शादिविषयं ज्ञानं दर्शनम् ।**
**अशेषशब्दविषयं सिद्धिज्ञानं श्रवणम् ।**
**समस्तचिन्तविषयं सिद्धिज्ञानं मननम् ।**
**निरवशेषशास्त्रविषयं ग्रन्थतोऽर्थतश्च सिद्धिज्ञानं विज्ञानम् ।**
**स्वशास्त्रं येनोच्यते ।**
**उक्तानुक्ताशेषार्थेषु समास विस्तरविभागविशेषतश्च तत्त्वव्याप्त-सदोदित –सिद्धिज्ञान सर्वज्ञत्वमित्येषा धीशक्तिः ।**
—माधव, सदंस, पृ. ७३

१२७. तत्र निरतिशयशीघ्रकारित्वं मनोजवित्वम् ।
**कर्मादिनिरपेक्षस्य स्वेच्छयैवानन्तसलक्षणविलक्षणसरूपकरणाधिष्ठातृत्वं कामरूपित्वम् । उपसंहृतकरणस्यापि निरतिशयैश्वर्यसम्बन्धित्वं विकरणधर्मित्वमित्येषा क्रियाशक्तिः ।** —माधव, उपर्युक्त, पृ. ७३.

प्रजापतीप्रमाणे प्रथम संकल्प, नंतर त्यासाठी तपश्चर्या आणि मग विश्वोत्पत्ती असे संकल्प व सिद्धि यांमध्ये कालिक अंतर न राहता संकल्पमात्रे करून सिद्ध किंवा निर्मिती हा ' मनोजवित्वा'चा अर्थ आहे.[१२८] (१) याला माधवाने ' शीघ्रकारित्व ' म्हटले आहे. (२) कामरूपित्व म्हणजे (अ) सलक्षण ( = मनुष्य, पशु, पक्षी इ. लक्षण युक्तरूप), (आ) विलक्षण ( = मनुष्य, पशु, पक्षी इ. भिन्नयोनींचे भिन्न अवयव धारण केलेले रूप) व (३) सरूप (स्वतःसारख्या किंवा इतरांसारखी अनेक रूपे एकसमयावच्छेदे करून धारण करणे) याला कामरूपित्व मानतात. कारण त्याला रुद्रसायुज्य प्राप्त झाल्यामुळे ' त्याच्या करणांच्या (इंद्रियादि शक्तींच्या) सर्वव्यापित्वामुळे तो जेथे जे रूप घेतो त्याठिकाणी त्याची बुद्धी आदि करणे (साधने) त्याला प्राप्त होतात[१२९] पासू. च्या व माधवाचा विवेचनाचा अर्थ इतकाच की तो स्वेच्छने कोणतेही, कसलेही आणि कितीही रूप/रूपे धारण करू शकतो.[१३०]

कौण्डिन्याचे मते ' विकरण धर्मित्व म्हणजे करणांचा (इंद्रियांचा) अभाव असताना सुद्धा प्रभुत्व. त्यांचे मते 'करण ' हे सूक्ष्म, विशिष्टत्वपूर्ण ग्राहक असल्यामुळे करणाचा प्रतिषध केला की कार्याचा प्रतिषेध होतो. म्हणून विकरण म्हणजेच कैवल्य .[१३१] पण भासर्वज्ञ व माधव थोड्या निराळ्या भाषेत सांगतात. " ज्याची इंद्रिये लीन झाली आहेत (उपसंहृत) व ज्याने आपल्या इंद्रियांना विषयापासून निवृत्त केले आहे अशा पुरुषाचा निरतिशय ऐश्वर्याशी संबध होणे.' म्हणजे विकरण–धर्मित्व.[१३२]

सारांश सात्मक दुःखान्त म्हणजे सिद्धावस्था दिसते व ती योगयुक्त झाल्याने प्राप्त होते.

अशा सिद्ध पुरुषाला दूरदर्शन, दूरश्रवण इ. आठ सिद्धी व सर्वज्ञता प्राप्त होते.

---

१२८. पासू. पृ. ४४

१२९ पासू. पृ. ४४–४५

१३०. कर्मान्निरपेक्षस्येच्छयैवानन्तररूपकर्तृत्वाधिष्ठातृत्वम् । भासर्वज्ञ, रटी, पृ. १०

१३१. विः विनाशे विना करणे । विकरणो भवति । करणप्रतिषेधात् कार्यप्रतिषेधः-
कृतःभवति । अकस्मात् ? विशिष्टत्वाद् ग्राहकत्वात् सूक्ष्मत्वाच्च करणानाम् ।
तस्माद् विकरण इतिकैवल्यम् । -- पासू पृ. ४५

१३२. सम्भृतकार्येन्द्रियस्यापि निरतिशयैश्वर्यसम्बन्धित्वं विकरणधर्मित्वम्
गका. पृ. १०

तो सर्वस्वी स्वावलंबी (अ-पराधीन)[१३६] असल्यामुळे तो 'अ-वश्य' असतो त्याचे जीवित इतरापासून संपूर्ण सुरक्षित असल्यामुळे तो स्वतः अवध्य असतो पण इतर त्याचे कडून वध्य असतात ; तो सर्व भयापलीकडे असल्यामुळे 'अभीत' असतो ; त्याचा (वर वर्णिलेला) वर्णन केलेल्या ऐश्वर्याची नित्यसंबंध असल्यामुळे तो 'अक्षय' असतो ; शरीराचे व इंद्रियांचे वैकल्य त्याचे ठायी नसल्यामुळे तो 'अजर' असतो. आणि प्राणादिकांच्या वियोगाने दुःख त्याला स्पर्श करीत नसल्यामुळे तो 'अमर' असतो अशी पाशुपतांची सिद्धावस्थेबद्दलची कल्पना आहे.

सांख्य किंवा योग या दर्शनात कैवल्य–प्रकृती पासून पुरुषाची संपूर्ण फारकत म्हणजे मोक्ष असे मानतात. घट फुटल्यानंतर घटाकाश जसे महदाकाशात विलीन होते त्याप्रमाणे उपाधिनाशानंतर वैयक्तिक जीवाचे (आत्म्याचे परमात्म्यात विलीनकरण होणे म्हणजे मोक्ष असे वेदांती मानतात. कौण्डिन्याने 'सांख्य व योग यांची मुक्तिकल्पना अधू दृष्टीच्या माणसाला चंद्रदर्शन होण्यासारखी अविशुद्ध आहे, पाशुपत मते आत्मा केवळ 'मुक्त' न होता परमेश्वराशी 'युक्त' होतो, असे म्हटले आहे.[१३४] पाशुपत मुक्तत्वापेक्षा परमेश्वराशी 'युक्त' असण्याला अधिक महत्त्व देतात त्यांच्या मते वेदांताप्रमाणे मुक्तावस्थेत 'थेंबुटा सागरी मिळाला' असे मुक्ताचे विलिनीकरण होत नाही.

त्या आत्म्याचे व्यक्तिमत्त्व कायम राहते, पाशुपतमतात मुक्तत्वापेक्षा परमेश्वराशी अथवा महेश्वराशी युक्त असण्याला अधिक महत्त्व दिलेले आहे हे तर सांगितलेच आहे. पाशुपतसूत्रात मुक्तत्वाची पुढील प्रमाणे लक्षणे दिली आहेत : मुक्तत्व युक्त असलेला तो असंग असतो म्हणजे तो वर्तमान, भूत व भविष्य विषयांच्या अनुचिन्तनापासून सर्वस्वी अलिप्त (असङ्ग) असतो. 'महेश्वराचे ठिकाणी संपूर्ण भावनिक अनुरक्ति (भावस्थितिः) म्हणजे असङ्गत्व'[१३५] आत्मा व ईश्वर यांच्या

---

१३३. निरतिशयमपराधीनत्वमवश्यम् । सत्वान्तराधीनजीवितरहितत्वमवध्यत्वम् । ऐश्वर्येण नित्यसम्बन्धित्वमसक्षयत्वम् । समस्तभयातिक्रान्तत्वमभयत्वम् । कार्येन्द्रियवैकल्यफलेनासम्बन्धित्वमजरत्वम् । प्राणादिवियोगजदुःखासंस्पर्शित्वममरत्वम् । —ग. का. र. टी. १०

१३४. एवं यत् साङ्ख्यं योगश्च वर्णयति असङ्गादियुक्ताः मुक्ताः शान्ति प्राप्ता इति, तदविशुद्धं तेषां दर्शनम् । तैमिरिकस्य चक्षुषश्चन्द्रदर्शनवत् । अयं तु युक्त एव न मुक्त इति विशुद्धमेतद्दर्शनम् । —पासू. ११५

१३५. आसङ्गित्वमप्यतीतानागतवर्तमानानां विषयाणामनुचिन्तनं भिक्षुवत् । एवं महेश्वरे भावस्थितिस्तदसङ्गित्वम् । —पासू. ५.१ व भाष्य

संयोगास योग म्हणतात. केवळ रुद्रतत्त्वामध्ये योग्याचे चित्त इतके मग्न झालेले असते की कितीही मोठे आवाज झाले तरी त्याची तल्लीनता भंग पावत नाही. अशा तल्लीन झालेल्याला योगी म्हटले आहे. त्याचा आत्मा महेश्वराचे ठिकाणी नित्य स्थित असतो.[१३६] साधक व महेश्वर दोघेही नित्य व विभु असतात. पण जेव्हा पशूच्या (जीवाच्या) चित्तवृत्ती विषयाकडे न जाता महेश्वराचे ठिकाणी स्थिर राहतात तेव्हा त्याला नित्य म्हणतात.[१३७] असा उपाधिमुक्त, मलरहित आत्मा झाला की त्याचे ठिकाणी विषयांचा किंवा आंतर किंवा बाह्य चित्तवृत्तीचा (**विचित्तत्व**) प्रादुर्भाव होत नाही. हे त्याचे अजत्व आहे,[१३८] असा इच्छाद्वेष इ. प्रवृत्तीपासून संपूर्णतया निवृत्त होऊन परमसमता प्राप्त होऊन[१३९] सर्वभूतांमध्ये स्थित असणारा जो महेश्वर आहे त्याचे ठिकाणी त्याचे चित्त स्थित असते आणि हे सर्व इंद्रियजयाने (**इंद्रियाणामभिजयात्** –पासू ५.७) प्राप्त होते. ही ब्राह्मी स्थिति 'याचि देही याच डोळा' होते असे भगवान पशुपतीचे मत आहे (पासू. ५.८)

## समालोचन

लकुलीश पाशुपत मुख्यत: वैदिक (तैत्तिरीय) परंपरेतून आले असून ते द्वैताद्वैत मताचा पुरस्कार करते. लकुलीशाचे काळी तत्त्वज्ञान, उपासना व धर्म यांच्या सीमारेषा अस्पष्ट असाव्यात. कारण (पति), कार्य (पशू) या तत्त्वज्ञानात्मक 'अर्थांची', योग व विधि या दुःखांत प्राप्तीच्या 'अर्थांची'–साधनमार्गाशी–जोडणी पासू १.१ मध्ये आढळते कदाचित् तत्त्वचर्चेपेक्षा मोक्षमार्गासाठी आवश्यक असणाऱ्या साधनमार्गाचे विवेचन करणे हा लकुलीशाचा मुख्य उद्देश असावा.

लकुलीशाचे काळी ('अन्यत्र' असा उत्तरकालीन ग्रंथकारांनी उल्लेखलेले 'पाशुपत' संज्ञा असलेले) दुसरे एक शैवमत रूढ असावे. त्या मताप्रमाणे (कदाचित

---

१३६. आत्मेश्वरसंयोगो योग: प्रत्येतव्य: ।
उक्तं हि– शङ्ख-दुन्दुभिनिर्घोषैर्विविधैर्गीतवादितै: ।
क्रियमाणैर्न बुध्येत एतद् युक्तस्य लक्षणम् ॥ —पासू ५.२ व भाष्य
केवलरुद्रतत्त्वावस्थितचित्तत्वं योगित्वम् । —गका पृ. १६

१३७. नित्यत्वं नाम सति विभुत्वे पुरुषेश्वरयोर्मनसा सह गतस्यात्मतामावस्य वृत्त्याकारस्य विषयं प्रति क्रमोऽक्षोपोऽवस्थानं वृक्षशकुनिवत् ।
तस्मिन निवृत्ते महेश्वरो युक्तो नित्य इत्युच्यते । —पासू १११
अनुरुध्यमानचित्तवृत्तित्वं नित्यात्मत्वम् । —ग. का. पृ. १६

१३८. अज: । पासू ५.४
अप्रादुर्भावविचित्तत्वम् । गका पृ. १६

१३९. परमसमता मैत्रम् । गका पृ. १६

न्यायवैशेषिकांचे हे पूर्वरूप असेल) 'सर्वदुःखोच्छेद' म्हणजेच दुःखान्त अथवा अपवर्ग (मोक्ष). अथवा लकुलीशमतात मोक्षावस्थेत केवळ दुःखान्त नसून त्यात परमैश्वर्यप्राप्ती येते. मुक्तात्म्याच्या ठिकाणी परमेश्वराचे गुण असतात कारण तेही परमेश्वराप्रमाणे पुरुष असून दुःखजोवरहित असतात.[१४०] या संकल्पनेत रामानुज किंवा मध्व या वैष्णवांचा दास्यभाव बसणार नाही कारण परमात्म्याचे दास्य झाले तरी त्यामुळे परतंत्रत्व व 'दुःखावहत्व' येते.[१४१]

लकुलीशकालीन त्या दुसऱ्या शैवमतात असत्कार्यवाद मान्य केला आहे पण लकुलीश-मतात कला, विद्या पशु ही कार्ये नित्य मानली आहेत तिसरा फरक असा की त्या शैवमतात निमित्त व उपादान हो स्वतंत्र कारण मानली असून शिव हा जगदुत्पत्तीसाठी प्रधानादिकारणावर (न्यायवैशेषिकमते परमाणु व कर्म यावर) अवलंबून म्हणजे 'अस्वतंत्र' मानला गेला आहे पण लकुलीशमते भगवान् शिव स्वतंत्र उपादानादी कारणांवर अवलंबून नसणारा आहे तसेच लकुलीशमतातील विधीमुळे दुसऱ्या मतातील विधि-प्रमाण स्वर्ग प्राप्ती व पुनर्जन्म मिळत नसून परमशिवाशी समीपतादि मुक्ती मिळून जन्ममरणपरंपरा संपते[१४२]

वरील तुलनेत सिद्धान्त शैवमताचे जगदुत्पत्तीमधील शिवाच्या पारतंत्र्याचा (कर्मावर अवलंबून असण्याचा) समावेश झाला आहे. त्याचे मते कर्मावलंबन हे पारतंत्र्य नाहीच. राजा कोषाध्यक्षास आज्ञा करून त्याच्या मार्फत देणगी देतो म्हणजे राजा परतंत्र ठरत नाही. कर्त्याने दुसऱ्याच्या प्रेरणेचा विषय न होता कारणादिकांना प्रेरणा देणे हेच त्याचे स्वातंत्र्य त्याला कर्मादिकांची ही अपेक्षा नसणे म्हणजे स्वातंत्र्य नव्हे.[१४३]

पाशुपतमतामध्ये शिवाच्या स्वातंत्र्याचा-उपादान, कर्म इ. कशावरही

---

१४०. मुक्तात्मानश्च परमेश्वरगुणसंबन्धिनः पुरुषत्वे सति समस्तबीजविधुरत्वात् परमेश्वरवत् । —व द. सं. पृ. ७१

१४१. व.द.सं नकुलीशपाशुपतदर्शन-प्रस्तावना पृ. ७१

१४२. अन्यत्र दुःखनिवृत्तिरेव दुःखान्तः । इह तु पारमैश्वर्यप्राप्तिश्च । अन्यत्राभूत्वा भावि कार्यम् । असत्कार्यवादः । इह तु नित्यं पश्वादि । अन्यत्र सापेक्षं कारणम् । इह तु निरपेक्षो भगवानेव । अन्यत्र कैवल्यादिफलको योगः । इह तु पारमैश्वर्यदुःखान्तफलकः । अन्यत्र पुनरावृत्तिरूपस्वर्गादिफलको विधिः । इह तु पुनरपुनरावृत्तिरूपसामीप्यादिफलकः । —ष. द. सं. पृ. ७५

१४३. स्वतन्त्रस्याप्रयोज्यत्वं करणादिप्रयोक्तृता ।
कर्तुः स्वातन्त्र्यमेतद्धि न कर्माद्यनपेक्षता ॥ —सिद्धगुरू, षदसं पृ. ७८ वर उद्धृत

अवलंबून नसल्याचा–गौरव केला व कर्म करणारा पुरुष फलासाठी महेश्वरावर अवलंबून असतो. भगवान ईश्वर कर्मावर वा ते करणाऱ्या पुरुषावर तसा (अवलंबून) नसतो असे त्याचे 'अकर्मापेक्षित्व' असले तरी तो जगदुत्पत्तीत् कार्य–कारणभाव पाळतो तो कार्याचे स्वरूप वा मर्यादा बदलत नाही. उदा. मुक्तात्म्यांना पुन: दु:ख वा पुनर्जन्म देत नाही.

कौण्डिन्याने '**सार्वकामिक इत्याचक्षते**' (पासू. २.६) सूत्रावर मुद्दाम शंका उपस्थित केली आहे.

'कामित्व' म्हणजे 'तत्त्व–वैधर्म्य' (तत्त्वाचे स्वरूप विपरीत करणे) किंवा 'कार्याचे रूपांतर करणे' किंवा 'आत्म्याच्या मुक्तावस्थेतून बद्धावस्थेत रूपांतर करणे' असे कशाचे काहीही करणे आहे का ? त्याचे उत्तर स्पष्टपणे 'नाही' हे पुढील शब्दात व्यक्त केले आहे:

**आङ्गति कार्यकारणत्वम आत्मनो मुक्तानां च मर्यादा । तदुच्यते–उत्पाद्यानुग्राह्य (तिरोभाव्य) कल्पकत्वाभावकत्वेनापरिणामित्वम्, आत्मनो मुक्तानां च पुनर्दुःखैरसंयोजनमित्येषा कारणमर्यादा । स्थाप्या च कार्यमर्यादा । तदुच्यते-उत्पाद्यानुग्राह्यतिरोभाव्यकाल्यविकार्यमर्यादा । तदन्यचोद्याधिष्ठेयत्वं च ।** पासू पृ ६०–६१

या उताऱ्याचा मराठी गोषवारा वर दिला आहे या मतात ईश्वराचे स्वतंत्र संकल्प सामर्थ्य मान्य केले असले तरी ते कार्य-कारणभावाने किंवा बुद्धिवादित्वाने मर्यादित आहे. कांतिचंद्र पांडे त्याला rationalistic Voluntarism (बुद्धिवादी संकल्पशक्तिवाद) ही संज्ञा देतात. परंतु हा चिद्विलासवाद नव्हे चित् व अचित् हा भेद पाशुपत मानतात पण '**कलितासनम्**' (पासू २–५) या सूत्रावरील कौण्डिन्य-भाष्यात म्हटल्याप्रमाणे विद्या, कला पशु ही कार्ये आकाशातच ताऱ्यांचा उदयास्त होतो त्या प्रमाणे पशुपतीच्या शरीरातच उत्पन्न होतात व काही काल स्थित राहून नंतर लयाप्रत जातात. हेच पतीचे (शिवाचे) पतित्व, शक्ती, सामर्थ्य, ऐश्वर्य व स्वभाव (सद्भाव:, सतत्वं, तत्त्वधर्म:) आहे…म्हणून अव्यय, अमृत असलेला भगवान आपल्या इच्छेनुरूप स्वत:च्या शक्तीचे ठिकाणी असलेल्या कार्यात स्वत:च्या शक्तीने वास करतो म्हणून कार्य आणि कारण एकत्रित वास करतात.[१४४]

---

१४४. **अत्र त्रिविधेन कार्येण विद्याकलापशुसंज्ञकेन तत्रैव स्थित्युत्पत्तिप्रलयान प्राप्नुवता कलितं शोभितसंज्ञितं, नभस्ताराभिरिवेत्यर्थ: ।**

**आह – यदेतत् पत्यु: पतित्वं शक्ति: सामर्थ्यमैश्वर्यं स्वगुण: सद्भाव: सतत्त्वं तत्त्वधर्म:, तद् आसनम् ।...**

**अतोऽव्ययोऽमृतो भगवान् कामत: स्वशक्तिस्थं कार्यं स्वशक्त्या अध्यास्ते । तस्मादासनस्थं कार्यं कारणं चेति ।** –पासू २.५ पृ. ५८

पुढे पासू ९ वरील भाष्यात कौण्डिन्याने 'कारणगुण' शिवाचे वैशिष्टच व्यक्त करणारी पतित्व, सत्त्व, आद्यत्व इ. गुणांची जो यादी[१४५] दिली आहे त्यावरून पाशुपत आत्मा व परमात्मा, चित् व अचित् असा भेद मानत असले तरी ते सर्व शिवाचे शरीरातच आहेत असे म्हटले आहे 'भेदाभेदवाद' मांडण्याची त्या प्राचीन भाष्यकाराची ही विशिष्ट पद्धत आहे. पुढे '**उभयं तु रुद्रे देवा पितरश्च**' पासू २-११ चे विवेचन करताना 'देव व पितर यांची उत्पत्ती-स्थिति-लयादी कार्ये रुद्रशक्तीमध्ये होतात' (**ते देवपितरो रुद्रशक्त्यां हार्य-धार्य-कार्यत्वेन वर्तन्ते**) आणि या त्रिविधकार्यात प्रतिष्ठा, संयोग, वियोग ..बंध, मोक्ष देणारा... व सर्वांना व्यापणारा रुद्र 'पर (श्रेष्ठ) कारण' आहे... म्हणून ज्यांना दु:खान्त (मोक्ष) हवा असेल त्यांनी देव-पितरांची पूजा-उपासना न करता भगवान् महेश्वराची करावी असा पाशुपत शास्त्राचा निर्णय आहे' असे म्हटले आहे. [१४६]

---

१४५. **के कारणगुणा इति। तदुच्यते – पतित्वसत्त्वाद्यत्वाजातत्वोत्पादकानुग्राहक-तिरोभावकत्व (तपावावेदे ?) (वाम) देवज्येष्ठरुद्रकामित्वम् इ.**
　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　　–पासू २.९ पृ. ६२

१४६. **देवपितृवत् सत्त्वस्य त्रिविधस्यापि कार्यस्येश्वरे प्रतिष्ठा-प्रसव-संयोग-वियोग-सुख-मोह-बन्ध-मोक्षदातृत्वेन स एव परं कारणं समस्तत्वेनाप्यते... तस्माद् दु:खान्तार्थिना ते देवपितरो न यष्टव्या:। तदर्थे भगवान् महेश्वरो यष्टव्य:।** –पासू २.११ पृ. ६४

▭ ▭

# प्रकरण २ रे : काश्मीरी शैवमत

## (संक्षेप)

'काश्मीरी शैवमत' संज्ञा संदिग्ध – येथे 'स्वातंत्र्यवाद' किंवा 'शिवाद्वयवाद' अथवा 'त्रिकशास्त्र' अभिप्रेत. 'त्रिक' साहित्याचे (शास्त्राचे) तीन भाग– (१) आगमशास्त्र, (२) स्पन्दशास्त्र आणि (३) प्रत्यभिज्ञाशास्त्र.

आगमशास्त्र प्रमुख ग्रंथ वसुगुप्तकृत 'शिवसूत्र' व त्यावरील टीका - स्पन्दशास्त्र - स्पन्दकारिका व तिच्यावरील टीका – प्रत्यभिज्ञाशास्त्र – प्रवर्तक – वसुगुप्त शिष्य सोमानंद: 'शिवदृष्टि' – परमतखण्डन, उत्पल देवकृत 'ईश्वरप्रत्यभिज्ञा' – अभिनवगुप्तः ईश्वर प्रत्यभिज्ञेवर दोन टीका, तंत्रालोक, तंत्रसार, परमार्थसार – क्षेमराजः प्रत्यभिज्ञाहृदय. जयरथ 'तंत्रालोक' टीका – महेश्वरानंद कृत 'महार्थमज्जरी.'

**काश्मीरी शैव तत्त्वज्ञान :**

अंतिमतत्त्व 'परमशिव': चित्, परासंवित्, नामरूपातीत, स्थलकालातीत, विश्वात्मक, विश्वोत्तीर्ण ब्रह्म ज्ञानस्वभाव पण शिव 'प्रकाश–विमर्श' मय 'विमर्श' कल्पना स्पष्टीकरण – औपनिषद् ब्रह्म निष्क्रिय 'शांत', काश्मीरी शैवातील 'सदाशिव' – तत्त्वासारखे परमशिवाच्या विमर्शामुळे विश्वाची उत्पत्ती, स्थिती, संहार – चित् किंवा परासंवित् परमशिवाची शक्ती – शिवशक्तीचे अभिन्नत्व – परमशिवाचे पाच शक्तिविशेष – १ चित्, २ आनंद, ३ इच्छा, ४ ज्ञान, ५ क्रिया

१ चित् – स्वतंत्र, विश्वसिद्धिहेतु (मायावाद अमान्य) प्रकाशरूप – शिवाचा स्वभाव.

२ आनन्द – शिवाचा स्वभाव, उपादानावर अवलंबून नाही. स्वतंत्र – ब्रह्म 'सच्चिदानंद', परमशिव 'चिदानदघन.'

३. इच्छाशक्ती – 'तथाबुभूषुलक्षणा' – या शक्तीमुळे परमेश्वरास 'सदाशिव' किंवा 'सदाख्य' संज्ञा–

४. ज्ञानशक्ती – 'आमर्षात्मकता' यामुळ 'ईश्वर' संज्ञा

५. क्रियाशक्ती – उपादानाशिवाय स्वतःच्या पार्श्वभूमीवर निर्मिती.

शिवाची पञ्चकृत्ये : (१) सृष्टि, (२) स्थिति, (३) संचार, (४) विलय किंवा पिधान, (५) अनुग्रह-अनुग्रहाशिवाय मोक्ष नाही.

## तत्त्वे

तत्त्वसंख्या ३६ पैकी २४ सांख्य - त्रिकमतात पुढील १२ तत्त्वे अधिक मानतात १ शिव – इच्छा–ज्ञान क्रियात्मक केवळ पूर्णानंद स्वभाव.

२. शक्ती – परमशिवाची जग निर्माण करण्याची इच्छा – शिवशक्ति समावेशनाशी साम्य.

३ सदाशिव किंवा सादाख्य – विश्वविकासात ज्ञान व क्रिया या दोन शक्ती असून ज्ञानप्रधान असलेले – अहन्ताप्रधान व इदन्तेची (विश्वाची) अस्फुट जाणीव आन्तरिक उन्मेषदर्शक – सदाशिव तत्त्वानुभूतीने महामंत्रेश्वरत्व प्राप्ती.

४ ईश्वर अथवा ऐश्वर्यतत्त्व – 'विश्वोन्मेष-बहिरुन्मेष-इदन्ता व अहन्ता सारख्या प्रमाणात या तत्त्वाच्या साक्षात्काराने मंत्रेश्वरत्व.

५ सद्विद्या किंवा शुद्ध विद्या तत्त्व- अहन्ता व इदन्ता यांचे समानाधिकरण्य क्रियाशक्ति प्रबल. १ ते ५ परमशिवाचे तिरोधान करीत नाहीत म्हणून 'शुद्धाध्वन्'

## अशुद्धाध्वन्

६ माया– शिवतत्त्व तिरोधक विभेद बुद्धी निर्माण करणारी परमेश्वराची माया–शक्ति. वास्तव सत्य. ७–११

मायेची पाच कंचुके : (१) कला, (२) विद्या (३) राग, (४) काळ (५) नियति

१२ पुरुष -माया शक्तीने मर्यादित केलेला परमशिव शक्तिसंकोचामुळे 'अणु' संज्ञा – अहन्तावेदक (Subjective manifestation in अहमिदमस्मि) १३ प्रकृति – प्रत्येक पुरुषास स्वतंत्र प्रकृति – इदन्तावेद्यत्व (objective manifestation) महत् ते पृथिवी अखेरच्या तत्त्वांचे मूल कारण – गुणसाम्यावस्था

१४-१६ अंत:करण (मानसिक क्रियात्मक तत्त्वे) (१४) बुद्धी (१५) अहंकार (१६) मन ह्यांचा समुदाय म्हणजे अंत:करण.

(१४) बुद्धी–निश्चयकारिणी ज्ञानशक्ती, सत्त्वप्रधान

(१५) अहंकार–हे माझे आहे। नाही अशी ममत्वभावना–मुख्यत: रजोगुण प्राधान्य

(१६) मन -- संकल्प–विकल्प कारक-मुख्यत: तमोमय.

(१७-३१) इंद्रियानुभूतीची तत्त्वे- ५ ज्ञानेंद्रिये, ५ कर्मेंद्रिये व ५ तन्मात्रे· (३२-३६) जडतत्त्वे-महाभूते (Principles of materiality) त्यांचा तन्मात्राशी संबंध व कार्य

**स्वातंत्र्यवाद** – परमशिवाचे वैशिष्टच – माया किंवा इतर बाह्य उपादानावर अवलंबून न राहता इच्छामात्रे करून विश्वाची उत्पत्ती, स्थिती, लय करण्याचे सामर्थ्य –Free absolute sovereign will हे परमात्म्याचे ऐश्वर्य-अभिनवगुप्ताचे मत – विश्वाच सत्यत्व शंकराचार्यांच्या विवर्तवादापेक्षा भिन्न (उलट)

**आभासवाद** – परिणामवादापेक्षा भिन्न -परमशिवाचे किंचित् (ईषत्) प्रकटीकरण-मयूरांडरस विश्व हे आरशातल्याप्रमाणे परतत्त्वात (आत्मभित्तौ) पडलेले महेश्वराच्या ऐच्छिक स्वरूपाचे (ideation) प्रतिबिंब–आरसा जड, प्रकाशशून्य व बाह्य वस्तू प्रतिबिंबित करणारा पण शिव स्वयंप्रकाश, विमर्शयुक्त —समुद्र व लाट अधिक सयुक्तिक दृष्टान्त.

**षडध्वा**

गूढ व सांप्रदायिक विषय – पराशक्तीच्या प्रकटनाच्या (विश्वसर्जनाच्या) प्रक्रियेची निराळ्या दृष्टिकोणातून व निराळ्या परिभाषेत केलेली माडणी— संज्ञांचे स्पष्टीकरण–

(१) नाद– मूलत: अमर्याद, सर्जनशील शक्तीचे प्रवाह सातत्य (Basic continuum of power)

(२) बिंदु– नाद घनीभूत होणाऱ्या सर्जनशील (Dynamic) केंद्राची संज्ञा. ही घनीभवनाची प्रक्रिया स्थलकालातीत म्हणून बिंदू प्रदेशव्यापक नसतो–बिंदू 'चिद्घन' त्यात अविविक्त (undifferentiated) अवस्थेतील विश्व सुप्त (potential) असणारे 'संपुंजित चैतन्य' (massive consciousness) हा बिन्दू ० अनुस्वार रूपात व्यक्त करतात. तो अविभाज्य आहे.

(३) कला– विश्वविकासाच्या शक्तीच्या रूपाने प्रकट होणारा सत्तत्त्वाचा (Reality) एक पैलू–विश्वातीत स्वरूपातील (Transcendental

aspect ) परमशिव ' निष्कल,' पण विश्वमय ( immanent ) स्वरूपात सर्जन क्रियेशी संबंधित म्हणून ' सकल.'

(४) वर्ण– बिंदूपासून प्रक्षिप्त ( project ) झालेल्या वस्तूचे ( object ) कार्यरूप ( Function-form ).

(५) भुवन– आपल्याला भासमान होणारे विश्व

(६) पद– आपल्या मानसिक (व वाचिक) प्रतिक्रियेमुळे होणारे त्या विश्वाचे प्रत्यक्ष सूत्रण ( actual formulation )

अ = शिव, ह = शक्ती: अ–ह मध्ये सर्व विश्व–त्यावर बिंदू ' अनुस्वार' अ–हं असा आला म्हणजे शिव (अ) हा शक्ती (ह) मार्फत शेवटच्या –३६ व्या –पृथिवी तत्त्वापर्यंत प्रकट झाला तरी तो अविभाज्य राहतो. ही अविभाज्यता [०] बिंदूने व्यक्त–या प्रकटीकरणाच्या सर्वोच्च अवस्थेत वाच्य–वाचक भिन्न नसतात– ही ' परा ' वाक्.

विश्वसर्जनाच्या क्रियेत प्रथम वर्ण व कला यांचे ध्रुवीकरण-या अवस्थेत परावाक् अवस्थेतील वाच्य–वाचकांची एकात्मता नाहीशी होऊन वस्तुभिन्नतेला प्रारंभ–या भिन्नत्व प्रक्रियेचा पहिला ' अध्वा ' म्हणजे वर्ण व कला यांचे ध्रुवीकरण (polarisation)

दुसरा अध्वा (ध्रुवीकरण) – ' मंत्र ' व ' तत्त्व ' यांचे सूक्ष्म पातळीवरील ध्रुवीकरण

मंत्र = तत्त्वाचे सुयोग्य कार्यरूप (appropriate function-form) किंवा आधारभूत चिह्न-बंध basic formula.

तत्त्व = सूक्ष्म रचनात्मक रूपांचे अंगभूत किंवा स्वाभाविक मूलस्रोत (The inherent principle or the source and origin of subtle structural forms)

तिसरा अध्वा (ध्रुवीकरण) ' ' पद ' व ' भुवन ' यांचे **षडध्वांचे परस्पर संबंध**

| **वाचक – शब्द** | | **वाच्य – अर्थ** | |
|---|---|---|---|
| १. वर्ण | कालाध्वा | १. कला | देशाध्वा |
| २. मन्त्र | | २. तत्त्व | |
| ३ पद | | ३. भुवन | |

वर्णाध्वा – प्रमास्वरूप, प्रमेय, प्रमाण व प्रमाता यांचा आधार

कला – (१) निवृत्ति (कला) – (२) प्रतिष्ठा (कला)
(३) विद्या (कला), (४) शांता (कला)
(५) शांत्यतीता (कला)

षडध्वा – गूढ व सांप्रदायिक (esoteric)

## जीव

जीव किंवा आत्मा केवळ शरीर व अंतःकरण यांचा संघात नाही – बुद्धी; अहंकार व मन यांचे बनलेले अंतःकरण (अंतर्गत इंद्रिय) + पंच तन्मात्रे यांचे बनलेले 'पुर्यष्टक' (लिंगशरीर) + प्राणशक्ती + शक्तीस्वरूपिणी कुण्डलिनी + (सर्वांत महत्त्वाचे) चैतन्यस्वरूप आत्मतत्त्व. हे आत्मतत्त्व आणव मलाने मर्यादित म्हणून 'अणु' शिवतत्त्व– हे अणुत्व 'प्रदेशव्याप्ति' दाखवत नसून शक्तिमर्यादा दाखवते.

## पाश किंवा बंध

त्रिकमते 'मल' म्हणजे जिवाला पाशबद्ध करणारे अज्ञान अथवा अपूर्णज्ञान परमशिवावस्थेतील पूर्णत्वावर मर्यादा पडल्यामुळे (परिमितत्वात्) (स्थल किंवा प्रदेशमर्यादा नव्हे) जीव 'अणु'– परमशिवाच्या इच्छाशक्तीने निर्माण झालेला जन्मजात, अनादि पण सान्त असा 'आणव' मल – सांख्यांची बधनिमितीची रागकल्पना भिन्न – या शिवाय त्रिक 'कार्मिक' व 'मायिय' मल – यांचे निमित्त-कारण 'आणव मल' हे तीन मलयुक्त जीव 'सकल' – प्रलयात शरीराभावी दोन [ आणव व कार्म (कार्मिक) ] मल – असे जीव 'प्रलयाकल' – सकल व प्रलयाकल जीव 'अशुद्ध अध्वा, (सृष्टी) मधील – 'अशुद्ध' व 'शुद्ध' अध्वा यांच्या मध्यंतरीच्या अवस्थेतील जीव 'विज्ञानाकल' ( फक्त आणव मलयुक्त) – 'शुद्धविद्या' ते 'शिव' अवस्थेपर्यंत आणव मल कमी होत होत नाहीसा होतो – या अवस्थेतील 'शुद्ध अध्वा' (शुद्ध सृष्टीतील) जीवांच्या मत्र . शांभव इ. संज्ञा.

## काम मल

आणव मलामुळे मर्यादित झालेली कर्म करण्याची इच्छा – मर्यादित सामर्थ्याची कामे – परमेश्वरी इच्छेवर अवलंबून – यात वैषम्य वा नैर्घृण्य नाही – वैविध्य व वैचित्र्य हा देवाचा स्वभाव – कामंमल व कमंसंस्कार भिन्न – कमंमल ही आणवमलावर अवलंबून असलेली विषयशून्य (objectless) मर्यादित इच्छाशक्ति.

## ३ मायिय मल

मायेमुळे जीवाचे ज्ञानसामर्थ्य मर्यादित होऊन 'भिन्न वेद्य प्रथा'– आपण, इतर जीव, वस्तु निराळया 'शरीरभुवनाकार' ही भेद पाहण्याची प्रवृत्ती–परिणाम सुखदुःखे, पुनर्जन्म.

## मोक्ष

त्रिकशास्त्रमते सर्व शिवरूप आत्म्याचे ठायी बंध व मोक्ष यांना वस्तुतः अस्तित्व नाही–संसारी जीवांचा भास–'आत्म्याला स्व–रूपाचा, स्वतःपरासंवित् असल्याचा साक्षात्कार' इति अभिनवगुप्त–उत्पलमते 'अकृत्रिम–अहं–विमर्श' शुद्ध मीत्वाची जाणीव स्वावलंबी (अनन्यमुखप्रेक्षी, स्वतंत्र) चित्त 'चिति' होऊन विश्व आत्मरूप असल्याची जाणीव व सर्वश्रेष्ठ 'जगदानंद' प्राप्ती–त्रिकशास्त्र जीवनन्मुक्ती मानते.

### अनुग्रह किंवा शक्तिपात

प्रत्यभिज्ञा किंवा मोक्षज्ञान ईश्वरी अनुग्रहानेच प्राप्त–कल्पना कठ-मुण्डका इतकी प्राचीन–ईश्वरी शक्तिपातामुळेच प्रत्यभिज्ञा मानवी प्रयत्न तोकडे–त्रिकमतातील व्यापक दीक्षा–कल्पना प्रत्यभिज्ञेसाठी किंवा मोक्षार्थ दीक्षा पूर्व–अट (Pre condition) किंवा अत्यावश्यक नाही–शक्तिपाताचे तीन प्रकार : तीव्र, मध्यम व मंद

## उपाय

शिवाने स्वच्छंदाने स्वतःला संकुचित भासवले की तो 'अणु' पुनः ज्या आध्यात्मिक प्रयत्नांनी शिवस्वरूप होतो त्या प्रयत्नांना 'उपाय' म्हणतात–हे उपाय –अनुपाय (आनंदोपाय), इच्छा (शांभव) ज्ञान (शाक्त) व क्रिया (आणव) असे चार–

१) अनुपाय (ईषत् उपाय) आध्यात्मिक प्रगत किंवा तीव्रतम शक्तिपात झालेल्यासाठी–यात मंत्र, ध्यान, पूजा, चर्या, नियंत्रणा नाही.

(२) शांभोवपाय – विकल्पक्षय करून भेदातीत होऊन तुर्यावस्थेत जाणे– त्यासाठी शिवाची 'सृष्टि' 'स्थिति', 'संहार', 'विलय' व 'अनुग्रह' या पंच-कृत्यांचे चिंतन करून ती आत्म्यामध्येही चालू असतात ही अनुभूति–

### शांभवोपाय

विश्व हे आत्म्याचे वैभव (प्रकटित रूप) आहे व सर्व विश्व मी (आत्मा) आहे असे जाणणाऱ्याला (सविकल्प असला तरी) महेशता–प्राप्ती.

### ३. शाक्तोपाय (ज्ञानोपाय)

मानसिक क्रियेवर भर–मंत्रशक्तीमुळे प्रातिभ ज्ञान–'शिवो ऽहम्' किंवा 'आत्मा हेच सर्व विश्व' याच्या प्रदीर्घ चिंतनाने आत्मज्ञान प्राप्ती–भेदाभेदावर

आधारित म्हणून '–भेदाभेदोपाय' संज्ञा यामध्ये प्राणायामादि न करता कुण्डलिनी जागृती.

४, **आणवोपाय किंवा क्रियोपाय:**

मंत्रजपादि बाह्य क्रियांनी आत्मसाक्षात्कार–विविध मार्ग–विपश्यना–पंच-कृत्यांचे ध्यान व विकल्पक्षयाचा सराव यांच्या अभ्यासाने 'समावेश'–संपूर्ण समावेशासाठीं 'क्रममुद्रा'

## क्रममुद्रा

क्रममुद्रा म्हणजे जीवात्म्याच्या संवित् (consciousness) चे वैश्विक (universal) किंवा शिवाच्या संवित्‌शी एकरूप झाल्यानंतर येणाऱ्या अनुभूतीचा समाधीतून व्युत्थान झाल्यावरसुद्धा समावेश चालू राहणे–विश्व हे आत्मानंदाचे प्रकट स्वरूप असल्याची प्रचीती म्हणजे जगदानंद–साधक (अहम्) व विश्व (इदम) भिन्न नसून 'अहम्'चेच 'इदम् स्वरूप आहे असा साक्षात्कार ही मूळ शुद्ध संवित् प्राप्ती म्हणजे जीवन्मुक्ति–

## शांकरमत व अद्वयवादी काश्मीरी शैवमत: तुलना

१. ब्रह्म किंवा शिव 'चिन्मय' असले तरी शांकरमतात ब्रह्म हे ज्ञान (प्रकाशरूप) आहे. पण या काश्मीर शैव मतात शिव ज्ञान (प्रकाश) विमर्शयुक्त.

२. शांकरमतात ब्रह्म निष्क्रिय. अविद्योपाधीनी युक्त-ईश्वरस्वरूपात–सृष्टयु-त्पत्यादि कार्य. म्हणजे क्रिया–अविद्येचे कार्य पण का. शै. मतात ज्ञातृत्व व कर्तृत्व

हा परमशिवाचा स्वभाव – इच्छास्वातंत्र्याप्रमाणे तो सृष्टि, स्थिति, संहार, विलय, तिरोधान व अनुग्रह ही 'पंचकृत्ये' करतो. असे न मानल्यास कर्तृत्वशून्य परमशिव असत् होईल.

३. शांकरमतात ब्रह्म निष्क्रिय – मायोपाधीने युक्त – ईश्वरस्वरूपात – विश्वोत्पत्त्यादि कार्ये. का. शै. मतात महेश्वर स्वतंत्र. सर्व कर्तृत्व त्याचे – माया उपाधी नसून त्याची शक्ती – तिच्या द्वारा विविधता इ.

४. शांकरमते माया अनिर्वचनीय उपाधि-असत्–ईश्वराद्वयवादी काश्मीरी शैव माया शिवाची शक्ती सत्स्वरूप व चिन्मयी–माया शिवशक्ती मानल्यामुळे ईश्वराद्वयत्व अधिक व्यापक व पूर्ण.

५. शांकरमते संसार नामरूपात्मक व मिथ्या (विवर्त)–का. शै. मते विश्व शिवस्वरूप, 'चिद्विलास'–, 'आभास' पण 'असत्' नाही.

६ शांकरमते मुक्तावस्थेत जीव परब्रह्मात विलीन. त्याच्यापुरते विश्व संपले, का. शै. मते मुक्तावस्थेत शिव आत्मरूप.

(७) केवलाद्वैतमते श्रवण–मनन–निदिध्यासांनी अविद्यानाश. का. शै. मते अज्ञान द्विविध (१) आणव किंवा पौरुष, (२) बौद्धिक–विद्येने बौद्धिक अज्ञाननाश. आणव मल गुरूंची दीक्षा वा ईश्वरी अनुग्रहामुळे नष्ट.

## काश्मीरी द्वैत सिद्धान्त

सिद्धान्त शैवमते शिव परमश्रेष्ठ तत्त्व–जीव व जगत् हेही सत् (वास्तव)

▭

# काश्मीरी शैवमत

'काश्मीरी शैवमत' ही संज्ञा संदिग्ध आहे. नीलमत पुराणावरून व राजतरंगिणीवरून अशोक मौर्यापूर्वीच्या कालापासून काश्मीरात अर्धनारीश्वर शिवाची उपासना लोकप्रिय होती हे खरे असले तरी त्या उपासनेला तत्त्वज्ञानाचा पाया नव्हता. तो काश्मीर बाहेरील उत्तरप्रदेशातून आलेल्या सोमानंद व अभिनवगुप्त यांच्या-दोन घराण्यांनी इ. स. चे ८ व्या शतकात 'आगमोक्त' शैवमत स्थापून दिला.[१] अशोक मौर्याच्या काळात बौद्धधर्म काश्मीरात आला पण काश्मीरी राजघराणे बौद्ध व शैव या दोन्ही मतांना कल्हणाचे काळापूर्वीपासून आश्रय देत आले या वरून त्या समन्वयवादी जनतेने त्या दोन्ही मतांना सामावून घेतले.[२] परंतु कनिष्काने (इ स. १२५—१६०) बौद्धधर्म प्रसारकांना काश्मीर बहाल केल्यापासून[3], नागार्जुनाने सत्ता व विद्वत्ता यांच्या जोरावर धर्मप्रसाराची मोहीम उघ-

---

१. कान्तिचंद्र पांडे – अभिनवगुप्त – ए हिस्टॉरिकल अँड फिलॉसॉफिकल स्टडी पृ ८२–९०.

२. For centuries before Kalhana's time Buddhism and the orthodox creeds existed peacefully side by side in Kashmir... Of almost all royal and private individuals, who are credited with the foundation of Buddhist **Stupas and Viharas...** with equal zeal endowed also shrines of S'iva or Visnu. A. Stein – Intro. to Raja-Tarangini, p. 9

३. राजतरंगिणी १. १७७–१७८

डली आणि ब्राह्मणांनी बौद्धिक (तत्त्वज्ञानात्मक) पातळीवर प्रतिकार सुरू केला. या झगडयाचे प्रतीकात्मक वर्णन कल्हणाने राजतरंगिणीत[४] पुढीलप्रमाणे केले आहे:

'जेव्हा आगमाच्या द्वेष्टयांनी नीलपुराणोक्त क्रिया बंद केल्या तेव्हा नील या नागराजाने हिमवृष्टीचा प्रलय केला, त्यावेळी चंद्रदेव नामक ब्राह्मण तपस्व्याने नीलपुराणोक्त क्रिया प्रस्थापित करून लोकांना दिलासा दिला.'

मी या कथेचा अर्थ चंद्रदेवाने बौद्ध धर्माशी सामना देण्यासाठी रूढ धर्माची फेरमांडणी केली असा करतो.[५].

वर उल्लेखलेला नागार्जुन माध्यमिक मत प्रवर्तक नसावा, कारण त्या बौद्ध धर्मप्रसारकाचे नाव 'नागबोधि' असे वरदराजाने शिवसूत्रावरील 'वार्तिकात'[६] व क्षेमराजाने शिवसूत्रावरील 'विमर्शिनी' टाकेत[७] दिले आहे. तथापि 'नागार्जुन' नावाचे एकाहून अधिक बौद्ध पडित होऊन गेल्यामुळे हा 'नागबोधि' त्यापैकी एक असणे अशक्य नाही.

बौद्धधर्म व ब्राह्मणी धर्म यांच्यामध्ये अनेक बाबतींत साम्य असल्यामुळे, 'उपास्यानामनेकता' मानणाऱ्या काश्मीरी जनतेने कालांतराने बुद्धाला आपल्या देवांत सामावून घेतले. पण इ. स. च्या सातव्या शतकानंतर ब्राह्मणी धर्माच्या पुनरुज्जीवनाची लाट उसळली. कुमारिलभट्ट, शंकराचार्य इ, दक्षिणी पडितांनी जाहीर वादविवाद, ग्रंथलेखन इ. अनेक मार्गांनी बौद्ध धर्माला हादरे दिले. शांकरदिग्विजयावरून (१६–५४–८०) शंकराचार्यांनी काश्मीरला भेट दिली असे दिसते. ही घटना अनैतिहासिक आहे, असे मला म्हणावयाचे नाही. कारण काश्मीर

---

४. १. १७७–१८४

5. But the **rechauffe** of an ancient legend told in the **Nila-mata** Purana which relates the deliverance of Kashmir from the plague of Pis'acas through rites revealed by Nila Naga. —A. Stein – Intro to **Raja-tarangini,** P. 77

६. नागबोध्यादिभिः सिद्धैर्नास्तिकानां पुरःसरैः ।
आक्रान्ते जावलोकेऽस्मिन्नात्मेश्वरनिरासकैः ।।
**–शिवसूत्रवार्तिक १**

७. अनङ्गीकृताधरदर्शनस्थ–नागबोध्यादि–सिद्धादेशनः... वसुगुप्तनामा गुरुरभवत्
**—शिवसूत्रविमर्शिनी** प्रास्ताविक

८. श्रीनगर शेजारची शंकराचार्य टेकडी ही त्या भेटीचे स्मारक म्हणून दाखवतात. वस्तुतः या टेकडीच्या माथ्यावर 'ज्येष्ठेश्वर' हे अशोकाला समकालीन असलेल्या काश्मीरच्या राजाने स्थापलेले शिवलिंग आहे. आद्य शंकराचार्यांचा पुतळा म्हैसूरच्या महाराजांनी चालू शतकात बसवला आहे.

मधील आगमप्रणीत शैवमत व शंकराचार्यांच्या नावावर मोडणारी ' ' दक्षिणामूर्ति-स्तोत्र ' व ' सौंदर्यलहरी ' या स्तोत्रात तात्त्विक साम्यस्थळे आहेत आणि शंकराचार्यांच्या मठात श्रीचक्रादि तंत्र-पद्धतीची उपासना आहे. शंकरचार्यांच्या भेटीमुळे काश्मीरी शैवमताला काही तात्त्विक आधार मिळाला असावा हा डॉ. कांतिचंद्र पांडे यांचा तर्क[९] सयुक्तिक वाटतो.

शंकराचार्यांच्यापेक्षा ज्यांनी आपल्या ग्रंथसंपत्तीने काश्मीरी शैवमताला दार्शनिक आधार दिला त्यांपैकी एक घराणे ' शिवदृष्टि '-कार सोमानंदाचे. हे घराणे कैलासपर्वताकडून काश्मीरमध्ये आले असावे हे शिवदृष्टीच्या समारोपावरून दिसते. त्यात सोमानंद म्हणतो :

कलियुगाचे प्रारंभी शैवादि-रहस्यें पाठ येणारे ऋषी कलापि ग्रामादि दुर्गम ठिकाणी निवृत्त झाल्यावर शिवशासन समुच्छिन्न झाले. तेव्हा कैलास पर्वतावर भ्रमण करणाऱ्या शिवाने ' श्रीकंठ ' रूप धारण करून दुर्वास मुनीला या शास्त्रांचा उच्छेद होणार नाही अशी व्यवस्था करण्यास सांगितले. दुर्वासाने त्र्यंबकानंद नामक मानसपुत्र निर्माण केला व त्याला हे रहस्य सांगितले. त्याने ' त्र्यंबक नामक गुहेत जाऊन आपल्याच नावाचा मानसपुत्र निर्माण केला. '[१०] नंतर तो (आकाशात ?) उडून गेला. असे प्रत्येक पिढीला होत होत चौदा पिढ्या गेल्या. पंधराव्या पिढीच्या सिद्धाला यात्रा प्रसंगाने एकरूप-यौवन-सौभाग्य-लक्षणयुक्त ब्राह्मणी (ब्राह्मणकन्या) दिसली. ही सुलक्षणी कन्या आपली सहधर्मचारिणी होण्यास योग्य आहे. असे पाहून त्याने तिच्या बापाकडे जाऊन मागणी घातली

---

९. अभिनवगुप्त पृ. ८७–९०

१०. सोऽपि गत्वा गृहां सम्यक् त्र्यम्बकाख्यां ततः परम् ॥११२॥
तन्नाम्ना चिह्नितं तत्र ससर्ज मनसा सुतम् ॥११३ अ ॥

........................................ ............

एवमेषां त्र्यम्बकाख्या ' तेरम्बा ' देशभाषया ॥१२१॥
स्थिता शिष्यप्रशिष्याद्यैर्विस्तीर्णा मठिकोदिता ॥१२२ अ ॥

एवढ्या उल्लेखावरून ही ' त्र्यबकमठिका ' महाराष्ट्रातील नाशिक जिल्ह्यामधील त्र्यंबक/त्रिबक ठरविता येत नाही. सोमानंद वा कोणताही काश्मीरी शैव लेखक वा गोरक्षनाथ तथा महेश्वरानंदसुद्धा महाराष्ट्राचा अशा संदर्भात उल्लेख करीत नाहीत.

आणि मोठा प्रयत्न करून तिला आणले. व तिच्याशी ब्राह्मपद्धतीने विवाह केला व तिच्यासह हिंडत तो काश्मीरला आला.[११]

त्या ब्राह्मणीशी विवाह करणाऱ्या सिद्धाचे नाव संगमादित्य होते. तो सोमानंदाचा पणजोबा लागतो हे पुढील वंशपरंपरेवरून दिसेल.

संगमादित्य → वर्षादित्य → अरुणादित्य → सोमानंद

दुर्वासाच्या मानस ↓ ↓ ↓ ↓
पुत्रापासून १५ वी पिढी → १६ → १७ → १८

यावरून सोमानंद हा दुर्वासापासून १९ व्या पिढीतील ठरतो. सोमानंदाचा काळ इ. स. च्या ९ व्या शतकाचे शेवटी आहे. प्रत्येक पिढी २५ वर्षांची मानली तर दुर्वासांचा किंवा कैलासस्थ 'काश्मीरी' शैवमताचा काळ इ. स. चे ४ थे शतक ठरेल. या मध्यंतरीच्या ५ शतकात बौद्ध वा इतर मताशी संपर्क होऊन 'श्रीकण्ठ-प्रणीत' किंवा 'दुर्वास–उपदिष्ट' शैवमतात काय फरक झाला हे सांगणे कठीण आहे.

काश्मीरात शैव तत्त्वज्ञान आणणारे दुसरे घराणे अभिनवगुप्ताचे. त्याने त. लो. (तंत्रालोक) आ. (आह्निक) ३७ मध्ये दिलेल्या हकिकतीवरून कनोजचा राजा यशोवर्मा (इ. स. ७३०–४०) याचे कारकीर्दीत अंतर्वेदीत (गंगा–यमुनेच्या दुआबात) अत्रिगुप्त नामक अगस्त्य गोत्री ब्राह्मण राहात होता. तो सर्व शास्त्रांत–विशेषत: शैवशास्त्रात–तज्ज्ञ म्हणून प्रसिद्ध होता. इ. स. ७४० मध्ये काश्मीरचा राजा ललितादित्य याने राजा यशोवर्म्याचा पराभव केल्यानंतर अत्रिगुप्ताला काश्मीरला येऊन राहण्याचा आग्रह केला. अत्रिगुप्त आल्यावर त्याला त्याने झेलमनदीवरील शीतांशुमौलीच्या मंदिरासमोर एक वाडा व जहागीर दिली[१२]

---

११. दृष्टवा तां लक्षणैर्युक्तां योग्यां कन्यामथात्मनः ॥११६
स धर्मचारिणी सम्यग्गत्वा तत्पितरं स्वयम् ।
अर्थयित्वा ब्राह्मणीं तामानयामास यत्नतः ॥११७
ब्राह्मणेन विवाहेन ततो जातस्तथाविधः ।
तेन यः स च कालेन कष्मीरेष्वागतो भ्रमन् ॥११८
–शिवदृष्टि –आन्हिक ७ वे

१२. तस्मिन् कुबेरपुरचारुशितांशुमौलिसांमुख्यदर्शनविरूढपवित्रभागे ।
वैतस्तरोधसि निवासममुष्य चक्रे राजा द्विजस्य परिकल्पितभूमिसम्पत् ॥
–तं. लो. आ. ३७-५२

शीतांशुमौलिमंदिर आज असलेल्या खानका ( Khanakah ) चे थडग्याशेजारी होते असे सांगतात.

तं. लो. आ. १.२४ वरील टीकेवरून असे दिसते की या दोन घराण्यांनी प्रसृत केलेल्या शैवमतात आसाममधून 'मच्छंद' (मत्स्येन्द्र) या सिद्धाने रूढ केलेला पंचमकारयुक्त 'कौल' संप्रदाय मिसळला. परंतु काश्मीरमधील कौल-सांप्रदायिक आपला पूर्वज महेश्वरानंद असून तो महाराष्ट्रातून येऊन काश्मीर-मध्ये स्थिर झाला. असे मानतात.[13] हा महेश्वरानंद 'महार्थमंजरी' या शैव-मतावरील महाराष्ट्री प्राकृत ग्रंथाचा कर्ता नसावा कारण त्या ग्रंथावर त्याने जी 'परिमल' नामक स्वोपज्ञ-टीका लिहिली आहे, त्यात आपले गुरू चोलदेशीय आहेत व आपला ग्रंथ कावेरीच्या पाण्याप्रमाणे गोड आहे. (**कावेर्या इव माधुर्यम्**) असे त्याने म्हटले आहे. त्यावरून तो दाक्षिणात्य असावा एवढेच दिसते परंतु सिमल्याचे डॉ. बी एन्. पंडित याचे मते महाराष्ट्रातील श्रीविद्येचा उपासक असणाऱ्या नाथपंथीयांचा एक प्रवाह काश्मीरमध्ये मिसळला असावा.[14]

तत्त्वज्ञान दृष्टचा श्रीकण्ठाच्या किंवा शिवाच्या आज्ञेवरून दुर्वासाने त्र्यंबक, अमर्दक व श्रीनाथ हे तीन मानसपुत्र निर्माण करून त्यांना अनुक्रमे अद्वैत. द्वैत व द्वैताद्वैत तंत्रे (शिवागम) शिकवून त्यांचा प्रसार करण्यास सांगितले त्यापैकी त्र्यंबकाचे मुलीच्या वंशजाकडून 'अर्धत्र्यंबक' संप्रदाय सुरू झाला. अभिनवगुप्ताचे नालंधरपीठाचे गुरू शंभुनाथ हे या पंथाचे होते हा 'अर्धत्र्यंबकमठिका मार्ग' व कुलमार्ग (अतिनय कालीनय मार्ग) हे एकच आहेत.[15]

ही सर्व मते वा काश्मीरी शैवपंथ आगमप्रणीत आहेत, श्रुतिप्रणीत नाहीत पण भारतीय मनावर श्रुतिस्मृतींचा एवढा जबरदस्त पगडा आहे की शैवमताप्रमाणे आचरण करण्यापूर्वी प्रत्येकाचे गर्भाधानापासून विवाहाअखेर सर्व वैदिक संस्कार झालेच पाहिजेत.[16] कौल किंवा त्रिक उपासना अंतर्यामी केली तरी '**लोकाचारे तु**

---

१३. The present day Kaulas of Kashmir believe that Mahes'varananda was their ancestor who came from Maharashtra and settled in Kashmir. बी. एन. पंडित – आस्पेक्टस् ऑफ शैविझम, पृ. २७.

१४. उपर्युक्त पृ. २७–२९. या बाबतीत अधिक संशोधन हवे. अभिनवगुप्ताचे गुरू शंभूनाथ हे अर्धत्र्यंबकसंप्रदायी होते शंभूनाथांचे गुरू व परात्परगुरू सोमनाथ व सुमतिनाथ दाक्षिणात्य होते असे तं. लो. आ १ वरील टीकेत (कश्चिद् दक्षिणभूमिपीठवसतिः ... लोकेऽभूत् सुमतिः) असे म्हटले आहे.
–उपर्युक्त पृ. ३०.

१५. कां. चं. पांडे – अभिनवगुप्त, पृ. ७२–८२.

१६. गर्भाधानादितः कृत्वा यावदुद्वाहमेव च।
तावत्तु वैदिकं कर्म पश्चाच्छैवे ह्यनन्यभाक् ॥
–शैव आगम, तंत्रालोकविवेकमध्ये उद्धृत, पृ. २७८.

**वैदिकः** ' असा शैव आगमाचा दंडक आहे. कौल, क्रम, त्रिक इ. संप्रदायनामे वा उपासनापद्धती भिन्न असल्या तरी त्यांचे तत्त्वज्ञान आगमप्रणीत होते.

सारांश हिमालयाच्या कुशीत, कमल-केशरांच्या परिसरात विकसित झालेल्या ज्या तत्त्वज्ञानाचा सुगंध मराठी साहित्यात ज्ञानदेवांनी आणला,[१७] ते तत्त्वज्ञान आगमाधिष्ठित-अवैदिक-आहे. ' काश्मीरी शैवमत ' ही संज्ञा अतिव्याप्त व म्हणून संदिग्ध आहे. चौसष्ट तथाकथित अद्वैतपर[१८] आगमांवर वा तंत्रांवर आधारलेले काश्मीरी शैवमत अद्वैती वा ईश्वराद्वयवादी आहे पण अठ्ठावीस द्वैती तंत्रावर आधारलेले काश्मीरी शैवमत द्वैती असून त्याला ' सिद्धान्त शैवमत ' म्हणतात. व दक्षिण भारतात ते त्याच नावाने रूढ आहे. इ. स. च्या ११ व्या शतकापर्यंत काश्मीरी पंडितांनी दोन्ही मतांचा प्रचार केला. त्यामुळे ईश्वराद्वयवादी त्रिक शैव मताला ' काश्मीरी शैवमत ' ही संज्ञा एका अर्थी अतिव्याप्त व संदिग्ध आहे.

अद्वैतपर काश्मीरी शैवमताला मोघम ' काश्मीरी शैवमत ' म्हणण्यापेक्षा त्याचे वैशिष्टय दाखवणाऱ्या ' स्वातंत्र्यवाद ' ' आभासवाद ' ' शिवाद्वयवाद ' किंवा (पति, पशु व पाश अशा विशेषांचा समुदाय व्यक्त करणारी) ' त्रिक ' या संज्ञा वापरणे अधिक समर्पक आहे. या ईश्वराद्वयवादी शैवमताची मी येथे चर्चा करणार

---

१७. ज्ञानदेवांच्या तत्त्वावरील या काश्मीरी शैवतत्त्वज्ञानाचा प्रभाव प्रथम निश्चित करून तो पांडित्यपूर्वक सिद्ध करण्याचे श्रेय कोल्हापूरच्या वै. बाळाचार्य खुपेरकरांचे. वै. खुपेरकरशास्त्र्यांनी ' शैवागम आणि ज्ञानेश्वर ', ' ज्ञानेश्वर तत्त्वज्ञान ' या पुस्तकांतून व व्याख्यानांतून ज्ञानेश्वर काश्मीरी शैवमताचे होते हे अतिशय प्रभावी रीतीने सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. वै. शास्त्रीमहोदयांना या बाबतीत योग्य ते श्रेय दिलेच पाहिजे. पण ज्ञानेश्वरी वाचताना ते अनेक ठिकाणी शंकराचार्यांचा मागोवा घेतात (व काही श्लोकात रामानुजांचासुद्धा) असे आढळते. त्यावरून ज्ञानदेवांनी समकालीन तत्त्वप्रणाली अभ्यासून स्वतःचे स्वतंत्र मत प्रतिपादन केले आहे असे मला वाटते.

१८. ' तथाकथित ' म्हणण्याचे कारण त्यापैकी काही तंत्रे द्वैतपर आहेत.
" These commentaries ( on the tantras ) are great attempts to show how the pre-Shiva-Sutra ( Tantras ) taught the Advaita Tattva, **although in reality,** they seem to have taught but plain unvarnished dualism and even pluralism, like what is described as " Shaiva Darshana " in Madhava's **Sarva -darshana-sangraha,** "
-J. C. Chatterji, **Kashmir Shaivism**, P. 9.

असून त्यासाठी 'त्रिकशास्त्र' किंवा 'त्रिक' ही परात्रिशिकाविवरणादि ग्रंथातील सुटसुटीत संज्ञा मी वापरत आहे.

### त्रिकशास्त्र

या शास्त्राचे महत्त्व सांगताना हे शास्त्र वेद, शैव, वाम, कौल, मत इ. 'शास्त्रांपेक्षा' श्रेष्ठ आहे असे म्हटले आहे[१९]

या शास्त्रावरील साहित्याचे स्थूलमानाने तीन भाग पडतात :

(१) आगमशास्त्र, (२) स्पंदशास्त्र, (३) प्रत्यभिज्ञाशास्त्र

## (१) आगमशास्त्र

आगम चा कर्ता भगवान् शिव असून ते अविनाशी आहेत. मन्वंतराचे शेवटी जसे वेदमंत्र अदृश्य होतात व नवीन मन्वंतरानंतर तपश्चर्येने विशिष्ट आध्यात्मिक दर्जा प्राप्त झालेल्या ऋषींच्या अंतःकरणांत प्रकाशित होतात, तसेच आगमांचे बाबतीत घडते अशी श्रद्धा आहे. ही अद्वैतप्रतिपादक तंत्रे ६४ आहेत.[२०] यांपैकी काही द्वैतपर असली तरी त्यांचा अर्थ अद्वैतपर करतात. उदा. मूळचे द्वैतपर असलेले 'मालिनी-विजय' तंत्र अद्वैतशैवमताचे सार मानले गेले आहे.[२१] वसुगुप्तकृत

---

१९. वेदाच्छैवं, ततो वामं, ततो दक्षं, ततो कुलम् ।
ततो मतं, ततश्चापि त्रिकं सर्वोत्तमं परम् ॥
—परात्रिशिकाविवरण, पृ. ९२.

काश्मीरी लेखक 'शास्त्र' शब्द 'तत्त्वज्ञानपद्धती'पेक्षा 'ग्रंथ' या अर्थी वापरतात. उदा. 'शिवदृष्टिशास्त्र' व 'प्रत्यभिज्ञाशास्त्र' हे एकच तत्त्वज्ञान (ईश्वराद्वयवाद) मांडणारे ग्रंथ 'शास्त्र' म्हणून उल्लेखले जातात. जगदीशचद्र चतर्जींनी म्हटले आहे :

"The term शास्त्र as employed in this connection does not mean a separate system but a treatise or treatises dealing with a particular aspect or aspects of the same system."
–Kashmir Shaivism, p. 7, Ft. note 1.

२०. यांची यादी – पाहा कां. चं. पांडे – **अभिनवगुप्त,** पृ. ७७–८०.

आद्य शंकराचार्य तंत्रविद्येत निष्णात व श्रीविद्येचे उपासक होते असे त्यांच्या मठांत चालू असलेल्या श्रीविद्येच्या उपासनेवरून म्हणतात. त्यांच्या नावावर मोडल्या जाणाऱ्या 'सौंदर्य लहरी' या स्तोत्रात ही (अद्वैतपर) ६४ तंत्रें होतीं असे म्हटले आहे :

**चतुष्षष्टया तन्त्रैः सकलमभिसन्धाय भुवनम् ।**

अद्वैतमत प्रस्थापकाने द्वैती तंत्रांची दखल न घेणे स्वाभाविक आहे.

२१. ... **तत्सारं मालिनीमतम् ।**
— तंत्रालोकविवरण १, पृ. ३४.

शिवसूत्र हा काश्मीरी त्रिकशास्त्रावरील पहिला ग्रंथ त्याचे पूर्वी रूढ असलेल्या ' स्वच्छंद ', ' नेत्र ', ' विज्ञान भैरव ', ' मातङ्ग ' या तंत्रांतून माधवकृत ' सर्वदर्शन संग्रहा ' मधील ' शैव दर्शना 'त मांडलेला द्वैती शैववाद सांगितला आहे पण त्यावरील ' उद्योत ', ' वृत्ति ' या टीकांतून हा तंत्र अद्वैतवादी आहेत, असे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे.[२२]

या वैचारिक गोंधळातून सुसूत्रता आणण्यासाठी व अद्वैतमताचा उच्छेद होऊ नये म्हणून वसुगुप्ताने (इ स ८२५) शिवसूत्रे रचली[२३] यात खंडनमंडनात्मक चर्चा नसून मोक्षप्राप्तीस ठो शांभवोपाय, शाक्तोपाय व आणवोपाय या मार्गांचे विवेचन आहे. शिवसूत्रांवर अनेक टीका असाव्यात पण सध्या क्षेमराजकृत ' शिवसूत्रविमर्शिनी ' व भास्कर कृत शिवसूत्रवार्तिक ' एवढ्याच उपलब्ध आहेत. भास्कर व क्षेमराज यांनी शिवसूत्रांचे भिन्न अर्थ केले आहेत. परंपरेच्या दृष्टीने (वसुगुप्त→कल्लट→भास्कर) भास्कर हा वसुगुप्ताच्या प्रमख शिष्याशी — कल्लटाशी–अधिक लगतचा असल्यामळे त्याने मळचा, वसुगुप्ताला अभिप्रेत अर्थ व्यक्त केला असावा.

**( २ स्पन्दशास्त्र**

स्पन्द म्हणजे हालचाली सारखे काहीतरी[२४] (किंचित् चलनम्) याला

---

२२. J. C. Chatterji – **Kashmir Shaivism**, Pp. 9–10

२३. **द्वैतदर्शनाधिवासतप्राये जीवलोके रहस्यसम्प्रदायो माविच्छेदि - इत्याशयतः अनुजिघृक्षापरेण परमशिवेन स्वप्ने अनुगृह्य उन्मिषितप्रभः कृतः (वसुगुप्तः)।**

— क्षेमराज, ' **शिवसूत्रविमर्शिनी** ', पृ. २

परंपरागत कथेप्रमाणे भगवान् शिवाने वसुगुप्ताला दृष्टांत देऊन श्रीनगर-जवळील एका टेकडीवर एका शिळेवर ' शिवोपनिषत्संग्रहरूप ' असलेली सूत्रे आहेत ती प्रकाशित करण्याचा आदेश दिला दुसऱ्या दिवशी वसुगुप्त त्या ' महोभृता 'वर गेला असता त्याला ती शिळा दिसली व त्याच्या हस्तस्पर्शाने ती उपडी होऊन तिच्यावर त्याला ती सूत्रें आढळली, त्या महादेवगिरीवर ' शंकर पल् ' (शंकरोपल) नामक ती शिळा अद्यापही दाखवतात. पण तिच्यावर एकाकाळी कोरणें ( etching ) झाले असल्याचा अवशेषही नाही. माझे मित्र (जम्मू कश्मीरच्या पुरातत्त्वखात्याचे सेवानिवृत्त संचालक) डॉ. पी. एन्. पुष्प यांनी मला दुजोरा देतांना आपणही तो शिळा काळजीपूर्वक पाहिली पण आपल्यालाही तसेच आढळल्याचे सांगितले

२४. **स्पन्दनं च किंचित् चलनम् । एषैव च किंचिद्रूपता यद् अचलमपि चलम् आभासते इति... आभासभेदयुक्तमेव च भाति इति ।**

—ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी १. ५. १४.

'स्फुरता' हा पर्याय असून त्याबद्दल ज्ञानदेवांनी 'स्फुरण' शब्द वापरला आहे. आत्मतत्व हे चैतन्य व क्रिया यांनी युक्त असते अशा आत्मस्वरूपाचे ज्ञान आवश्यक आहे. वसुगुप्ताने शिवसूत्रांच्या आधारे ५२ (वस्तुत: ५१) कारिका असणाऱ्या 'स्पंदकारिका' किंवा 'स्पन्दसूत्र' लिहिली. त्यावर वसुगुप्ताचा शिष्य कल्लट (इ. स. ८५५) याने वृत्ति लिहिली. त्यानंतर रामकंठकृत वृत्ति (इ. स. ९५०–७५) व त्याचाच समकालीन –काहींच्या मते तरुण समकालीन (junior contemporary)–भट्ट उत्पल याची 'स्पन्दप्रदीपिका' व क्षेमराज कृत 'स्पन्दसन्दोह' व 'स्पन्दनिर्णय' (इ. स. ९७५–१०२५) या टीका उपलब्ध आहेत (ग. वा तगारे–स्पंदकारिका प्रस्तावना).[२५]

## (३) प्रत्याभिज्ञा – शास्त्र

आपण परमेश्वर–स्वरूप आहोत असा साक्षात्कार वा पुन:प्रत्यय येणे म्हणजे 'प्रत्यभिज्ञा'.[२६] हे 'मनन शास्त्र' किंवा 'विचारशास्त्र' अथवा त्रिक-शास्त्राचे 'तत्त्वज्ञान' आहे असे मानतात. या शास्त्राच्या प्रवर्तक वसुगुप्तशिष्य सोमानंद असून त्याने परमत खंडन व स्वमतमंडन असलेले 'शिवदृष्टि' नामक सात आह्निकें असलेले ७०० लोकांचे प्रकरण लिहिले.[२७] प्रस्तुत प्रकरणांत वैयाकरणांचा शब्दब्रह्मवाद (आह्निक २ रे), शाक्त, द्वैती शैव मते (आह्निक ३ रे), विज्ञानवाद (आह्निक ५ वे), इतर दार्शनिक मतें (आह्निक ६वे) यांचे खंडन करून, ईश्वराद्वयवाद अथवा स्वातंत्र्यवाद मांडला आहे. अशी खंडन–मंडनात्मक पद्धति स्वीकारणारा सोमानंद हा पहिलाच काश्मीरी शैव लेखक असल्यामुळे त्याला 'स्वात्मेश्वर

---

२५. भट्ट उत्पलाने स्पन्दकारिका कल्लटाची आहे असे म्हटले असले तरी (स्पन्दप्रदीपिका–कारिका ५३) क्षेमराजाने 'स्पन्दनिर्णयात (४.२) उत्पलाच्या उपर्युक्त कारिके ऐवजी :

लब्ध्वाप्यलभ्यमेतज्ज्ञानधनं हृद्गुहान्त: कृतनिहिते: ।
वसुगुप्तवच्छिवाय हि भवति सदा सर्वलोकस्य ॥

दाक्षिणात्य महेश्वरानंदाने ही गाथा 'महार्थमंजरी' वरील टीकेत (पृ. ८) उद्धृत केली आहे. स्वत: कल्लटाने 'स्पन्दसर्वस्वा'चे शेवटी या कारिका वसुगुप्ताच्या आहेत, असे म्हटले आहे :

दृब्धं महादेवगिरौ महेशस्वप्नोपदिष्टाच्छिवसूत्रसिन्धो: ।
स्पन्दामृतं यद्वसुगुप्तपादै: श्रीकल्लटस्तत् प्रकटीचकार ॥

२६. अहमीश्वर एव नान्य इत्येवं य: साक्षात्कार: स प्रत्यभिज्ञेत्युच्यते ।
—दर्शनाङ्कुरा टीका, सर्वदर्शनसंग्रह, पृ. १९०.

२७. संपादक – पं. मधुसूदन कौल शास्त्री, काश्मीर संस्कृत ग्रंथावली ५४, श्रीनगर १९३४.

प्रत्यभिज्ञेचा' तर्कशुद्ध मांडणी करणारा (स्वात्मेश्वरप्रत्यभिधानपरस्य तर्कस्य कर्तारः) असे अभिनवगुप्ताने तंत्रालोकात (१.१०) म्हटले आहे.

उत्पलदेव हा सोमानंदाचा मुलगा व शिष्य. त्याने 'शिवदृष्टीवर' ४ थ्या आन्हिकाच्या ७४ श्लोकाअखेर 'वृत्ति' (टीका) लिहिली. या शिवाय त्याने स्वोपज्ञवृत्तीसह 'ईश्वरप्रत्यभिज्ञा' नामक ग्रंथ लिहून 'प्रत्यभिज्ञाशास्त्रा'ला प्रतिष्ठा दिली उत्पलदेवाच्या या ग्रंथावर अभिनवगुप्ताने 'प्रत्यभिज्ञा-विमर्शिनी' (इ. स. १०१४) व 'प्रत्यभिज्ञानिवृत्ति-विमर्शिनी' या दोन सुप्रसिद्ध टीका लिहिल्या. अभिनव गुप्त (इ. स. ९६०(?)– १०१५) हा विविध शास्त्रांत प्रवीण होता. त्याने प्रत्यभिज्ञाशास्त्रावर 'तंत्रालोक' नामक प्रचंड ग्रंथ लिहिला व त्याचा सारांश त्याने 'तंत्रसार' नामक ग्रंथात दिला आहे. या शिवाय याच विषयावर 'परात्रिंशिका विवरण', सांख्यकारिकांचे आधारे 'परमार्थसार' व इतर स्फुट प्रकरणे लिहिली. अभिनवगुप्तानंतर त्याचा शिष्य क्षेमराज (इ. स. १०४०) याने प्रत्यभिज्ञाशास्त्राचे सार असलेले 'प्रत्यभिज्ञाहृदय' लिहिले. अभिनवगुप्ताच्या 'परमार्थसारा'वर योगराज (इ. स. १०६०) याने टीका लिहिली व 'तंत्रालोका'-वर जयरथाने (इ स ११८०) टीका लिहिली. त्यानंतरचा प्रमुख काश्मीरी लेखक इ. स. च्या १८ व्या शतकातील शिवोपाध्याय. त्याने 'विज्ञान भैरवा'वर सुरेख टीका लिहिली आहे.

या शिवाद्वयवादी काश्मीरी लेखकांचे संबंध पुढील प्रमाणे आहेत.[२८]




२८. J. C. Chatterji – **Kashmir Shaivism,** p. 40

अभिनव गुप्तानंतर बऱ्याच काळाने चोलदेशीय महेश्वरानंद तथा गोरक्षनाथ याने महाराष्ट्री प्राकृतमध्ये 'महार्थमंजरी' (सटीक) लिहिली.[२९]

## तत्व–विचार

### अंतिम तत्त्व

त्रिकशास्त्रात 'पर–शिव' हे अंतिम तत्त्व असून त्याला चित् अथवा चिति (चैतन्य), परासंवित् (अंतिम ज्ञान वा अनुभूति), परमेश्वर इ. संज्ञा आहेत. ते नामरूपातीत व स्थलकालातीत आहे. ते विश्वात्मक, (विश्वव्यापी immanent) व विश्वोत्तीर्ण (transcendent), परमानंदस्वरूप व स्वतंत्र आहे. विविध वैचित्र्याने भरलेले विश्व त्याच्यामध्येच झालेला त्याचा आविष्कार आहे. ते प्रकाश व प्रकाश्य आहे. त्याच्या अभेदतेमुळे त्याच्यापेक्षा भिन्न ग्राह्य व ग्राहक काहीही नाही. शांकराद्वैतातील ब्रह्म केवळ बोध (ज्ञान, प्रकाश) स्वभाव आहे पण परमशिव प्रकाश–विमर्शमय आहे[३०] कारण परमतत्त्व जर केवळ 'प्रकाशमय' असते तर ते हिऱ्याप्रमाणे प्रकाशयुक्त, 'जड' व अनीश्वर झाले असते.[३१]

'विमर्श' ही संज्ञा वि– √मृश् (बुद्धीने ग्रहण करणे) या धातूपासून झालेली असली तरी त्रिकशास्त्रात 'विमर्श' म्हणजे 'अकृत्रिम (non–relational immediate) अहन्तेची (मी-त्वाची) जाणीव (विस्फुरण)' (**विमर्शो नाम विश्वाकारेण, विश्वप्रकाशनेन, विश्वसंहरणेन च अकृत्रिमाहं इति विस्फुरणम्**) असे क्षेमराजाने 'पराप्रावेशिकेत[३२] म्हटले आहे विमर्शामुळे विश्वाची उत्पत्ति, स्थिती व संहार होतो. शांकराद्वैतामधील ब्रह्म निष्क्रिय असल्यामुळे काश्मीर शैव लेखक त्याला 'शांत' म्हणतात व त्यांच्या मतात 'सदाशिव' नावाचे तिसऱ्या पायरीवरील जे तत्त्व आहे त्याच्या समान ब्रह्माला मानतात. विमर्शाला इंग्रजीत प्रतिशब्द नाही. self–consciousness हा शब्द रूढ असला तरी त्यातून विमर्शातील सर्व अर्थच्छटा व्यक्त होत नाहीत.

---

२९. हा नाथसांप्रदायी मत्स्येंद्रशिष्य गोरक्ष नसून इ. स. १४ व्या शतकातील लेखक आहे. महार्थमंजरी – उपोद्घात पृ. ङ ते ज.

३०. **श्रीमत्परमशिवस्य पुनः विश्वोत्तीर्ण–विश्वात्मक–परमानन्दमय–प्रकाशैकघनस्य एवंविधमेव शिवादि-धरण्यन्तमखिलमभेदेनैव स्फुरति, न तु वस्तुतः अन्यत् किञ्चित् ग्राह्यं ग्राहकं वा; अपि तु श्रीपरमशिवभट्टारकः एव इत्थं नाना-वैचित्र्य-सहस्रैः स्फुरति ।** प्र हृ. (प्रत्यभिज्ञाहृदय) सूत्र ३, पृ. ५४.

३१. **यदि निर्विमर्शः स्यात् अनीश्वरो जडश्च प्रसज्येत ।**

प. प्रा (क्षेमराज–पराप्रावेशिका) पृ. २.

'चित् (चिति, चैतन्य) ही परशिवाची अवस्थित शक्ती (aspect) मानतात. ही परा शक्ती शिवापेक्षा भिन्न नसून,[३३] तिच्यापासून विश्व निर्माण होते. (**चिति... विश्वसिद्धिहेतुः । प्र. हृ सूत्र १**) शिवशक्तींचे अभिन्नत्व इतके आहे की 'शक्तिरहित शिव किंवा शिवभिन्न शक्ती असू शकत नाही शक्ती व शक्तिमान (= शिव) यामधील भेद शैवमताला संमत नाही.[३४] शक्ती ही शिवाची सजनशक्ती आहे. या चिद्रूपिणी शक्तीला तिचे विशेष व्यक्त करणाऱ्या 'विमर्श', 'पराशक्ति', 'परावाक्', 'स्वातंत्र्य', 'ऐश्वर्य', 'कर्तृत्व', 'स्फुरत्ता', 'स्पंद' अशा संज्ञा आहेत. या शक्तीचे अनेक पैलू किंवा स्वरूपे आहेत.[३५] तथापि 'चित्' किंवा 'परासंवित्' चा स्वभाव विश्वरूपात प्रकट होणे हा आहे. 'असे न होता परम शिव एकाच (मूळ) स्वरूपात राहिला असता तर त्याचे महेश्वरत्व व संवित्स्वरूप प्रकट न होता घटादिपदार्थांसारखा (जड) झाला असता[३६]' असे अभिनवगुप्ताने म्हटले आहे.

परशिवाला 'प्रकाश विमर्शमय' म्हटले आहे. यातील 'प्रकाश'चा अर्थ स्वतः प्रकाशस्वरूप असून दुसऱ्याला प्रकाशमान करणारे[३७] आत्मतत्त्व किंवा अहं त्व अथवा अहंता.[३८] 'विमर्श' म्हणजे परमशिवाची दुसऱ्यावर अवलंबून नसलेली इच्छाशक्ती वा स्वातंत्र्य. यामुळे 'इदम्' (विश्व) हे 'अहम्' (आत्मस्वरूप) असल्याची जाणीव (संवित्) होते ही जाणीव पोकळ वा शून्य (contentless) नसून 'ज्याप्रमाणे मोठा न्यग्रोध वृक्ष (सूक्ष्म) न्यग्रोधबीजात शक्तिरूपाने सामावलेला असतो त्याप्रमाणे हे चरावर विश्व परमशिवाच्या अंतःकरण-

---

३२. प प्रा पृ १–२

३३. **पराशक्तिरूपा चितिरेव भगवती... शिवभट्टारकाभिन्ना ।**
प्र. हृ. सू. १ पृ. ४६–४७.

३४. **न शिवः शक्तिरहितो न शक्तिर्व्यतिरेकिणी ।**
**शक्ति-शक्तिमतोर्भेदः शैवे जातु न वर्ण्यते ।।** शि. दृ. (शिवदृष्टि) ३–२–३.

३५ **शक्तयश्च असंख्ययाः । याचे विवरण–यत् विश्वं ता अस्य**
**(पूर्णसंवित्स्वभावस्य परमशिवस्य) शक्तयः, ताः कथमुपदेष्टुं शक्याः ।**
–अभिनवगुप्त, तं सा. (तंत्रसार), आह्निक ४, पृ. २८.

३६. **अस्यास्यदेकरूपेण वपुषा चेन्महेश्वरः ।**
**महेश्वरत्वं संवित्त्व तदत्यक्षद् घटादिवत् ।।** तं लो. (तंत्रालोक), ३.१००.

३७. तुलनार्थ–**तस्य भासा सर्वमिद विभाति ।**
–कठ ५-१५, मुंडक २.२१०, श्वेताश्वतर ६.१४.

३८. **प्रकाशरूपता चिच्छक्तिः ।** तं. सा. आ १, पृ. ६.

बीजात असते.[३९]

परशिवाचे शक्तिविशेष अनेक असले तरी पुढील पाच शक्तिविशेष प्रमुख आहेत.[४०]

१. चिच्छक्ति, २. आनंदशक्ति, ३. इच्छाशक्ति,

४. ज्ञानशक्ति, व ५. क्रियाशक्ति

'परशिव या मुख्यशक्तींनी युक्त असला तरी वस्तुतः तो इच्छा–ज्ञान–क्रियाशक्तींनी युक्त असलेला, अनवच्छिन्नप्रकाश व निजानंदात विश्रान्त असतो' असे अभिनवगुप्ताने म्हटले आहे.

**१. चिच्छक्ति :**

ही शिवाची आत्मप्रकटीकरण करणारी व परावलंबी नसलेली शक्ती. विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय करण्यासाठी तिला बाह्य उपादानाची आवश्यकता नसल्यामुळे तिला 'स्वतंत्रा'[४१] असे म्हटले आहे. ती प्रकाशरूप आहे तिच्या प्रकाशरूपतेमुळे परशिव हा स्वप्रकाश वा स्वसंवेद्य असतो. प्रकाशित करण्यासाठी एकही वस्तू नसली तरी सूर्य जसा स्वयप्रकाश असतो, त्याप्रमाणे प्रकाशरूप असणारी चिच्छक्ति प्रकाश्यवस्तूवर अवलंबून नसणारा (अनन्योमुख) विमर्श अथवा 'अहम्' आहे असे अभिनवगुप्ताने म्हटले आहे.[४२] या शक्तीला 'शिव-तत्त्व'ही म्हणतात. वास्तविक दृष्टीने चित् हा परमशिवाचा स्वभाव आहे.

**२. आनंदशक्ति :**

वस्तुतः परम आनंद ही परमशिवाची शक्ती मानण्यापेक्षा स्वभाव वा स्वरूप

---

३९. **यथा न्यग्रोधबीजस्थः शक्तिरूपो महाद्रुमः ।**
**तथा हृदयबीजस्थं विश्वमेतच्चराचरम् ॥**
प. त्रि (क्षेमराजकृत परात्रिंशिका), कारिका २४.

४०. **तस्य च स्वातन्त्र्यम् आनन्दशक्तिः, तच्चमत्कार इच्छाशक्तिः, प्रकाशरूपता चिच्छक्तिः, आमर्षात्मकता ज्ञानशक्तिः, सर्वाकारयोगित्व क्रियाशक्तिः, इत्येवं मुख्याभिः शक्तिभिः युक्तोऽपि वस्तुत इच्छा-ज्ञान–क्रियाशक्तियुक्तः अनवच्छिन्नः प्रकाशो निजानन्दविश्रान्तः शिवरूप ।** तं. सा. १ पृ. ६

४१. **चितिः स्वतन्त्रा विश्वसिद्धिहेतुः ।** प्र हृ सू १
'विश्वसिद्धि' म्हणजे 'सदाशिव ते पृथिवी' या अखेर असलेल्या तत्त्वांची निर्मिती. या सूत्राने मायावाद नाकारला आहे

४२. अभिनवगुप्त अन्यत्र (तं सा. आ. १, पृ. ६) म्हणतोः
**स च प्रकाशो न परतन्त्रः, प्रकाश्यत्वं हि पारतन्त्र्यम् प्रकाश्यता च प्रकाशान्तरापेक्षितैव, न च प्रकाशान्तरं किञ्चित् अस्ति इति स्वतन्त्र एकः प्रकाशः ।**

मानणे सयुक्तिक ठरेल. या शक्तीला अभिनवगुप्ताने 'स्वातन्त्र्य' म्हटले आहे. परावलंबी न होता–बाह्य साधनांवर (उपादानावर) अवलंबून न राहता काहीही करण्याची वा होण्याची ही शक्ती आहे (**यो हि तथाबुभवुः न प्रतिहन्यते ।**). परावलंबी नसलेला हा आनंद आल्हादप्रधान, स्वावलंबी, स्वाश्रय, 'स्वात्म विश्रान्तिस्वभाव' आहे. प्रकाश व आनंद या दोन्ही विशेषांत परशिव स्वतंत्र आहे असे अभिनवगुप्ताने म्हटले आहे. परशिव व वेदान्त्यांचे ब्रह्म या दोन्ही संकल्पना सारख्या असल्या तरी 'सच्चिदानंद' हे ब्रह्माचे विशेषण शिवाला न लावता त्याला 'चिदानंदघन' म्हणतात. कारण चित् हे सत्‌चे समावेशक असल्यामुळे (सत् असेल तरच ते चित् होईल) त्याचा स्वतंत्र उल्लेख करणे ते अनावश्यक मानतात.

**३. इच्छाशक्ति :**

स्वतःला वाटेल ते होण्याची वा निर्माण करण्याची (**तथाबुभूषु–लक्षणा**) शक्ती. हे परमावधीचे इच्छास्वातंत्र्य आहे. याच्या आड कोणीही येऊ शकत नाही (**स्वातन्त्र्यं च नाम यथेच्छं तत्रेच्छाप्रसरस्य अविघातः।**) या शक्तीमुळे परमेश्वरास 'सदाशिव' किंवा 'सदाख्य' ही संज्ञा आहे.

**४. ज्ञानशक्ति :**

अभिनवगुप्ताने हिला 'आमर्षात्मकता' म्हणजे कोणत्याही वस्तूबद्दल काही भावना वा इतर प्रतिक्रिया न वाटता वस्तुजाताचे ज्ञान जाणीव (**ईषत्तया वेद्योन्मुखता**) होणे अशी संज्ञा दिली आहे. या शक्तीमुळे पर शिवास 'ईश्वर' म्हटले आहे.

**५. क्रियाशक्ति :**

कोणताही आकार घेण्याचे (स्वतःपासून वस्तुजात निर्माण करण्याचे) सामर्थ्य. या शक्तीमुळे पर शिवास 'सद्विद्या' किंवा 'शुद्ध' विद्या म्हटले आहे.

शक्तीचे अनंत प्रकार (modes) असले तरी मुख्यतः या शक्तीच्या वरील पाच प्रकारांनी शिव आपल्या स्वतंत्र इच्छाशक्तीने आणि बाह्य उपादान न घेता स्वतःमध्ये अथवा स्वतःच्या पार्श्वभूमीवर (**स्वभित्तौ**) विश्व निर्माण करतो. त्याला मायेची आवश्यकता नाही. सोमानंदाने 'शिवदृष्टी'त म्हटले आहे––

'ज्याप्रमाणे योग्यांच्या बाबतीत केवळ त्यांच्या इच्छामात्रेकरून निरनिराळ्या रूपांची उत्पत्ती होते, त्याप्रमाणे प्रभूला फक्त इच्छेव्यतिरिक्त पृथ्वी वगैरे कोणतेही साधन (उपादान) लागत नाही. भगवंताची इच्छाच विश्वरूपाने व्यक्त होते.'[४३]

---

४३. **योगिनामिच्छया यद्वन्नानारूपोपपत्तिता ।**
**न चास्ति साधनं किञ्चिन्मृदादीच्छां विना प्रभोः ।।**
**तथा भगवदिच्छैव तथात्वेन प्रजायते ।।** शिवदृष्टि, १.४४–४५.
(**तथात्वेन = भगवदिच्छामात्रमेव विश्वरूपं**
**सम्पद्यते**–उत्पलदेवटीका)

ईश्वरप्रत्यभिज्ञेतही म्हटले आहे :

'बाह्य साहित्य न घेता योगी ज्याप्रमाणे आपल्या इच्छाशक्तीने वस्तू किंवा पदार्थ निर्माण करतो त्याप्रमाणे चित्स्वरूप असलेला हा देव परमशिव आपल्या ठिकाणी स्थित असलेले (**अन्त:स्थित**) वस्तुजात कोणतेही बाह्य उपादान न घेता केवळ इच्छाशक्तीने निर्माण करतो.'[४४]

## पर शिवाची पंचकृत्ये

हा सर्व शक्तिमान् शिव पुढील पाच 'कृत्ये' करतो :

१. **सृष्टि** – √ सृज् 'जाऊ देणे' यावरून 'सृष्टि' म्हणजे स्वत:मध्ये सामावलेले विश्व 'जाऊ देणे (प्रकट करणे). त्याला यासाठी निराळे उपादान आवश्यक नाही. विश्व ही 'निर्मिति' नसून प्रकटीकरण आहे.

२. **स्थिति** – विश्वप्रकटीकरणाची क्रिया चालू ठेवणे.

३. **संहार** – विश्व परत आपल्यात ओढून घेणे. विश्वाचा नाश होत नाही. ते शिवात लीन होते विश्वाची उत्पति–स्थिति–संहार ही शिवाची क्रीडा सनातन व अनंतकाळ चालणारी आहे.

४. **विलय, पिधान** – आत्म्याचे सत्यस्वरूप झाकणे.

५. **अनुग्रह** – कृपा. शिवकृपेशिवाय मोक्ष नाही. शिव परमकृपाळू आहे. किंबहुना विश्वाची उत्पत्ति, स्थिती व लय ही क्रिया जीवमात्रांवर अनुग्रह करण्यासाठी आहे असे मानले जाते.

वसुगुप्ताने विश्व हे परमशिवाच्या शक्तीचा 'प्रचय' (= क्रियाशक्ती, स्फुरणरूप विकास) असून,[४५] त्यायोगे तो स्वत: विश्वरूपाने नटून विश्वमय (immanent) असतो. त्याच वेळी विश्वनिर्मितीचा कसलाही परिणाम न झालेला — विश्वोत्तर (Transcedental) असतो. याच्या शक्तीचा जेव्हा 'उन्मेष' किंवा विकास होतो तेव्हा विश्वोत्पत्ती होते व जेव्हा निमेष किंवा संकोच होतो तेव्हा प्रलय होतो.[४६]

---

४४. चिदात्मैव हि देवोऽन्त: स्थितमिच्छावशाद् बहि: ।
योगीव निरुपादानमर्थजातं प्रकाशयेत् ॥ ईश्वरप्रत्यभिज्ञा १.५.७. पृ. १८२.

४५. स्वशक्तिप्रचयोऽस्य विश्वम् । शिवसूत्र ३ ३०.
याचे विवरण करताना क्षेमराजाने 'विमर्शिनी' टीकेत म्हटले आहे :
'शक्तयोऽस्य जगत्कृत्स्नम्...' इत्याद्याम्नायदृष्टया शिवस्य विश्वं स्वशक्तिमयं, तथा अस्याऽपि स्वस्या: संविदात्मन: शक्ते: प्रचय: क्रियाशक्तिस्फुरणरूपो विकासो विश्वम् ।

४६. अस्यां हि प्रसरत्यां जगत् उन्मिषति, व्यवतिष्ठते च, निवृत्तप्रसरायां च निमिषति । प्र. हृ. पृ. ४७.

शिवाच्या नेत्राची उघडझाप ही विश्वोत्पत्ती व प्रलय करण्याची क्रीडा आहे. भगवान् शिव या उत्पत्ति - स्थिति - लयांना कारणीभूत असणाऱ्या शक्ति-समूहाचा क्रीडेचा हेतू आहे.[४७]

शंकराच्या शक्तीच्या या उन्मेषाला 'उदय', 'आभासन', 'सृष्टि' इ. पर्यायशब्द आहेत. सृष्टीच्या निमेषाला अथवा 'बीजावस्थापन'[४८] परिस्थितीत जाण्यास 'प्रलय' म्हणतात. प्रलयात विश्वाचा विनाश होत नाही. सृष्टि व प्रलय मिळून एक कल्प होतो. असे अनंत कल्प होऊन गेले आहेत.

## तत्त्वे

त्रिकशास्त्रात पुढील ३६ तत्त्वे मानली आहेत[४९] :

१ शिव, २. शक्ति, ३. सदाशिव, ४. ईश्वर, ५. शुद्ध विद्या, ६. मार्या, ७. कला, ८. विद्या, ९. राग, १०. काल, ११. नियति, १२. पुरुष. १३. प्रकृति, १४. बुद्धि, १५. अहंकार, १६. मन, १७. श्रोत्र, १८. त्वक्, १९. चक्षु, २०. जिह्वा, २१. घ्राण, २२. वाक्, २३. पाणि (हात), २४. पाद, २५. पायु, २६ उपस्थ, २७. शब्द, २८. स्पर्श, २९. रूप, ३०. रस, ३१. गन्ध, ३२ आकाश, ३३. वायु, ३४ वह्नि, ३५. सलिल, ३६. पृथ्वी.

पराप्रावेशिकेत (पृ. ६) दिलेल्या या यादीवरून त्रिकशास्त्राने सांख्यशास्त्रातील सर्व तत्त्वे स्वीकारली आहेत हे स्पष्ट आहे. सांख्यांपेक्षा जी निराळी अधिक तत्त्वे त्रिकशास्त्रात स्वीकारली आहेत त्यांचा प्रथम विचार करू.

---

४७. **शक्तीनां चक्रं समूहस्तस्य यो विभव उद्योगावभासनचर्वणविलापनात्मा क्रीडाडम्बरस्तस्य प्रभवं हेतुम् ।**

—क्षेमराज स्पन्दनिर्णय, पृ. ७, कारिका १ व २

४८. प्रत्यभिज्ञाहृदय, सूत्र ११.

४९. त्रिकशास्त्रात ३६ तत्त्वे आहेत हे सुरेश्वराचार्यांनी

**'षट्त्रिंशत्तत्त्वसङ्घातः सर्वत्राप्यनुवर्तते ।**

असे मानसोल्लासात (१५४) नमूद केले आहे. त्यावर टीका लिहिताना रामतीर्थयतीने 'ही शैवागमात प्रसिद्ध असलेली १६ तत्त्वे आहेत' असे म्हटले (**एवं षट्त्रिंशत्तत्त्वानि शैवागमे प्रसिद्धानि**). पण त्यानी दिलेली तत्त्वांची यादी त्रिकशास्त्रापेक्षा थोडी भिन्न आहे ती अशी :

५ महाभूते, ५ प्राण, १४ इंद्रिये = २४

महत् (महान्), काल, प्रधान, माया, विद्या, पुरुष = ६

बिंदु, नाद, शक्ति, शिव, शांत, अतीत = ६

३६

## १. शिव :

क्षेमराजाने 'इच्छा-ज्ञान–क्रियात्मक, केवल पूर्णानन्द स्वभाव असलेला परम शिव' म्हणजे 'शिव तत्त्व' अशी व्याख्या दिली आहे.[५०] 'षट्-त्रिशत्सन्दोहात 'ज्याच्यापेक्षा श्रेष्ठ कोणी ह नाही व जो आपल्या (स्वतंत्र) इच्छने हे अखिल जग निर्माण करण्यासाठी जे स्पदन परमशिव करता झाला त्याचा पहिला स्पन्द म्हणजे शिवतत्त्व होय"[५१] असे म्हटले आहे. या दोन्ही व्याख्यांवरून, पर शिवाचा विश्वनिर्मिती करणारा पहिला पैलू (aspect) शिवतत्त्व आहे.

## २. शक्तितत्त्व :

शक्तितत्त्व म्हणजे 'ज्याची इच्छाशक्ती अप्रतिहत आहे अशा परमेश्वराची जग निर्माण करण्याची इच्छा असलेला पहिला स्पन्द.[५२] क्षेमराजाने शक्तितत्त्वाच्या केलेल्या व्याख्येवरून शिव-शक्तीमध्ये भेद नाही असे दिसते. 'ज्यावेळी इच्छा, ज्ञान व क्रिया या हृदयत्रिकोणातील मधुमांसामुळे आनंद उचंबळून येऊन विश्वनिर्मितीसाठी उन्मख होतो तो शक्तीचा स्वभाव आहे[५३] असे महेश्वरानदांनी म्हटले असून त्याचे स्पष्टीकरण करताना 'आपल्या हृदयात बीजरूपाने असलेले (विश्व) शिव प्रकट करण्यासाठी जो उत्सुक व उन्मुख होतो, त्याची निर्मितीची जी तीव्र इच्छा ती शक्ती होय' असे ते म्हणतात.[५४]

मालिनीविजयतंत्रामध्ये 'परमशिवाची जग निर्माण करण्याची इच्छा असणे

---

५०. पराप्रावेशिका पृ. ६

५१. **यदयमनुत्तरमूर्त्तिर्निजेच्छयाखिलमिदं जगत् स्रष्टुम् ।
पस्पदे स स्पन्दः प्रथमः शिवतत्त्वमुच्यते तज्ज्ञैः ॥**

—षट्‌त्रिंशत्सन्दोह कारिका १.

राजानकानंदाने यावर टीका लिहिताना उपोद्घातातच परमशिवाची सर्व लक्षणे—स्वातंत्र्य, क्रीडा म्हणून विश्वसृष्टि, त्याचेच मध्ये (आत्मभित्तौ) प्रतिबिंबित होणे इ. संक्षिप्तपणे दिली आहेत.

५२. **अस्य जगत् स्रष्टुमिच्छां परिगृहीतवतः परमेश्वरस्य प्रथमस्पन्द एवेच्छाशक्तितत्त्वम् अप्रतिहतेच्छत्वात् ।** पराप्रावेशिका पृ. ६–७.

५३. **सोच्चिअ बीसं महिउ णाउं काउं च उम्मुहो होंतो ।
सक्ति (सत्ति ?) सहावो कहिओ हिअअ–तिओण महुमंसलुल्लासो ॥ १४ ॥**

—महार्थमंजरी, कारिका १४.

५४. **यदा स्वहृदयवर्तिनमुक्तरूपमर्थतत्त्वं बहिःकर्तुमुन्मुखो भवति, तदा शक्तिरिति व्यवह्रियते ।**—महार्थमञ्जरी पृ. ३९.

हीच शक्ती होय' असे सांगितले आहे.[५५] आपल्या छांदोग्य उपनिषदामध्ये (६. २. १–३) म्हटले आहे : 'सत् हे प्रथम एकटे (अद्वितीय) होते. त्याने पाहिले (आणि संकल्प केला) 'मी अनेक व्हावे–निर्मिती करावी. (**तदैक्षत बहुस्याम् प्रजायेय**) सत्‌ची ही पाहण्याची इच्छा व 'विमर्श' वा (विश्वनिर्मितीबद्दलची) उन्मुखता यात साम्य आहे. वर सांगितल्याप्रमाणे शिव–शक्ती अभिन्न आहेत व शक्तितत्त्वामध्ये शिवाचा विश्वोत्पत्तीचा आनंदभाव व्यक्त होतो.

त्रिकशास्त्रातील शिव-शक्ति संकल्पना व अनुभवामृतामधील 'शिवशक्तिसमावेशन' या प्रकरणातील 'देवो-देवी' संकल्पनेशी साम्य आहे. पण शिवशक्तितत्त्व 'आभास' नसून 'आभास बीज' आहे (आभासवाद पाहा).

## १. सदाशिव किंवा सादाख्य तत्त्व

विश्वविकास होताना परमशिवाच्या इच्छेचे विश्वरूप होण्यात ज्ञान व क्रिया या दोन शक्ती असतात, विश्व म्हणजे 'अहम्–इदम्' प्रत्यय. या सदाशिव तत्त्वाचे ठिकाणी ज्ञान व क्रिया या दोन्ही शक्ती असतात. (**ज्ञानक्रिये सादाख्यम्**) तथापि ज्ञानशक्तीचे प्राधान्य असलेले तत्त्व म्हणजे सदाशिव तत्त्व. सोमानंदाने म्हटले आहे–

**अथास्माकं ज्ञानशक्तिर्या सदाशिवरूपता ।** शिवदृष्टि २.१. ही ज्ञानशक्ती म्हणजे विश्वाचा जो **अहम् अस्मि (इदम्)** हा प्रत्यय आहे. यातील अस्मित्वाची किंवा 'इदं-ते'ची अस्फुट जाणीव. ज्याप्रमाणे चित्रकाराला चित्र प्रत्यक्ष रेखाटण्यापूर्वी डोळ्यासमोर भावी चित्राची अस्पष्ट चित्ररेखा असते त्याप्रमाणे या तत्त्वाला 'इदम्' या अंशाची अस्फुट जाणीव असते या जाणीवेला 'अनुन्मीलितचित्रन्याय' म्हणतात या अवस्थेत परमशिवाच्या इच्छेलाच प्राधान्य असते.[५६] महेश्वरानन्दांनी 'ज्ञान व क्रिया या दोन्हीपैकी पहिला उन्मेष म्हणजे 'सदाशिव देव आहे'[५७] असे म्हणून त्याचे विवरण करताना सदाशिवाला 'अनुन्मीलित चित्र

---

५५. **या सा शक्तिर्जगद्धातुः कथिता समवायिनी ।**
**इच्छात्वं तस्य सा देवी सिसृक्षोः प्रतिपद्यते ॥**
मालिनी विजय तंत्र ३.५ [ महार्थमंजरी, पृ. ४० –परिमलटीकेत उद्धृत ]

५६. **तत्र प्रोन्मीलितमात्रचित्रकल्पतया इदमंशस्य अस्फुटत्वात् इच्छाप्राधान्यम्, अतः स भाविनः समस्तराशेः बहिरवभासयिषालक्षणक्रीडारसिकत्वात् अनुग्रहानिरतस्तद्भूमिकां गृह्णाति ।**
–षट्त्रिंशत्तत्त्वसंदोह का. ३ चे राजानकानंदाचे विवरण, पृ. ३.

५७. **णाणं किअत्ति दोण्ण वि पढमुम्मेसम्मि सइसिवो (सदाशिवः) देवो ।**
महार्थमंजरी, गाथा १५.

न्याय' लावला आहे.[५८] परंतु हा 'इदन्ते' कडील कल म्हणजे 'अहन्ते' वर कमी भर नव्हे. क्षेमराजांनी 'परा प्रावेशिकेत' (पृ. ७) म्हटले आहे, 'सत् हे अंकुरत्वाला येणारे जग आहे. ते आपल्या 'अहन्ते'ने आच्छादून ('अहम्' ही जाणीव स्पष्ट असून) स्थित असलेले रूप म्हणजे सदाशिव तत्त्व होय (**सदेवाङ्कुरायमाणमिदं जगत् स्वात्मनाच्छाद्य स्थितं रूपं सदाशिवतत्त्वम् ।**) हेच प्रत्यभिज्ञाहृदयात निराळ्या शब्दांत पुढीलप्रमाणे मांडले आहे: 'सदाशिवतत्त्वात अहन्तेची स्पष्ट जाणीव असलेले व 'इदन्तेची–विश्वाची–अस्फुट जाणीव असलेले असे विश्वोत्पत्ती होऊ घातलेले हे तत्त्व आहे [५९]

हे तत्त्व हा पहिला 'आभास' (manifestation) आहे. पण यातील द्रष्टा व दृश्य (subject and project) चित् (consciousness) आहे.

सदाशिवतत्त्वाची अनुभूती झालेल्या व्यक्तीला 'महामंत्रेश्वर' म्हणतात. सारे विश्व म्हणजे मीच आहे (**अहमस्मि इदम्**) अशी त्याची अनुभूती असते.

### ४. ईश्वर अथवा ऐश्वर्यतत्त्व

सादाख्य किंवा सदाशिव तत्त्वात 'अहम् **अस्मि** (इदम्)' अशी विश्वाची अस्फुट जाणीव असते परंतु ईश्वरतत्त्वात '**इदम्** अस्मि अहम्' अशी ती अधिक स्पष्ट (स्फुट) होते. त्यामुळे या तत्त्वाला 'विश्वोन्मेष (**अङ्कुरितं जगत्**) म्हणतात. 'अहम्'चा अंश अधिक स्पष्ट (स्फुट) झालेल्या 'इदम्' मध्ये असल्यामुळे हे ज्ञानशक्तिप्रधान तत्त्व आहे. क्षेमराजाने ही संकल्पना 'पराप्रावेशिकेत (पृ.७)

**अङ्कुरितं जगदहन्तयाऽऽवृत्य स्थितमीश्वरतत्त्वम् ।**

या शब्दांत मांडली आहे. 'प्रत्यभिज्ञाहृदयात' तो म्हणतो: '**ईश्वरतत्त्वा**मध्ये इदंता व अहन्ता सारख्या प्रमाणात स्पष्ट असते. ईश्वरतत्त्वाचा साक्षात्कार झालेल्याला 'मंत्रेश्वर' म्हणतात.[६०]

सदाशिव तत्त्वातील अनुभूति 'अहमिदम्' ('अहम्'ची अधिक स्फुटता असलेली व पर्यायाने 'इदम्'ची अस्फुट जाणीव असणारी) असते तर ती ईश्वर

---

५८. **अहन्तेदन्तालक्षणयोर्ज्ञानक्रिययोराद्योद्रेकादनुन्मीलितचित्रन्यायेन व्यक्ताव्यक्तमयविश्वप्रमातृतास्वभावं सदाशिवाख्यं तत्त्वम् ।** –परिमल पृ. ४१

५९. **सदाशिवतत्त्वेऽहन्ताच्छादिता स्फुटेदन्तामयं विश्वम् ।**

–प्रत्यभिज्ञाहृदय (सूत्र ३ वर)

६०. **ईश्वरतत्त्वे स्फुटेदन्ताऽहन्तासामानाधिकरण्यात्म यादृक् विश्वं ग्राह्यम्, तथाविध एव ईश्वरभट्टारकाधिष्ठितो मन्त्रेश्वरवर्गः।** उत्पलमते हे 'सामान्याधिकरण' पुढील 'सद्विद्या' तत्त्वात आढळते.

प्र. हृ. सूत्र ३ वर, पृ. ५३

तत्त्वात 'इदमहम्' ('इदम्'ची अधिक स्फुट जाणीव असणारी) होते. 'षट्त्रिंशत्सन्दोहा'च्या ४थ्या कारिकेतील ईश्वरलक्षणावर (**विश्वं पश्चात् पश्यन् इदन्तया निखिलमीश्वरो जातः**) विवरण करताना राजानकानन्दाने म्हटले आहे, विश्वाचे क्रमाने अवभासन होताना ईश्वरतत्त्वामध्ये सर्व वेद्य वस्तू (the objective side of reality) म्हणजे सर्व विश्व किंवा 'इदम्' हे स्पष्ट होते. त्यामुळे ज्ञानशक्तीचा आन्तर दशेत उद्रेक असतो तेव्हा ती सदाशिव अवस्था असते पण जेव्हा ती ज्ञानशक्ती बहिर्मुख (**बहिर्भाव पर**) होते तेव्हां तिला 'ईश्वरावस्था' म्हणतात.[६१]

महेश्वरानंदांनी 'महार्थमञ्जरी' वरील 'परिमल' टीकेत म्हटले आहे:

'उन्मेष व निमेष ही परमेश्वराच्या परमस्वातंत्र्याचे लक्षण असणारे स्पन्दतत्त्व आहे. ज्यावेळी 'अहन्तेचा' (subjectivity) चा उन्मेष होतो तेव्हां 'इदन्ते'चा (objectivity) चा निमेष होतो व 'इदन्ते'चा उन्मेष झाला की 'अहन्तेचा' निमेष होतो त्यापैकी ईश्वरतत्त्व बहिरुन्मेष दाखवते व सदाख्य किंवा सदाशिव 'आन्तरिक उन्मेष' दाखवते.[६२]

## ५. सद्विद्या किंवा शुद्ध विद्या तत्त्व

ज्यावेळी (ज्या अवस्थेत) अहन्ता व इदन्ता ही दोन्ही सारखीच स्पष्ट होतात,[६३] म्हणजे इदन्तेचा अंश अधिक स्पष्ट होऊन अहन्ता व इदन्ता एकाच ताजव्यात तोलून सारखे असल्याप्रमाणे आढळतात तिला–त्या तत्त्वाला – शुद्धा विद्या म्हणतात.[६४] हीच संकल्पना '**अहन्तेदन्तयोरैक्यप्रतिपत्तिः शुद्धविद्या**' अशी

---

६१. **एवं क्रमावभासनात् विश्वस्य...अत्र वेद्यजातस्य स्फुटावभासनात् ज्ञानशक्त्युद्रेकः। आन्तरदशाया उद्रिक्तत्वात् सदाशिवावस्था बहिर्भावपरतोद्रेकात्तु ईश्वरावस्था इत्यनयोर्विशेषः।** –षट्त्रिंशत्सन्दोह, पृ. ४

६२. **उन्मेषनिमेषौ नाम परमेश्वरस्य परमस्वातन्त्र्यलक्षणं स्पन्दतत्त्वम्। तत्र च यदाहन्तोन्मेषस्तदानीमिदन्ताया निमेष इदन्तोन्मेषे चाहन्ताया निमेष इत्यनेन "ईश्वरो बहिरुन्मेषो निमेषोन्तः सदाशिमः।"** – महार्थमञ्जरी पृ. ४२

६३. **सा भवति शुद्धविद्या येदन्ताहन्तयोरभेदमतिः।**—षट्त्रिंशत्सन्दोह, ४.
या कारिकेवरील विवरणात राजानकानन्दाने म्हटले आहे: **प्ररूढभेदस्य इदन्तांशस्य समधृततुलापुटन्यायेन अहमंशस्फुरणायां शुद्धविद्यातत्त्वम्। अत्र विश्वस्य स्फुटतरं परामर्शनात् क्रियाशक्तिः प्रधाना।**

६४. **सामानाधिकरण्यं च सद्विद्याहमिदंधियोः।** –उज्वल, ईश्वरप्रत्यभिज्ञा ३-१-३ पृ. १९६. याचे अभिनवगुप्तकृत स्पष्टीकरण–**मध्यमे तु रूपे 'अहमिदम्' इति समधृततुलापुटन्यायेन यो विमर्शः।**

सुटसुटीतपणे क्षेमराजाने मांडली आहे.[६५] या अवस्थेत 'अहम्' व 'इदम्' (विश्व) दोन्ही विभिन्नपणे स्पष्ट प्रतीत झाले तरी दोन्ही एकाच वस्तूसंबंधी (समानाधिकरण) आहेत – इदम् (विश्व) व मी भिन्न भासलो तरी विश्व माझाच भाग आहे – अशी भेदाभेद विमर्शनात्मक अवस्था असते. या अवस्थेत 'मी म्हणजे मी' व 'इदम् अथवा विश्व म्हणजे विश्व' (**अहम् अहम्–इदम इदम**) अशा परस्परसंबंधांची वास्तव अनुभूती असल्यामुळे हिला सद्विद्या किंवा शुद्धविद्या म्हटले आहे. ही पर (उच्च) व अपर (खालची) या दोहोमधील अवस्था असल्यामुळे हिला परापरदशा म्हणतात. या दशेत क्रियाशक्ती प्रबल असते.

सारांश वैश्विक अनुभूतीचा (universal experience) विचार करता या वरील तत्त्वांत पुढील विमर्श (अनुभूति) आढळतात:[६६]

(१) शिवतत्त्व : **अहम् विमर्श** ('सर्व अहम् ही अनुभूति)

(२) सदाशिव किंवा सादाख्य तत्त्व : **अहम् इदम् विमर्श** (अहम्ची विशेष अनुभूती व इदम्ची नुसती जाणीव)

(३) ईश्वर तत्त्व : **इदम्–अहम् विमर्श** (इदम्ची अधिक जाणीव)

(४) शुद्धा विद्या : **अहम् अहम्—इदम् इदम् विमर्श**

मी व विश्व यांची समान व समतोल अनुभूति या सर्व अवस्था परमशिवाचे स्वरूप तिरोधान करणाऱ्या (झाकणाऱ्या) नाहीत. त्यामुळे या सर्वांना मिळून 'शुद्धाध्वन्' (शुद्धमार्ग) म्हटले आहे.[६७]

## अशुद्धाध्वन्

(तत्त्वे ६ ते ११) **माया व तिची पाच कंचुके**

येथून पुढे जी तत्त्वे आहेत त्यांच्यामुळे परमशिवाच्या स्वरूपाचे तिरोधान (झाकणे, लपविणे) होते आणि त्याच्या शक्तींचा संकोच होतो म्हणून या तत्त्वांना 'अशुद्धाध्वन्'-अशुद्ध मार्ग–म्हटले आहे. या तिरोधान करणाऱ्या तत्त्वांत माया-तत्त्व प्रमुख आहे. त्रिकशास्त्रात माया वास्तव सत्य आहे अद्वैत वेदान्ताप्रमाणे ती असत् अथवा मिथ्या नाही. 'माया' शब्द √मा– 'मोजणे, मापणे यापासून झाला आहे. मायेमुळे शिवाची अपार अनुभती 'मेय' म्हणजे मर्यादित होते. ती 'इदम्' (विश्व) पासून 'अहम्' आणि 'अहम्' पासून 'इदम्' वेगळे विभक्त करते आणि वस्तू–वस्तू मध्ये विभिन्नता आणते. 'सद्विद्या' तत्त्वापर्यंत अनुभूति विश्वात्मक (universal) होती. त्यामध्ये 'इदम्' म्हणजे 'सर्व विश्व' होते. पण मायेमुळे परमशिवाच्या

---

६५. पराप्रावेशिका, पृ. ७.

६६. अभिनवगुप्त–ईश्वरप्रत्यभिज्ञा ३.१.३ वरील 'विमर्शिनी' पाहा.

६७. उत्पल–ईश्वरप्रत्यभिज्ञा, ३.१.४ यावरील अभिनवगुप्तकृत 'विमर्शिनी पाहा.

शक्तींवर आवरण येऊन त्याच्या शक्तींचा संकोच होतो. मायेमुळे आत्मा स्वतःचा स्वभाव विसरतो व त्याच्या ठिकाणी विभेदबुद्धि निर्माण होते आणि तिच्यामुळे सर्व जीव व वस्तुजात भिन्न भासतात.[६८]

'**स्व-स्वरूपेषु भावेषु भेदप्रथा माया**' असे क्षेमराजाने 'पराप्रावेशिके'त (पृ. ७) मायेचे लक्षण दिले आहे. म्हणजे चिद्रूपाने पदार्थ (भाव) एक-मय असले तरी त्यांचे ते (एकत्व) स्वरूप झाकून (तिरोधान करून) ते भिन्न आहेत असे भासवणारी ती माया. अभिनवगुप्तमते ही 'अवभास' घडवून आणणारी माया परमेश्वराची शक्ती आहे.[६९]

आत्म्यावर आवरण घालून व त्याची स्वभाव-विस्मृति करवून, त्याच्या मूळच्या असीम सामर्थ्यावर मर्यादा घालणारी मायेची पुढे दिल्याप्रमाणे पाच 'कंचुकें' आहेत तीं अशी:

१. कला : ही चिच्छक्तीचे सर्वकर्तृत्व-कर्तुमकर्तुम् शक्ति झाकून आत्म्याच्या कर्तृत्वावर मर्यादा घालते.[७०]

२. विद्या : चिच्छक्तीच्या किंवा आत्म्याच्या सर्वज्ञत्वावर आवरण घालून त्याचे ज्ञान फार मर्यादित करून त्याला सर्वज्ञाचा अल्पज्ञ करते.[७१]

३. राग : पूर्णत्वामुळे नित्यतृप्त असलेल्या आत्म्याचे ठिकाणी निरनिराळ्या वस्तूंबद्दल इच्छा किंवा हाव निर्माण करतो व भोगात रमवतो.[७२]

४. काल : नित्यत्व असलेल्या आत्मतत्त्वावर कालदृष्ट्या मर्यादा घालून वर्तमान, भूत व भविष्य हे नियत भेद निर्माण करतो.[७३]

---

६८. 'षट्त्रिंशत्सन्दोहात' (कारिका ५) मायेचे लक्षण पुढीलप्रमाणे दिले आहे.
**माया विभेदबुद्धिर्निजांशजातेषु सकलजीवेषु ।**
यावरील राजानकानन्दाचे विवरण:
**तत्र तत्र भिन्न-भिन्न-प्रथात्मक-मायीय-मलेन स्वाङ्गकल्पेष्वपि जडवेद्यवर्गेषु विभिन्नतया बुद्धिरेव मायाख्यं तत्त्वम् ।** (उपर्युक्त पृ. ५)

६९. अभिनवगुप्त म्हणतो: **अवभासकारिणी च परमेश्वरस्य माया नाम शक्तिः ।**
—तंत्रसार पृ. ७७-७८

७०. **तत् सर्वकर्तृता सा संकुचिता कतिपयार्थमात्रपरा ।**
**किंचित्कर्तारममुं कलयन्ती कीर्त्यते कला नाम ।। ८ ।।**

७१. **सर्वज्ञतास्य शक्तिः परिमिततनुरल्पवेद्यमात्रपरा ।**
**ज्ञानमुत्पादयन्ती विद्येति निगद्यते बुधैराद्यैः ।। ९ ।।**

७२. **नित्यपरिपूर्णतृप्तिः शक्तिस्तस्यैव परिमिता तु सती ।**
**भोगेषु रञ्जयन्ती सततममुं रागतत्त्वतां याता ।। १० ।।**

७३. **सा नित्यतास्य शक्तिर्निष्कृष्य निधनोदयप्रदानेन ।**
**नियतःपरिच्छेदकरी क्लृप्ता स्यात्कालतत्त्वरूपेण ।। ११ ।।**

५. नियति : आत्मतत्त्व वा चिच्छक्तीचे स्वातंत्र्य वा व्यापकत्व मर्यादित करून दिशा किंवा स्थल (Space) व कार्य-कारणभावाच्या मर्यादा घालते.[७४]

हीं कंचुकें म्हणजे शिवाने आणव, मायिय व कार्म मलांच्या मर्यादा स्वीकारल्यानंतर अथवा मायेच्या आवरणांमुळे परम शिवाच्या शक्तींचा पुढील प्रमाणे संकोच होतो.[७५]

| शक्ति [परमशिवाची] | शक्ती [मर्यादित] [जीवाची] |
|---|---|
| १. सर्व-कर्तृत्व | कला |
| २. सर्वज्ञत्व | विद्या |
| ३. पूर्णत्व-नित्यतृप्ती | राग |
| ४. नित्यत्व | काल |
| ५. व्यापकत्व (स्वातंत्र्य) | नियति |

**(१२, १३) व्यक्ति-मर्यादित तत्त्वें.**

(Principles limited to individual Subject–Object)

**१२. पुरुष.**

क्षेमराजाने ' पराप्रावेशिकेत ' (पृ. ७–९) या संकल्पनेचे सुंदर स्पष्टीकरण केले आहे. त्रिकशास्त्रात ' पुरुष ' याचा अर्थ केवळ मनुष्य नसून प्राणी (sentient being) असा आहे. " ज्यावेळी परमेश्वर आपल्या मायानामक शक्तीमुळे संकुचितता धारण करतो, तेव्हां त्याला ' पुरुष ' अशी संज्ञा असते. हा आपले मायेने मोहित होणे व कर्मांनी बद्ध होणे मानतो व संसारी (या देहात बाल–तारुण्य-वृद्धादी अवस्था व बुद्धी वगैरेने पुढील जन्मात संक्रमण असणारा) होतो. आपल्या मूळ स्वरूपावर आवरण घालणाऱ्या मायेची कंचुकें स्वीकारल्यामुळे परमशिवावस्थेतील त्याच्या सर्वकर्तृत्व, सर्वज्ञत्व, पूर्णत्व इ. शक्ती संकोच पावून

---

७४. **याऽस्य स्वतन्त्राख्या शक्तिः संकोचश लिनी सैव ।**
**कृत्याकृत्येष्ववशं नियतममुं नियमयन्त्यभून्नियतिः ॥ १२ ॥**
—षट्त्रिंशत्तत्वसन्दोह, पृ ६-८

वरील (षट्त्रिंशत्सं. च्या १२ व्या) कारिकेवर राजानकानन्दाने म्हटले आहे की, ' कार्य व अकार्य यांच्यावर मर्यादा वा बंधन घालून विशिष्ट कार्याचे बाबतीत विशिष्ट कारणच ठरवणे हे नियतीचे कार्य आहे.

७५. **तथा सर्वकर्तृत्व–सर्वज्ञत्व–पूर्णत्व–नित्यत्व–व्यापकत्व–शक्तयः सङ्कोचं गृह्णाना यथाक्रमं कला–विद्या–राग-काल–नियतिरूपतया भान्ति ।**
—प्रत्यभिज्ञाहृदय, सू. ९ वर, पृ. ७२–७३

कला (किंचित कर्तृत्व), विद्या (किंचिज्ज्ञत्व) इ. स्वरूपात त्या मर्यादित होतात " परमशिवाच्या पूर्णत्वाच्या या अभावामुळे अथवा परिमितत्वामुळ त्याला ' अणु ' मानतात.[७६] यात स्थल किंवा जागा व्यापण्याची मर्यादा अभिप्रेत नाही. वल्लभ किंवा इतर दार्शनिक आत्मा ' अणुप्रमाण ' म्हणतात त्या अर्थी ती संज्ञा त्रिकशास्त्रात येत नाही.

## १३ प्रकृती

सांख्यशास्त्राप्रमाणे त्रिक-शास्त्रात प्रकृति–तत्त्व मानले असले तरी या शास्त्रात प्रत्येक पुरुषाला स्वतंत्र प्रकृती असते. अन् मोक्षकल्पनेच्या संदर्भात तेच अधिक सयुक्तिक आहे. या उलट सांख्यशास्त्रात पुरुष अनेक असले तरी प्रकृती मात्र त्या सर्वांना समान एकच आहे. प्रकृती ही शिवाची शांता शक्ती आहे. सद्विद्येतील ' अहमिदमस्मि ' या जाणीवेतील पुरुष ' अहन्ता–वेदकत्व ' (Subjective manifestation) दाखवतो. तो भोक्ता आहे. प्रकृती ही ' इदन्ता-वेद्यत्व ' (objective manifestation) दाखवते ती भोग्य आहे. क्षेमराजमते ती महत्पासून पृथिवी अखेरच्या सर्व तत्त्वांचे मूलकारण आहे. ती सत्त्व, रजस् आणि तमस् गुणांची साम्यावस्था व अविभक्तरूप दाखवते. हे तीन गुण अनुक्रमे सुख. दुःख व मोह उत्पन्न करणारे असून ते शिवाच्या ज्ञान, इच्छा व क्रिया या शक्तींचे स्थूलरूप आहेत.[७७]

## अन्तःकरण (मानसिक क्रियात्मक तत्त्वे)

(१४–१६) बुद्धि, अहंकार, मन

प्रकृती ही सत्त्व, रजस्, तमस् यांची साम्यावस्था आहे[७८] या अवस्थेत बुद्धी, अहंकार व मन ही साम्यावस्थेत असतात. हा समतोल काही कारणाने बदलला की तिच्यापासून अंतःकरण (मानसिक क्रियादर्शक तत्त्वे), इंद्रियें (इंद्रियानुभूतीची तत्त्वे) व महाभूते निर्माण होतात.

अन्तःकरण म्हणजे आतील साधन. अंतर्गत इंद्रिय अथवा व्यक्तीची मानसिक व्यापारयंत्रणा, सुख दुःख इ. जाणिवा आत ग्रहण करण्याचे ते साधन आहे. बुद्धि अहंकार व मन या तत्त्वांमुळे ते कार्य करते. या तिन्हींच्या एकत्रित समुदायाला क्षेमराज ' अंतःकरण ' ही संज्ञा देतो.[७९] यापैकी ' बुद्धी ' हे प्रकृतीपासून निर्माण

---

७६ पूर्णत्वाभावेन परिमितत्वाद् अणुत्वम् ।–प्रत्यभिज्ञावृत्ति ३.२.४

७७. क्षेमराज–पराप्रावेशिका, पृ.९–१०.
तुलनार्थ–षट्त्रिंशत्तत्त्वसंदोह, पृ. ९.

७८. गुणानामविभागावस्था प्रकृतितत्त्वम ।
षट्त्रिंशत्सन्दोह का. १३ वरील राजानकानंद टीका.

७९. एतत् त्रयमन्तःकरणम् । –पराप्रावेशिका, पृ. १०

होणारे पहिले तत्त्व. 'हे अशा स्वरूपाचे आहे' असा निश्चित निर्णय घेणारे ते 'व्यवसायात्मिक' किंवा आद्यनाथाचे शब्दात 'अध्यवसायाचे (mental apprehension of determination) कारण आहे.[८०] 'तत्त्वसमास' मते 'हे अमुक अ हे दुसरे नाही. हा बैल आहे, घोडा नाही. हा खांब आहे, पुरुष नाही' असा निश्चय करणारी ती बुद्धी.

त्रिकशास्त्रमते पुरुष-प्रकृती या अवस्थेत जड असलेल्या प्रकृतीत पुरुष निद्रावस्थेत असल्याप्रमाणे स्वतःस जणू काय विसरतो. पुरुष जागृत झाल्याबरोबर जी सत् ता-मात्र-केवळ अस्तित्वाची-जी जाणीव असते ती बुद्धी ( √ बुध्- (१) जाणणे, (२) जागृत होणे) सत्-त्व याचाही अर्थ सत्ता आहे पुरुषाचा बुद्धी नामक अनुभव म्हणजे सत्त्व, रजस्, तमस् या गुणांची साम्यावस्था नाहीशी होऊन या गुणांपैकी एकाचा अधिक प्रभाव होऊन दुसरे दोन गण कमी प्रभावी ठरणे. बुद्धी सत्-त्व प्रधान असते म्हणून ती प्रशांत आनंद (calm blissful feeling) देते. ती सत्त्वप्रधान असल्यामुळे तिच्या 'स्वच्छतमुळे' विश्वाचे प्रतिबिंब ग्रहण करण्यास योग्य असते म्हणून तिला 'विकल्प प्रतिबिंब धारिणी' म्हटले आहे[८१] हा 'चित्' (?) चा प्रातिभ-पैलू (intuitive aspect of consciousness) आहे. सारांश त्रिकमते बुद्धी ही ज्ञानशक्ती असून सत्-त्व परिणाम असणे व अर्थाचा निश्चय करणे हे तिचे लक्षण आहे.[८२]

जागृतीनंतर-अस्तित्वाच्या सामान्य जाणिवेनंतर-'मी अमुक आहे' अशी विशेष प्रकारची जाणीव होऊन 'हे माझे आहे', 'हे माझे नाही' असे ममत्व अथवा अभिमान जाणवतो तो 'अहंकार' होय.[८३] ही जाणीव म्हणजे ईश्वराच्या इच्छाशक्तीचे किंवा प्रकृतीच्या रजोगुणाचे प्राधान्य असणारी अनुभूती होय. अहंकारात रजोगुणाचा प्रभाव असला तरी सत्त्व व तमस् हे गुण त्याच्याठिकाणी असतातच.

---

८०. **बुद्धिरध्यवसायस्य कारणं निश्चितात्मनः।**

—अनुत्तरप्रकाशपंचाशिका, कारिका २७.

**तत्र बुद्धिरध्यवसायसामान्यमात्ररूपा।**

—अभिनवगुप्त–ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी, खंड २, पृ. २/२

८१. **निश्चय–कारिणा विकल्प–प्रतिबिम्बधारिणी बुद्धिः।**

—क्षेमराज, पराप्रावेशिका, पृ. १०.

८२. **ज्ञानापि सत्त्वरूपा निर्णयबोधस्य कारणं बुद्धिः।**

—षट्त्रिंशत्सन्दोह, का १५. या कारिकेवरील राजानकानंदाचे विवरण:
**सत्त्वपरिणामिनी ज्ञानशक्तिरेव अर्थाध्यवसायलक्षणा बुद्धिः।**

८३. **अहंकारो नाम ममेदं न ममेदमित्यभिमानसाधनम्।** पराप्रावेशिका, पृ. १०.

मन हे तत्त्व अहंकारापासून आविष्कृत होते. इंद्रियांच्या द्वारा बाह्य वस्तूंचे आकलन आणि त्या आकलनांचे संकलन करून ते स्वत:शी कितपत व कसे संबंधित आहे हे निश्चित करण्यासाठी ते अहंकाराकडे पाठवणे हे कार्य मनाच्या द्वारे होते. मनामुळे संकल्प व विकल्प निर्माण होतात [८४] इंद्रियें व अहंकार यामधील दुवे असणारे मन फार जलद कार्य करते. पण त्याचेपर्यंत अहंकार तत्त्वापलीकडे असणाऱ्या बुद्धीचा प्रकाश न पोचल्यामुळे त्याची क्रिया अंधारात चाचपडल्याप्रमाणे तमोमय असते.[८५] म्हणून मनाची क्रियाशक्ती 'तम:परिणामिनी' आहे असे म्हटले आहे. मन ही अहंकाराची निर्मिती (Product) असून बाह्य जगाचे ज्ञान होण्यासाठी ते इंद्रियांशी सहकार्य करते व त्याच्यामुळे संवेदना, संकल्पना, (संकल्प –विकल्प) निर्माण होतात.

**(१७–३१) इंद्रियानुभूतीची** (Sense–experience) **तत्त्वे**

**(१७–२१) ज्ञानेंद्रिये :**

येथे 'इंद्रियें' याचा अर्थ 'इंद्रियातील विशिष्ट ग्रहणशक्ती'. ही इंद्रिये अहंकारापासून परिणत होतात. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे असलेल्या विषयांचे अनुक्रमे ग्रहण करणारी श्रवणेंद्रिये, स्पर्शेंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय व घ्राणेंद्रिय हीं पाच ज्ञानेंद्रिये अथवा बुद्धींद्रिये होत.

**(२२–२६) कर्मेंद्रिये :**

ज्यांच्याकडून बोलणे, चालणे इ. क्रिया होतात त्या विशिष्ट शक्ती म्हणजे कर्मेंद्रिये होत. ही अहंकारापसून निर्माण होतात. कर्मेंद्रिये किंवा कर्म करण्याच्या विशिष्ट शक्ती पुढील प्रमाणे आहेत:

(१) वागिंद्रिय (कार्य-बोलणे), (२) हस्तेंद्रिय, (३) पादेंद्रिय (कार्य— चालणे इ (४) पाय्विन्द्रिय (मलविसर्जन वा विसर्ग). (५) उपस्थेंद्रिय (लैंगिक क्रिया)

**(२७–३१) तन्मात्रें :**

तन्मात्र सथवा 'तत्–मात्र' म्हणजे 'फक्त तेच, तेवढेच', काही कमी—

---

८४. **सङ्कल्पस्य विकल्पस्य बीजं मन उदीर्यते ।**
–आद्यनाथ, 'अनुत्तर-प्रकाश-पञ्चाशिका २७.

८५. **ज्ञानापि सत्त्वरूपा निर्णयबोधस्य कारणं बुद्धिः ।**
**तस्य क्रिया तमोमयमूर्तिर्मन उच्यते विकल्पकरी ।।**
—षट्त्रिंशत्तत्त्वसन्दोह, १५

राजानकानंदाचे विवरण : **तमःपरिणामिनी क्रिया शक्तिः । विकल्पकरण–लक्षणं मनस्तत्त्वमुच्यते ।**

अधिक नसलेले अथवा 'अवांतर-विशेष-रहित.' इंद्रिय-संवेदनाची (Sense-perception) ही मूलभूत तत्त्वे पुढीलप्रमाणे आहेतः

१. शब्द-तन्मात्र, २. स्पर्श-तन्मात्र ३. रूप तन्मात्र ४. रस-तन्मात्र आणि ५. गंध-तन्मात्र, ही अत्यंत सूक्ष्म असतात पण या तन्मात्रापासून स्थूल अथवा जड पंच महाभूतें निर्माण होतात.

## (३२-३४) जड तत्त्वें (Principles of Materiality)

क्षेमराजाने पराप्रवेशिकेत (पृ. १०) दिल्याप्रमाणे तन्मात्र → महाभूत → त्याचे कार्य याचे कोष्टक पुढील प्रमाणे आहे:

| तन्मात्र | महाभूत | कार्य |
|---|---|---|
| १. शब्द | आकाश | अवकाश देणे |
| २. स्पर्श | वायु | संजीवन (व वीजन) |
| ३ रूप | तेज (अग्नि) | दाहक, पाचक |
| ४. रस | आप | आप्यायक, द्रवरूप |
| ५. गंध | पृथ्वी | धारिका (आधार देणे) |

क्षेमराज पराप्रावेशिकेच्या समारोपात म्हणतो :

'ज्या प्रमाणे न्यग्रोधबीजामध्ये अंकुर-पत्र-फल असलेला शक्तिरूप महावृक्ष असतो, त्याप्रमाणे हे चराचर विश्व (त्या शिवाचे) हृदयबीजात असते.[८६] या आन्माय-वचनाप्रमाणे पराभट्टारिकारूपी हृदयबीजात सर्व जग अंतर्भूत आहे, ज्या प्रमाणे घटादि मातीच्या विकारांचे (products) मूळ पारमार्थिक स्वरूप माती असते, त्याप्रमाणे पृथ्वी-तत्त्वापासून मायातत्त्वा अखेर तत्त्वांची मीमांसा करताना 'सत्' हेच तत्त्व आढळते... या सर्वांचे उत्पत्ती, स्थिती व लय विश्वमय व विश्वोत्तीर्ण परम शिव आहे.'

सांख्यांच्यापेक्षा आपण विशेष, स्वतंत्र वा तात्त्विक दृष्ट्या अधिक प्रगत आहोत असे म्हणणारे हे दार्शनिक सांख्यांची सर्व तत्त्वें स्वीकारतात, यातच कपिल महामुनींचे महत्त्व आहे.

## स्वातंत्र्यवाद

स्वातंत्र्यवाद हा 'वाद' नसून परमशिवाचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. स्वातंत्र्य किंवा स्वतंत्रता म्हणजे माया किंवा इतर कोणत्याही बाह्य उपादानावर अवलंबून राहण्याची आवश्यकता न भासता, स्वतःच्या इच्छेप्रमाणे व या इच्छेआड कसलाही

---

८६. यथा न्यग्रोधबीजस्थः शक्तिरूपो महाद्रुमः ।
तथा हृदयबीजस्थं विश्वमेतच्चराचरम् ॥

क्षेमराज उद्धृत-'-परात्रिंशिका,' २४

अडथळा न येता केवळ इच्छामात्रेकरून विश्वाची उत्पत्ती, स्थिती व लय करण्याचे सामर्थ्य[८७] परमशिव चिति(चित्) स्वरूप असून तो वरील इच्छास्वातंत्र्य असणारा महेश्वर आहे देशकालातीत असलेल्या या स्फुरणरूप चितीला वरील अनिर्बंध (absolute) इच्छास्वातंत्र्यामुळे 'महासत्ता' म्हटले आहे. ही सर्वशक्तिमान इच्छाशक्ति (free, absolute sovereign will) हे परमात्म्याचे मुख्य ऐश्वर्य आहे.[८८]

अभिनवगुप्ताने स्वातंत्र्यवाद पुढील शब्दात मांडला आहे:

"भगवान् परमशिव प्रकाश व विमर्श यांना युक्त असा संवित (परम-ज्ञान) स्वरूप आहे. तो स्वातंत्र्यामुळे रुद्रापासून स्थावर पदार्थापर्यंत असलेल्या प्रमातृरूपाने (as a subject) आणि नील, सुख इ. प्रमेय रूपांनी (as objects (जरी हे दोन्ही वरकरणी भिन्न वाटले तरी तसे ते नाहीत) नटला आहे. हे स्वातंत्र्य संवित (universal consciousness) पासून अभिन्न असून ते परमशिवाचा स्वभाव आच्छादू शकत नाही

हे स्वातंत्र्य-यथेच्छ, निर्विघ्न, इच्छाप्रसर (sovereign free will) परमेश्वराचे हृदय (Nucleus) आहे.[८९]

विश्वोत्पत्तीचा हा स्वातंत्र्यवाद शंकराचार्यांचे विश्वोत्पत्ति-विषयक विवर्तवादापेक्षा भिन्न आणि विश्वाचे सत्यत्त्व मानणारा या अर्थी विवर्तवादाचे उलट आहे.

## आभासवाद

'आ' म्हणजे 'ईषत्', किंचित्, 'भास' म्हणजे 'भासन, प्रकाशन.' 'आभास' म्हणजे 'मर्यादित प्रकटीकरण'. अंतिम तत्त्व जो परमशिव त्याचे किंचित् प्रकटीकरण म्हणजे आभास. ज्याप्रमाणे मोराच्या अंड्याच्या बलकात मोराच्या (भावी) सुंदर रंगीबेरंगी पिसाऱ्याचे बीज असते, त्या 'मयूराण्डरसा'

---

८७. स्वातन्त्र्यं नाम यथेच्छं तत्रेच्छाप्रसरस्य अविघातः । ईश्वरप्रत्यभिज्ञा १.५.१३.

८८. स्वातन्त्र्यमेतन्मुख्यं तदैश्वर्यं परमात्मनः ।। ईश्वरप्रत्य. वि. पृ. २०३-४.
सा स्फुरत्ता महासत्ता देशकालाविशेषिणी । उपर्युक्त पृ. २०७-८
सैषा सारतया प्रोक्ता हृदयं परमेष्ठिनः । ईश्वरप्रत्यभिज्ञा १.५ १४

८९ तस्मादपह्नवनीयः प्रकाशविमर्शात्मा संवित्स्वभावः परमशिवो भगवान् स्वातन्त्र्यादेव रुद्रादिस्थावरान्त-प्रमातृरूपतया, नीलसुखादिप्रमेयरूपतया च, अनतिरिक्ततया प अतिरिक्तया इव स्वरूपानाच्छादिकया संविद्रूप-नान्तरीयकस्वातन्त्र्यमहिम्ना प्रकाशते इति अयं स्वातन्त्र्यवादः प्रोन्मीलितः ।
-ईश्वरप्रत्यभिज्ञाविवरण १, पृ. ९

प्रमाणे विविध वैचित्र्याने नटलेले विश्व परमशिवाचे ठिकाणी अप्रकट अवस्थेमध्ये असते त्याचे मर्यादित प्रकटीकरण म्हणजे हे विश्व. त्या अंतिम तत्त्वाचे वा परमशिवाचे प्रकटीभवन म्हणजे आभास होय.

अभिनवगुप्ताने म्हटले आहे :

'प्रकाशरूप, परिपूर्ण, इच्छा-ज्ञान-क्रियादी अनंत शक्तींनी परिपूर्ण असे शांत शुद्ध, उदयास्तविहीन असलेले ते परतत्त्व आहे. ज्याप्रमाणे स्वच्छ आरशामध्ये आरशापेक्षा भिन्न व परस्परभिन्न अशा नगर-ग्रामादिकांचे प्रतिबिंब पडते, त्याप्रमाणे विश्वाचे प्रतिबिंब त्या परतत्त्वामध्ये पडते प्रतिबिंब जसे आरशापेक्षा भिन्न नसले तरी भिन्न आहे असे भासते तसे विश्व हे परमशिवापासून भिन्न नसून विश्वाचा आभास परमशिवापासून भिन्न आहे असे भासते.[१०]

आरशाच्या या दृष्टांतात दोष असा आहे की, आरशातील प्रतिबिंब बाह्य वस्तूंचे आहे पण विश्व हे महेश्वराचे ऐच्छिक स्वरूप (ideation) असल्यामुळे विश्व हा बाह्य वा भिन्न वस्तू नाही आरसा ही जड वस्तू असल्यामुळे त्यात पडणाऱ्या प्रतिबिंबाची आरशाला जाणीव नसते, परंतु परमशिवाला आपल्या विमर्शशक्तीमुळे (self-consciousness मुळे) प्रतिबिंबित झालेल्या विश्वाचे ज्ञान असते शिवाय विश्वाचे प्रतिबिंब स्वत: परमशिवामध्ये (**आत्मभित्तौ**) पडल्यामुळे त्याला आरशासारख्या दुसऱ्या साधनाची आवश्यकता नसते आरसा स्वत: प्रकाशशून्य असल्यामुळे प्रतिबिंब पडण्यासाठी बाह्य प्रकाशाची आवश्यकता असते. पण परमशिव स्वयंप्रकाश असल्यामुळे त्याला बाह्य प्रकाश आवश्यक नसतो

आरशापेक्षा अधिक समर्पक उदाहरण समुद्र व त्याच्या लाटांचे देता येईल. सर्व आभास लाटेप्रमाणे असतात लाट उसळली किंवा खालच्या पातळीवर गेली तरी समुद्राच्या पाण्यात कमी जास्तपणा होत नाही त्याप्रमाणे आभास (विश्वाचे प्रकटीकरण) झाले तरी परमशिवात काही फरक वा कमीजास्तपणा येत नाही. दुसरी गोष्ट सुतार-कुंभारांना वस्तु–निर्मितीसाठी लाकूड, माती यासारखे उपादान

---

१०. भारूपं परिपूर्णं स्वात्मनि विश्रान्तितो महानन्दम् ।
इच्छा–संवित्करणैर्निर्भरितम् अनन्तशक्तिपरिपूर्णम् ।। १० ।।
सर्वविकल्पविहीनं शुद्धं शान्तं लयोदयविहीनम् ।
यत् परतत्त्वं तस्मिन् विभाति षट्त्रिंशदात्मजगत् ।। ११ ।।
दर्पणबिम्बे यद्वन् नगरग्रामादि चित्रमविभागि ।
भाति विभागेनैव च परस्परं दर्पणादपि । १२ ।।
विमलतम–परमभैरव–बोधात् तद्वत् विभागशून्यमपि ।
अन्योन्यं च ततोऽपि च विभक्तमाभाति जगदेतत् ।। १३ ।।
–परमार्थसार, कारिका १०–१३

(material) लागते, पण सृष्टी किंवा विश्वाचे सर्जन म्हणजे परमशिवामध्ये अप्रकटावस्थेत असलेल्या विश्वाचे प्रकटीकरण असते व हे कार्य तो आपल्या स्वतंत्र इच्छाशक्तीने करतो.

त्रिकशास्त्रातील आभासवाद वेदांताच्या परिणामवादापेक्षा भिन्न आहे हे उघड आहे.

**षडध्वा**

पराशक्तीच्या प्रकटीकरणाच्या (विश्वसर्जनाच्या) प्रक्रियेची ही निराळ्या दृष्टिकोणातून व परिभाषेतून केलेली आणखी एक मांडणी.*

मूलतः अमर्याद, सर्जनशील शक्तीचा जो मूळ प्रवाह वा सातत्यक (basic continuum of power) आहे त्याला 'नाद' ही संज्ञा आहे. ही शक्ती एका केंद्रामध्ये घनीभूत होते. त्या गतिशील अथवा सर्जनशील (dynamic) केंद्राला 'बिन्दू' म्हणतात. ही तथाकथित घनीभवनाची प्रक्रिया स्थलकालातीत आहे. त्यामुळे 'बिंदू' सूक्ष्म, स्थूल अथवा प्रदेशव्यापक नसतो. वस्तुतः 'नाद' किंवा 'बिंदू' या संज्ञा शब्दातील वस्तू वा प्रक्रिया यांना शब्दनिबद्ध करण्याचा हा प्रयत्न आहे. बिंदू 'चिद्घन' असतो म्हणजे ज्यामध्ये सर्व विश्व वा वस्तुजात अविविक्त ( undifferentiated ) अवस्थेत सुप्तपणे ( Potentially ) वास करतात किंवा अस्तित्वात असतात असे 'संपुंजित चैतन्य (massive consciousness) असतो. बिंदु हा लेखनात ( ° ) अनुस्वार चिन्हाने व्यक्त करतात. त्रिकमते अ = शिव, ह = शक्त असे 'अ – ह' मध्ये सर्व विश्व सामावते. त्यावर अनुस्वार आला की अ – हं संपूर्ण होते व या वरती (डोक्यावर) आलेल्या अनुस्वाराने शिव [ अ ] हा शक्ती [ ह ] मार्फत शेवटच्या ३६ व्या – पृथ्वीतत्त्वापर्यंत जरी प्रकट झाला तरी शिवाच्या अखंडपणामध्ये भेद वा खंड पडत नाही, असे व्यक्त होते. शिवाचे हे अविभाज्यत्व बिंदुचिन्हाने ( अविभाग–वेदनात्मक–बिन्दुरूपतया ) व्यक्त करतात. या प्रकटीकरणाच्या सर्वोच्च अवस्थेत 'वाच्य' व 'वाचक' भिन्न नसतात. ही 'परा–वाक्' अवस्था आहे.

या संज्ञांचे स्पष्टीकरण झाल्यावर विश्वसर्जनाचे सहा मार्ग वा पायऱ्या (creative descent) पाहू. वर्ण, कला, मंत्र, तत्त्व, पद व भुवन या 'अध्वा' किंवा पायऱ्या होत. 'सर्जन' हे नाम √सृज् 'आत असलेले बाहेर प्रकट करणे (to emit, to release, to put out आपटेकोश पृ ६१२) किंवा 'आविष्कार करणे' या धातूपासून झाले आहे. विश्व सर्जनाचे प्रक्रियेत प्रथमतः वर्ण आणि कला यांचे ध्रुवीकरण (Polarigation) होते, यापैकी कला हा सत्तत्त्वाचा (Reality)

---

* प्रस्तुत विषय तांत्रिक वा गूढ असला तरी ग्रंथांधारे येथे संक्षिप्तपणे मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

एक पैलू आहे. ती विश्व विकासाच्या शक्तीच्या रूपाने प्रकट होते. परमशिव हा त्याच्या विश्वातीत स्वरूपात (Transcendental aspect) सर्जनशीलतेच्या किंवा कलेच्या कक्षेच्या पलीकडे-अतीत (Transcendent) असल्यामुळे तो 'निष्कल' असतो. पण त्याच्या विश्वमय (immanent) स्वरूपाचा सर्जनक्रियेशी संबंध येत असल्यामुळे त्याला 'सकल' (कलेसहित असणारा) असे म्हणतात.

नाद व बिंदू यानंतर कला येते. ती एक सर्जनाची अवस्था (stage) किंवा पैलू (aspect) आहे.

'वर्ण' म्हणजे 'अक्षर' किंवा 'रंग' नसून बिंदूपासून प्रक्षिप्त (Project) झालेल्या वस्तूचे (? object) कार्यरूप [९१] (Function-form).

'परा-वाक्' अवस्थेतील वाचक व वाच्य यांचे ऐकात्म्य नाहीसे होऊन वस्तुभिन्नतेला या अवस्थेत प्रारंभ होतो. या भिन्नत्वप्रक्रियेचा पहिला 'अध्वा' म्हणजे वर्ण व कला यांचे ध्रुवीकरण (Polarisation).

दुसरे 'अध्वा' ध्रुवीकरण म्हणजे 'मंत्र' व 'तत्त्व' यांचे सूक्ष्म पातळी-वरील ध्रुवीकरण. 'मंत्र' याचा अर्थ 'तत्त्वाचे 'सुयोग्य कार्यरूप' (appropriate function-form) किंवा 'आधारभूत चिन्हबंध' (basic formula) आणि 'तत्त्व' म्हणजे सूक्ष्म रचनात्मक रूपांचे अंगभूत किंवा स्वाभाविक मूलस्रोत (The inherent principle or the source and origin of subtle structural forms)

मंत्र आणि तत्त्व यांचे ध्रुवीकरण हा एक अध्वा मानतात.

तिसरे ध्रुवीकरण 'पद' व 'भुवन' यांचे. 'भुवन' म्हणजे आपल्यास भासमान होणारे विश्व. 'पद' म्हणजे आपल्या मानसिक (व वाचिक) प्रति-क्रियेमुळे त्या विश्वाचे प्रत्यक्ष सूत्रण (actual formulation)

पुढील वर्गीकरणावरून या षडध्वांचे परस्परसंबंध स्पष्ट होतील

| वाचक किंवा शब्द | वाच्य किंवा अर्थ |
|---|---|
| १. वर्ण | १. कला |
| २. मन्त्र | २. तत्त्व |
| ३. पद | ३. भुवन |

वरील वर्गीकरणातील वाचकांचे त्रिक (वर्ण, मंत्र व पद) यांना 'कालाध्वा' म्हणतात व वाच्यांच्या त्रिकाला (कला, तत्त्व व भुवन) यांना 'देशाध्वा' म्हणतात.

वरील अध्वापैकी वर्णाध्वाचे स्वरूप प्रमेचे असते व ते प्रमेय, प्रमाण व

९१. 'The characteristic measure – index of the function form associated with the object'

–जयदेवसिंग, प्रत्यभिज्ञाहृदय, प्रस्तावना, पृ. २१.

प्रमाता यांचे आधारस्थान आहे. याशिवय वर्णांचे १) मायिय व २) मायियेतर असे वर्गीकरण केले असून मायियेतर वर्ण शुद्ध, मर्यादारहित व असंख्य आहेत. या मायियेतर वर्णांपासून मायिय वर्ण निर्माण होतात. अग्नीमध्ये जशी अंगभूत दाहक-शक्ती असते तशी मायियेतर वर्णांची वाचकशक्ती मायिय वर्णांत अंगभूत असते.

हा सर्वच विषय गूढस्वरूपाचा आहे. फक्त ग्रथांतरीचे वर्णन संक्षेपाने येथे दिले आहे.

## कला

कला पाच मानल्या आहेत :– ( १ ) निवृत्ति (कला), २. प्रतिष्ठा (कला ३. विद्या (कला), ४ शान्ता अथवा शान्ति (कला) ५. शांत्यतीत कला.

(१) **निवृत्ति कला**–ही मुख्यत: पृथ्वीतत्त्वमय असून अभिनवगुप्तमते हिच्यात १६ भुवने (Planes of existence) आहेत निवृत्तिकलेच्या सर्वांत खालच्या पातळीला ' कालाग्निरुद्रभवन ' म्हणतात.

(२) **प्रतिष्ठा-कला**–ही निवृत्तिकलेनंतर येते. म्हणजे निवृत्तिकला हे जर मध्यवर्ती वर्तुळ मानले तर त्याच्या बाहेरचे–त्याला सगळीकडून वेढणारे (encircling)–प्रतिष्ठा कलेचे वर्तुळ येईल अशा अनुक्रमानेच पुढील कला एकापेक्षा एक मोठे वर्तुळ किंवा आवरण असल्यासारख्या आहेत. प्रतिष्ठाकलेत जलतत्त्वापासून प्रकृतितत्त्वापर्यंतची २३ तत्त्वें येतात. या कलेत ५६ भुवने आहेत असे अभिनव-गुप्त सांगतो.

(३) **विद्याकला**–ही प्रतिष्ठाकलेच्या वर असून हिच्यात पुरुषतत्त्वापासून मायातत्त्वापर्यंतची ७ तत्त्वे येतात. यात २८ भुवने आहेत असे अभिनवगुप्ताचे मत आहे.

(४) **शांता-कला**–ही चौथी कला विद्याकलेच्यावर असून शुद्धविद्या, ईश्वर व सदाशिव ही तत्त्वें व १८ भुवने हिच्यामध्ये आहेत (अभिनवगुप्त)

(५) **शांतातीता कला**–ही पाचवी शांताकलेच्या वरची कला असून हिच्या ठिकाणी शिव व शक्ति अशी दोनच तत्त्वें आहेत. हिच्यात एकही भुवन नाही. परमशिव हा सर्व कलांचे अतीत (Transcendental) आहे.

षडध्वा हा विभाग जरा गूढ (esoteric) व सांप्रदायिक आहे.

## जीव

त्रिकशास्त्रात जीव किंवा आत्मा म्हणजे शरीर व अंत:करण यांचा संघात नसून त्यापेक्षाही एक उच्च तत्त्व त्यात अनुस्यूत आहे. जीवाचे स्थूल शरीर पंच-भूतात्मक आहे. त्याचे अंत:करण (अंतर्गत इंद्रिय) बुद्धी, अहंकार व मन यांचे मिळून बनलेले आहे. हे आंतरिक यंत्रणेचे (Psychic apparatus) तीन घटक व पंचमहाभूतांची सूक्ष्मरूपें –पाच तन्मात्रें– या आठांनी मिळून सूक्ष्मशरीर वा ' पुर्यष्टक ' बनलेले असते. मृत्युसमयी स्थूलशरीर सोडून या सूक्ष्मशरीरासह आत्मा जातो.

या शिवाय जीवमान असे पर्यंत जीवाचे ठिकाण प्राणशक्ती असते. वैश्विक प्राणशक्तीमुळे जसे विश्व चालते, तसे या शरीरांतर्गत प्राणशक्तीमुळे शरीर चालते. या शिवाय शक्तिस्वरूपिणी कुण्डलिनीचा वास मानवी शरीरात असला तरी सामान्य माणसात ती निद्रिस्त असते. पण सर्वात महत्त्वाचे म्हणजे चैतन्यस्वरूप आत्मतत्त्व प्रत्यकाचे ठिकाणी असते. हे आत्मतत्त्व म्हणजे शिवतत्त्व असून ते आणवमलामुळे मर्यादित झाल्यामुळे ते 'अणु'स्वरूप भासते. हे अणुतत्त्व इतर दर्शनांप्रमाणे 'प्रदेशव्याप्ती' दाखवत नसून फक्त शक्ति-मर्यादा अथवा मर्यादित शक्तिमत्व दाखवते.

## पाश किंवा बंध

आत्म्याचे ठिकाणी परमशिवाप्रमाणे असणाऱ्या शक्तींना मर्यादा पडून आत्म्याला 'अणुत्व' येण्याचे कारण अज्ञान. सर्वच दर्शनातून अज्ञानाला 'बंध' मानले आहे शैव दर्शनातही त्याला 'बंध' किंवा 'पाश' मानले आहे. पाशांनी बद्ध तो 'पशु' आणि सर्वांच्या अतीत असणारा परमशिव तो 'पति'. अशा 'पशु', 'पाश' व 'पति' या संकल्पनात्रयावरून काश्मीरी ईश्वराद्वय दर्शनाला 'त्रिक' शास्त्र म्हटले आहे

## पाश अथवा मल

जीवाला पाशबद्ध करणारे जे अज्ञान त्याला त्रिकशास्त्रात 'मल' अशी संज्ञा आहे [९२] जीवाचे अज्ञान म्हणजे जडपदार्थाप्रमाणे संपूर्ण ज्ञानाभाव नसून अपूर्ण ज्ञान आहे.[९३] या मलाचा एक प्रकार जन्मजात, अनादि पण सांत असणारा 'आणव मल' आहे हा मल परमशिवाच्या इच्छाशक्तीने निर्माण झाला असून त्यामुळे जिवाला आपल्या अपूर्णत्वाची जाणीव होते. परमशिवावस्थेतील पूर्णत्वाच्या अभावामुळे अथवा मर्यादेमुळे (परिमितत्वात्) जिवाला 'अणू' म्हणतात.[९४] वर सांगितल्याप्रमाणे वल्लभादी इतर दार्शनिकाप्रमाणे या संज्ञेत स्थलमर्यादा अभिप्रेत नाही.

वर उल्लेखलेला अनादी पण सांत 'आणव' मल व बंध निर्माण करणारी सांख्यांची रागकल्पना हे दोन्ही भिन्न आहेत. सांख्यमते राग हा बुद्धीचा गुण आहे व त्यामुळे जिवाला वस्तूविषयी आसक्ति निर्माण होते. कर्मांपासून निर्माण होणारा 'कार्मिक मल' व मायेपासून निर्माण होणारा 'मायिय मल' या दोहोंचे निमित्त-कारण ( Instrumental cause ) 'आणव मल' आहे.

सामान्य जीवाचे ठिकाणी हे तिन्ही मल असतात म्हणून जीवाला 'सकल' ही

---

९२. अज्ञानं किल बन्धहेतुरुदितः शास्त्रे मलं तत्स्मृतम् । –तंत्रसार, पृ. ५.

९३. अज्ञानमिति न ज्ञानाभावः... स हि लोष्ठादिकेऽप्यस्ति–तंत्रालोक १२५, पृ. २८.

९४. प्रत्यभिज्ञावृत्ति ३.२.४.

संज्ञा आहे. प्रलयानंतर शरीरांना अस्तित्व नसल्यामुळे फक्त 'आणव' व 'कार्म' अथवा 'कार्मिक' (कर्मांपासून निर्माण झालेला) असे दोन मल जिवाचे ठिकाणी राहतात. अशा अवस्थेतील जिवांना प्रलयाकल म्हणतात. हे 'अशुद्ध अध्वा' (सृष्टी)तील जीव होत.

## पाश अथवा बंध

अशुद्ध अध्वा व शुद्ध अध्वा यांच्या मध्यंतरीच्या अवस्थेतील जीवांना 'विज्ञानाकल' म्हणतात. (**मायोर्ध्वं शुद्धविद्याधः सन्ति विज्ञानकेवलाः**) त्यांच्या ठिकाणी फक्त 'आणवमल' असतो. शुद्धविद्या ते शिव या अवस्थांतील जीवांचा 'आणवमल' कमी होत जाऊन शिवाचे ठिकाणी संपूर्ण नाहीसा (ध्वस्त) झालेला असतो.[९५] या अवस्थांतील 'शुद्ध अध्वा' मधील (शुद्धसृष्टीतील) जीवांना चढत्या क्रमाने मंत्र, मंत्रेश, मंत्रमहेश, शक्तिज व शांभव अशा संज्ञा आहेत.

## २ कार्ममल

आणव मलामुळे जीवाच्या ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती मर्यादित होतात. त्यामुळे आपोआपच इच्छा-शक्ती मर्यादित होते. विश्वोत्पत्तिपूर्वी ही इच्छाशक्ती विषयशून्य (objectless) असली तरी आपली मर्यादित क्रियाशक्ती वापरण्याची उत्सुकता वा आतुरता सर्व जीवांना असते. त्यामुळे विश्वनिर्मितीनंतर इच्छापूर्तीसाठी जीवाला योग्य ते शरीर मिळते व संसार–**पुनरपि जननम्**– सुरू होतो. हे सर्व कर्मांचे मूळ आहे. ही कर्म करण्याची पण मर्यादित असलेली इच्छा तिला 'कार्म-मल' म्हटले आहे. कारण तिच्या मर्यादित सामर्थ्यामुळे मर्यादित सामर्थ्याची कर्मं होतात, व ती शक्ति परमेश्वराचे इच्छेवर अवलंबून असते.[९६]

## कार्म-मल

निराळ्या शब्दांत सांगायचे म्हणजे देवच बंधने निर्माण करतो व त्यातून सोडवतो.[९७] परंतु यात त्रिकमते ईश्वराचे वैषम्य किंवा नैर्घृण्य नाही. कारण ज्यांच्या बाबतीत वैषम्य वा नैर्घृण्य घडते ते त्याचेच अंश आहेत. त्याच्याव्यतिरिक्त स्वतंत्र वा भिन्न नाहीत व असे वैविध्य व वैचित्र्य असणे हा देवाचा स्वभाव आहे.[९८]

---

९५. तंत्रालोक ६.७७–८०

९६. **ईश्वरेच्छावशादस्य भोगेच्छा संप्रजायते ।**
**भोगसाधनसंसिद्धयै भोगेच्छोरस्य मन्त्रराट् ।**
**जगदुत्पादयामास मायामाविश्य शक्तिभिः ॥** —तंत्रालोकटीका ६.५६

९७. **स्वयं बध्नाति देवेशः स्वयमेव विमुच्चति ।** –तंत्रालोक ८.८२

९८ **देव एव तथासौ चेत् स्वरूपं चास्य तादृशम् ।**
**तादृक् प्रथा स्वभावस्य स्वभावे कानुयोज्यता ॥** तंत्रालोक ८.७२

कार्म-मल हा कार्म-संस्कारापेक्षा भिन्न आहे. काया-वाचा-मनाने केलेल्या कर्मांचे जीवावर होणारे परिणाम म्हणजे कर्मसंस्कार. पण कार्ममल ही विषयशून्य (objectless) असलेली मर्यादित इच्छाशक्ती असून तिचे अस्तित्व आणव-मलावर (Innate ignorance) अवलंबून आहे.

### ३. मायिय मल

मायेच्यामुळे जीवाचे मूळ ज्ञान-सामर्थ्य मर्यादित होते त्याला 'मायिय मल' म्हणतात. त्याला 'भिन्न–वेद्य–प्रथा' म्हणजे त्याच्यामुळे माया आणि तिची कंचुकें यांनी आत्म्याचे मूळ स्वरूप झाकले जाऊन जिवाला स्वत: आणि इतर वस्तु यांच्यातील भिन्नता दिसते. आपण स्वत: निराळे व इतर जीव निराळे, इतर वस्तु निराळ्या अशी भेद पाहण्याची वृत्ती म्हणजे 'शरीरभुवनाकाराची'[९९] प्रतीति. यामुळे सुखदु:ख व पुनर्जन्म प्राप्त होतात.

### मोक्ष

त्रिकशास्त्रमते 'बंधाला वस्तुस्थितीत अस्तित्वच नसते तेव्हां (अस्तित्वात नसलेल्या) बंधापासून मुक्तता कसली ?' (**वस्तुस्थित्यां न बन्धो ऽस्ति तदभावान्न मुक्तता।**). सोमानंद म्हणतो: 'सर्वच शिवात्मक आहे,'[१००] 'ज्या अर्थी सर्व पदार्थ शिवरूप आहेत,'[१०१] 'त्या अर्थी सर्व आकारांचे (पदार्थाचे) ठिकाणी शिवस्वरूप आहे असे जाणावे.'[१०२] 'सर्वत्र शिवरूप असल्यामुळे बंध व मोक्ष यांत फरक नाही. मोहामुळे, अज्ञानामुळे– संसारी जीवाला 'बंध,' 'मोक्ष' वाटतात पण आत्म्याच्या ठिकाणी बंधही नाही, मोक्षही नाही.'[१०३] उत्पलाचार्य म्हणतात: 'शिवाशी (जिवाचा) अभेद आहे ही प्रतीति म्हणजे मोक्ष व तशी प्रचीती नसणे म्हणजे बंध.'[१०४] अभिनवगुप्ताने म्हटले आहे : "मोक्ष म्हणजे दुसरे तिसरे काही

---

९९. **शरीरभुवनाकारो मायीयः परिकीर्तितः।** –तंत्रालोक १.५६

१००. **सर्वं शिवात्मकम्।** –शिवदृष्टि ३.२०. ३.६१

१०१. **यथा सर्वपदार्थानां भगवच्छिवरूपता।** शिवदृष्टि २.८८

१०२. **तस्मात्समग्राकारेषु सर्वासु प्रतिपत्तिषु।**
**विज्ञेयं शिवरूपत्वं स्वशक्त्यावेशनात्मकम्॥** शिवदृष्टि ३.१७

१०३. **बन्धमोक्षौ न भिद्येते सर्वत्रैव शिवत्वतः।**
**सैवेषा सा च संसारो बन्धमोक्षावतः स्थितौ॥**
**प्रतीतिमात्रमेवात्र तावता बंधमोक्षता।**
**तदात्मत्वे नास्ति बन्धस्तदभावान्न मोक्षता॥** शिवदृष्टि ३.६८–६९; ७०-७२

१०४. **शिवाभेदप्रतीतिमात्रं मोक्षः, तदप्रतीतिस्तुबन्धः।**
शिवदृष्टि ३.७० वरील टीका.

नसून आत्म्याला स्वरूपाचा, आपणच परासंवित् असल्याचा साक्षात्कार ( realization ). असा साक्षात्कार झाल्यावर 'सुख-दु.ख,' 'बंध-मोक्ष,' 'चिति–(चित्, चैतन्य)– जड' हे 'घट-कुम्भ' याप्रमाणे एकार्थी शब्द आहेत.[१०५] उत्पलाचार्य 'ईश्वर प्रत्यभिज्ञेत म्हणतात:[१०६] 'मोक्ष म्हणजे स्वत:च्या नैसर्गिक मूळ स्वरूपाची फेरओळख किंवा पुन:-प्रत्यय'–'अकृत्रिम-अहं विमर्श'

ही शुद्ध मीत्वाची जाणीव (The Pure I Cnsciousness) विकल्पस्वरूप नसते कारण विकल्याला (स्वत:च्या आस्तित्वासाठी) दुसऱ्याची जरूर भासते. विकल्प हा सांबंधिक (relational) असतो. सामान्य मीत्वाची जाणीव माझ्या-व्यतिरिक्त दुसऱ्यावर अवलंबून (relational) असते पण शुद्ध मीत्वाची जाणीव स्वावलंबी (अनन्यमुखप्रेक्षित्व – स्वातंत्र्य-विश्वान्तिरूप) असल्यामुळे ती (=तो अहंप्रत्यय) 'अकृत्रिम' असा 'अहं–विमर्श' असतो. अशा स्वरूपाच्या जाणिवेला अभिनवगुप्ताने मोक्ष म्हटले आहे.[१०७]

या शुद्ध मीत्वाच्या जाणिवेने चित्ताचे 'चित्' होते. व सर्व विश्व शिवरूप अथवा आत्मरूप असल्याची अनुभूति येते. प्रत्यभिज्ञाहृदयात (सूत्र १३ वे) म्हटले आहे की त्याचे (आत्म्याच्या पंचकृत्यांचे)[१०८] ज्ञान झाले असता चित्त (The limited individual consciousness) अंतर्मुख होऊन चेतन पदावर (The consciouness of the self) आरूढ होऊन 'चिति' (universal conscious-

---

१०५. **मोक्षो हि नाम नैवान्य: स्वरूपप्रथनं हि तत् ।**
**स्वरूपं चात्मन: संवित् नान्यत्**...तंत्रालोक १.१५६
**अस्यां भूमौ सुखं दु:खं बन्धो मोक्षश्चितिर्जड: ।**
**'घटकुम्भ'वदेकार्था: शब्दा:**...तंत्रालोक २.१९

१०६. अहं प्रत्यवमर्शो य: प्रकाशात्मापि वाग्वपु: ।
नासौ विकल्प:, सद्युक्तो द्वयापेक्षी विनिश्चय: ।।–ईश्वरप्रत्यभिज्ञा १.६.१

१०७. अभिनवगुप्ताने उत्पलाचार्यांच्या (वरील टीप ७ मधील) कारिकेवर टीका करताना म्हटले आहे:
**अनन्य-मुखप्रेक्षित्व-स्वातन्त्र्यविश्रान्तिरूप: 'अहमिति' प्रत्य-मर्श: असौ विकल्पो न भवति ।** —ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी १.२३९
मोक्षाबद्दल तो म्हणतो.
**मोक्षो हि नाम नैवान्य: स्वरूपप्रथन हि तत्** ।–तंत्रालोक. १.१५६, पृ. १९२

१०८. आत्म्याची पंचकृत्ये: आभासन, रक्ति (आसक्ति), विमर्शन (आत्मानुभूति), बीजावस्थापन आणि विलापन (dissolution) यांचा तपशील मूलग्रंथात पहावा.

ness) होते. आणि सर्व विश्व आत्मस्वरूप वा शिवस्वरूप असल्याची जाणीव झाली की (काश्मीरी शैवमते) सर्व श्रेष्ठ असा 'जगदानंद' प्राप्त होतो. काश्मीरी शैवमत जीवन्मुक्ति मानते. तंत्रालोकावर टीका लिहिताना जयरथाने विज्ञानवादी व शून्यवादी बौद्ध व सांख्य आणि योग यांच्या मोक्षकल्पनांपेक्षा आपल्या मोक्ष-संकल्पनेचे महत्त्व वर्णन केले आहे.

## अनुग्रह किंवा शक्तिपात

वर वर्णन केलेले मोक्षज्ञान बुद्धिवादाने किंवा तर्काने प्राप्त होत नाही. त्यासाठी मुख्यत: 'अनुग्रह' अथवा 'शक्तिपाता'ची आवश्यकता असते. ईश्वरी अनुग्रहाशिवाय साक्षात्कार शक्य नाही ही कल्पना उपनिषत्कालाइतकी जुनी आहे. कंठोपनिषदात (२.२३) तसेच मुण्डकोपनिषदात (३, २, ३) म्हटले आहे:

**नायमात्मा प्रवचनेन लभ्यो, न मेधया, न बहुना श्रुतेन।**
**यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्॥**

काश्मीरी शैवमतात ही संकल्पना रूढ असून ईश्वरी कृपेनेच जीवाला अध्यात्मज्ञान होते. ती केवळ ईश्वरी इच्छेवर अवलंबून असून त्यात मानवी कर्तृत्वाला वाव नाही[१०९] आणि शक्तिपातामुळेच आपली आपल्याला फेर-ओळख (प्रत्यभिज्ञा) होते[११०] असे मानतात.

## शक्तिपात

शक्तिपात होण्यासाठी दीक्षेची आवश्यकता असतेच असे नाही. त्रिकमतात दीक्षा म्हणजे गुरूकडून मंत्र घेणे असा मर्यादित अर्थ नसून, ज्या कृत्यामुळे आध्यात्मिक ज्ञान दिले जाते व पशुत्वाचे बंधन असणारे जन्मजात अज्ञान (innate ignorance) नाहीसे होते त्याला दीक्षा म्हणतात.[१११] पण प्रत्यभिज्ञेसाठी किंवा मोक्षासाठी दीक्षेची आवश्यकता नाही.

शक्तिपाताचे प्रकार तीन. तीव्र, मध्यम व मंद-पूर्वजन्मांच्या संस्कारांमुळे आधीच ज्यांची बरीच अध्यात्मिक प्रगती झालेली असते त्यांना 'तीव्र' शक्तिपात होऊन फारशी साधना न करता मुक्त होता येते. ज्यांनी इतकी प्रगती केली नसेल

---

१०९. इत्थं श्रीशक्तिपातोऽयं निरपेक्ष इहोदित: ।–तंत्रालोक ८.१७३

११०. स्वातन्त्र्यमहिमैवायं देवस्य यदसौ पुन: ।
स्व रूपं परिशुद्धं सत् स्पृशत्यप्यणुतामय: ॥ –तंत्रालोक ८.१६३

१११. दीयते ज्ञानसद्भाव: क्षीयते पशुबन्धना ।
दानक्षपणसंयुक्ता दीक्षा तेनेह कीर्तिता ॥ –तंत्रालोक १, पृ. ८०
दीक्षया मुच्यते जन्तु: प्राप्तिभेन तथा प्रिये ।
गुर्वा त्ता तु सा दीक्षा बद्ध–बन्धन–मोक्षणे ।
प्रातिभोऽस्य स्वभावस्तु केवलीभावसिद्धिद: ॥ –तंत्रालोक ८.१०७

त्यांच्यावर मध्यम शक्तिपात होतो. ही माणसे गुरूकडे जाऊन, दीक्षा घेऊन योगाभ्यास करतात व कालांतराने मोक्षास जातात. ज्यांची फारशी आध्यात्मिक प्रगती नाही त्यांच्यावर मंद शक्तिपात होतो व त्यांच्या ठिकाणी आध्यात्मिक ज्ञान व ध्यान धारणा करण्याची खरीखुरी आवड निर्माण होते व ही माणसे कालांतराने मुक्ती मिळवितात.

## उपाय[११२]

ईश्वरी अनुग्रह आध्यात्मिक प्रयत्नाखेरीज होत नाही. तो होण्यासाठी जे प्रयत्न करावे लागतात त्याला 'उपाय' म्हणतात. अभिनवगुप्त म्हणतो, 'निजानंदात निमग्न असलेला, प्रकाशरूप, इच्छाज्ञान–क्रियाशक्तींनी युक्त जो शिव त्याने स्वतःच्या इच्छास्वातंत्र्याने (स्वच्छंदाने) स्वतःला संकुचित भासवले की त्याला 'अणु' म्हणतात. तो पुनः अनुपाय (आनंदोपाय), किंवा इच्छा (शांभव), ज्ञान (शाक्त) व क्रिया (आणव) या उपायांनी शिवस्वरूप होतो. त्या उपायांचे अथवा शिवत्व-प्राप्तीच्या मार्गांचे स्वरूप पुढील प्रमाणे आहे:

### (१) अनुपाय (आनंदोपाय)

'अनुपाय' यातील 'अन्' चा अर्थ 'ईषत्, किंचित्' (उदा. अनुदरा कन्या). अनुपायामध्ये मंत्र, पूजा, ध्यानचर्या, 'हे करावे, ते करू नये' असे विधि–निषेध वा निर्बंध (नियंत्रणा) नाही. गुरुवचन ऐकून (व कधीकधी गुरूशिवाय स्वतंत्रपणे) झालेल्या तीव्रतम शक्तिपातामुळे 'ते स्वतंत्र, आनंदघन तत्त्व मीच आहे व हे सर्व विश्व माझ्या ठिकाणी प्रतिबिंबित आहे' असा दृढ विवेक मनुष्य करतो आणि त्यामुळे तो परमेश्वराने झपाटल्यासारखे होऊन त्याचे व्यक्तित्त्व (individual consciousness) परमेश्वरात तत्काळ विलीन होते.

'स्वयं प्रकाशं शिवमाविशेत् क्षणात्' या प्रक्रियेला 'समावेश' म्हणतात. अभिनवगुप्ताने या प्रक्रियेचे वर्णन एका अपभ्रंश[११३] दोह्याचे अवतरण देऊन केले आहे, तो असा.

**जहि जहि फुरण फुरइ सो सअलउ**
**परमेसरु भासइ मइ अमलउ ।**
**अत्ता नत सो श्चित्र (च्चिअ ?) परमत्थिण**
**इअ जानअ कुज्ज परमत्थि ण ।।** —तंत्रसार पृ. ९

---

११२. आधार : (१) मुख्यतः अभिनवगुप्तविरचित **तंत्रसार**–आह्निके
१, २, ३, ४ व ५
(२) क्षेमराजकृत प्रत्यभिज्ञाहृदय.

११३. काश्मीरी अपभ्रंश हेमचंद्राने प्राकृत व्याकरणात वर्णन केलेल्या अपभ्रंशाहून भिन्न आहे.

"जेथे जेथे स्फुरण स्फुरते (ते सर्व विश्व) तो मलरहित सकळ परमेश्वर (असून ते) माझ्या ठिकाणी (आहे) असे भासते. तोच आत्मा आहे हे परमार्थाने जाणून (जाणल्यावर याहून अधिक) काहीही कार्य नसते.'

## (२) शाम्भवोपाय

अनुपाय हा फार प्रगत साधकांसाठी आहे. पण आध्यात्मिक दृष्टया जे कमी प्रगत आहेत त्यांच्यासाठी 'शांभवोपाय' सांगितला आहे. याच्या योगाने 'अकृत्रिम अहम्' ची (शुद्ध मीत्वाची Pure I–consciousness) जाणीव होते. हा 'मध्य' (= उद्दिष्ट) साधण्यासाठी 'विकल्पक्षय' होण्याची आवश्यकता आहे. 'विकल्प' म्हणजे 'हे' व 'ते' या मधील भेद कल्पणे (**विशेषेण विविधेन कल्पनम्**।). विकल्प हा चित्ताचा (व्यक्तिगत मनाचा) स्वभाव आहे. योगराजाने अभिनवगुप्ताच्या 'परमार्थसार' कारिकावर टीका करताना घटाच्या व घटा-भावाच्या अनुभूतींत फरक करून घटत्वाची निश्चिती करणे असा 'अन्यापोह-लक्षणद्वय' म्हणजे विकल्प म्हटले आहे, शिवाचे ठिकाणी सर्व विश्व असल्यामुळे त्याच्या ठिकाणी विकल्पाला स्थान नाही. विकल्पाला क्षय झाला म्हणजे अविकल्प-अवस्थेत 'हे' व 'ते' असा भेद राहत नसून नुसते चित् (consciousness) असते. ही 'तुर्यातीत' अवस्था आहे.

विकल्पक्षयासाठी प्रथमतः शिवाची 'सृष्टी', 'स्थिती', 'संहार', 'विलय' व 'अनुग्रह' ही जी 'पंचकृत्ये' आहेत त्यांचे चिंतन करावे. परमात्म्याची ही पंचकृत्ये आत्म्यामध्ये (individual soul) सतत चालू असतात. उदा. एक विशिष्ट काळ व स्थल यांचे मानसिक आकलन (perception) ही त्या व्यक्तीची 'सुषुप्ती' होय. आपण आकलन केलेल्याचे रक्षण वा उपयोग ही व्यक्तिविषयक 'स्थिती' आहे.

उपभोगाचे आनंदात (delight of I–consciousness) हे आकलन विरून जाते तो व्यक्तिपातळीवरील 'संहार' होय. पण असा 'संहार' झाला तरी ते आकलन संस्काररूपाने पुनः प्रत्ययास (consciousness वर येण्याचा) प्रयत्न करते तो वैयक्तिक पातळीवरील 'विलय' होय. पण हे मानसिक आकलन 'हठपाकाने' (Persistent progress of assimilating experience to the consciousness of the experiment.) चित् किंवा आत्मतत्वामध्ये संपूर्ण विलीन होते तो व्यक्ति-पातळीवरील 'अनुग्रह' आहे.[११४]

ज्यावेळी हे सर्व विश्व माझे (आत्म्याचे) वैभव (प्रकटित रूप) आहे आणि हे सर्व विश्व म्हणजे मी (आत्मा) आहे असे सम्यक् ज्ञान होते त्यावेळी असे

---

११४. प्रत्यभिज्ञाहृदय सूत्र ११

जाणणाऱ्याला विकल्प असले तरी महेशता–परमशिव स्वरूप–प्राप्त होते.[११५]

असा क्रमाक्रमाने विकल्प नाहीसा झाला म्हणजे 'भैरवी मुद्रा' नामक मानस-शारीरिक ( psycho-physical ) अवस्थेत साधक प्रवेश करतो. त्या अवस्थेत त्याचे लक्ष आत (अंतरात्म्याकडे) असते पण बाह्यदृष्टी स्थिर (**निमिषोन्मेषरहित**) असते. (**अन्तर्लक्ष्यो बहिर्दृष्टिर्निमिषोन्मेषवर्जितः । इयं सा भैरवी मुद्रा...**)

## (३) शाक्तोपाय (ज्ञानोपाय)

या उपायाला ज्ञानोपाय म्हणण्याचे कारण या मार्गात ध्यानाच्या मानसिक क्रियेवर भर आहे. यात मंत्रशक्तीमुळे प्रातिभ ज्ञान होते. या उपायात साधक 'आत्मा हेच सर्व विश्व आहे' (**आत्मैवेदं सर्वम्**) किंवा 'मी शिव आहे' (**शिवोऽहम्**) असे प्रदीर्घ चिंतन करून निर्विकल्प आत्मज्ञानावस्थेपर्यंत पोचतो. या उपायाचा 'मध्य' परासंविद्‌ची प्राप्ती आहे.

आणावोपायात प्राण आणि मन या दोहोंचा उपयोग करावयाचा असतो, पण येथें केवळ मानसिक शक्ती वापरावयाची आहे. 'शिव–मी,' 'आत्मा–इदम्' या भेदाभेदावर हा उपाय आधारित असल्याने 'भेदाभेदोपाय' ही संज्ञा त्याला देतात. या उपायामध्ये प्राणायामादी यातायात न करता मूलाधारचक्रातील कुण्डलिनी जागृत होते व आत्मसाक्षात्कार होतो.

अभिनवगुप्ताने एका समर्पक दोह्याने या प्रकरणाचा समारोप केला आहे :

**हतं (हउं) सिवणाहु निहिल जअ–तत्त सुनिब्भरोत्ति विरूरी**

**फुरइ विमरिस–भमरि पपलाअ (प्रकाश) णिअ–लच्छि बिभइरी**

(तंत्रसार पृ. ३४)

संस्कृत छाया:

**अहं शिवनाथो निखिल-जगत्तत्व-सुनिर्भर इति विरावं कुर्वन् (कृत्वा) ।**

**स्फुरति विमर्श–भ्रमरः प्रकाश-निजलक्ष्यं बिभर्ति ॥**

सारांश : 'अखिल विश्वव्यापी शिवनाथ मी आहे' असा गुंजारव करीत विमर्शरूपी भ्रमर ( = विमर्श) स्फुरण पावतो व आपले प्रकाश हे लक्ष्य धारण करतो (या शैवमतात प्रकाश–विमर्श हे साहचर्य आढळते.)

## (४) आणवोपाय अथवा क्रियोपाय

ज्या मार्गात मंत्रजपादी बाह्य क्रिया आत्मसाक्षात्कारासाठी वापरतात[११६] त्याला क्रियोपाय म्हणतात. ज्याप्रमाणे 'अहम्' व 'इदम्' यांची सद्विद्येमध्य

---

११५. **सर्वो ममायं विभव इत्येवं परिजानतः ।**

**विश्वात्मनो विकल्पानां प्रसरेऽपि महेशता ॥**

–उत्पलकृत ईश्वरप्रत्यभिज्ञा ४.१.१२, खंड २ पृ. २६६

११६. **बहिर्भूतोऽवच्छिन्नो य उच्चारादिः**—तंत्रालोक टीका १.१८८

समान जाणीव असते,[११७] त्याचप्रमाणे आत्मा व हे बाह्य (Objective) विश्व यांची या उपायात समान जाणीव असते. या उपायात सुषुम्ना नाडीचे उन्मीलन महत्त्वाचे असते.

क्षेमराजाचे मते 'मध्याचा' विकास झाल्यानंतर चिदानंदाची प्राप्ती होते.[११८] 'मध्ये' म्हणजे भगवती संवित् (Universal consciousness) कारण ती सर्वांच्या अंतर्यामी असते व तिचा आधार असल्याशिवाय कशाचेच अस्तित्व असू शकत नाही.[११९] या मध्याचा विकास साधण्यासाठी विकल्पक्षय शक्तिसंकोच, शक्तिविकास, वाहच्छेद, [१२०] आद्यंत–कोटिनिभालन (आदि व अंत या टोकांचे किंवा कोटींचे ध्यान करण्याचा सराव) इ. मार्ग आहेत. यातील विकल्पक्षयाची आणखी एक पद्धती म्हणजे साधकाने अलिप्त (alertly passive) राहून चित्त समुद्रावर येणाऱ्या विचार लाटाखाली असणाऱ्या जाणिवेचे (consciousness) तटस्थपणे निरीक्षण करणे.

ज्याप्रमाणे आरशामध्ये विविध स्वरूपाचे विश्व प्रतिबिंबित होते तसे आत्मस्वरूप आहे,[१२०] असे निर्विकल्प रीतीने पाहणाऱ्याला शांभव

---

११७. **सामानाधिकरण्यं हि सद्विद्याहमिदंधियोः ।–**

–ईश्वरप्रत्यभिज्ञाविमर्शिनी ३.१.३; खंड २, पृ. १९६

११८. **मध्यविकासाच्चिदानन्दलाभः ।**–प्रत्यभिज्ञाहृदय (सू) १७

११९. **सर्वान्तरमत्वेन वर्तमानत्वात् तद्भित्तिलग्नतां विना न कस्यचिदपि स्वरूपानुपत्तेः संविदेव भगवती मध्यम् ।**

–क्षेमराज, प्रत्यभिज्ञाहृदय, पृ. ९२–९३

१२०. 'वाह' म्हणजे वाहणारा, ओघ. इडानाडीतून वाहणारा प्राण व पिंगला नाडीतून वाहणारा अपान या दोहोंस मिळून 'वाह' ही संज्ञा आहे. या वाहांचा छेद म्हणजे त्यांना हृदयात विश्रांति देणे.

१२१. तुलनार्थ :

**संवेअण निम्मलदप्पणास्मि सअलं फुरन्त निअसारं ।**
**आमरिसण–रस–सरहस विमट्ठरूअं सइं (सत्यम्) भाति ।।**
**इअ सुणअ विमलमेणं निजअप्पाणं समत्थ–वत्थ–मअम् ।**
**जो जोअय (योजयति) सो परम–भैइइ बोव्व (भूत्वा) परणिव्वइं लहइ ।।**

–तंत्रसार, पृ. १९–२०

**संस्कृत छाया**

संवेदन–निर्मल–दर्पणेऽस्मिन् सकलं स्फुरन्निजसारम् ।
आमर्षण–रस–सरहस्य–विमृष्टरूपं सत्यं भाति ।।
इति श्रुत्वा विमलमेनं निजात्मानं समस्तवस्तुमयम् ।
यो योजयति स परमभैरवो भूत्वा परनिर्वृतिं लभते ।।

समावेशाने '[१२२] जीवन्मुक्ती मिळते. या मार्गात 'अनुपाया' प्रमाणेच मंत्रतंत्रादि यंत्रणेचे प्रयोजन नाही. वर चर्चा केलेल्या मार्गात 'विकल्पक्षय' हा शांभवोपाय आहे. शक्तिसंकोच व शक्तिविकास हे शास्त्रोपायात येतात. 'वाहच्छेद' व 'आद्यन्तकोटी-निभालन' हे आणवोपाय आहेत.

प्रत्यभिज्ञाशास्त्रात पंचकृत्यांचे ध्यान, विकल्पक्षयाचा सराव यांच्यावर जास्त भर दिला आहे. या दोहोंचे विवेचन शांभवोपायात केलेले आहे. यांच्या अभ्यासाने 'समावेश' प्राप्ती होते. हा समावेश संपूर्ण व ही अनुभूती चिरंतन टिकण्यासाठी क्रममुद्रेचा अभ्यास करणे आवश्यक आहे.

**क्रममुद्रा**

'क्रम' म्हणजे सृष्टी, स्थिती आणि संहार हा संवित्‌चा (consciousness चा) चक्रात्मक क्रम.[१२३] 'मुद्रा' शब्दाचे तीन व्युत्पत्त्यांप्रमाणे तीन अर्थ आहेत ते असे.[१२४]

(१) मुदं राति – जे आनंद देते ते.
(२) मुं द्रावयति – जे 'मु' (=बंधन) ला वितळवून टाकते ते, जे बंधनाचे पाणी करते ते.
(३) मुद्रयति इति – जे मोहरबंद करते ते.

क्रममुद्रेचा एकूण अर्थ : जीवात्म्याच्या संवित्‌चे (consciousness) वैश्विक (universal) किंवा शिवाच्या संवित्‌शी एकरूप झाल्यानंतर येणाऱ्या अनुभूतीचा बाह्य जगात ही अनुभव येणे. जो 'समावेश' समाधि-अवस्थेपुरता टिकतो व समाधीतून व्युत्थान झाल्यावर नाहीसा होतो तो क्रममुद्रेच्या दृष्टीने अपूर्ण आहे. समाधीतून उठल्यानंतर सुद्धा जो समावेश चालू राहून त्याच्यामुळे विश्व हे जड, भूतात्मक न दिसता परमेश्वरस्वरूपी, वैश्विक संवित्‌चे (universal consciousness) प्रकट स्वरूप किंवा लीला असून साधकाला आपण स्वतः त्या संवित्‌चा अंश आहोत असे वाटते. अशा अवस्थेत जग ही त्याज्य वा टाळण्यासारखी बाब नसून

---

१२२. समावेश म्हणजे मीत्वाच्या–स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाच्या जाणिवेचे (individual consciousness) शिवात मुरणे
आवेशश्चास्वतन्त्रस्य स्वतद्रूपनिमज्जनात्।
परतद्रूपता शम्भोराद्याच्छक्त्यविभागिनः ॥—तंत्रालोक १. पृ. २०५

१२३. सृष्टि–स्थिति–संहृति–संविच्चक्रात्मकं क्रमं मुद्रयति,
स्वाधिष्ठितम् आत्मसात् करोति येयं तुरीया चितिशक्तिः।
—प्रत्यभिज्ञाहृदय, पृ. १०४

१२४. मुदो–हर्षस्य वितरणात्, परमानन्दस्वरूपत्वात्, पाशद्रावणात्, विश्वस्य अन्तस्तुरीयसत्तायां मुद्रणात् च मुद्रात्मा–प्रत्यभिज्ञाहृदय, पृ. १०५

शाश्वत आनंद (जगदानंद[१२५]) आहे असा अनुभव येतो. जेव्हां विश्व हे आत्मानंदाचे प्रकट स्वरूप आहे अशी प्रचीती येते त्याला 'जगदानंद' म्हणतात. या अवस्थेत 'अकृत्रिम-अहं-विमर्श' (शुद्ध-मीत्वाची जाणीव- Pure I – consciousness) प्राप्त होतो आणि साधक आणि विश्व (अहम्-इदम्) भिन्न नसून अहम्' चेच 'इदम्' स्वरूप आहे असा साक्षात्कार होतो.

प्रत्यभिज्ञाशास्त्रातील जीवन्मुक्तीची ही कल्पना आहे. शिवाच्या शुद्ध अहं-संवित् पासून विश्वाची निर्मिती होते. सामान्य माणसाचा देहात्मभाव आपण निराळे व जग निराळे असे भासवतो. मनुष्याने देहात्मभावापलीकडे जाऊन विश्व आत्मस्वरूप आहे अशी आपली मूळची शुद्ध संवित् प्राप्त करून घ्यावी.

## काही तुलना

काश्मीरी शैवमतातील ईश्वराद्वयवाद व शांकरमतातील अद्वैत एक नाहीत. काश्मीरी शैवदर्शन आगमाधिष्ठित आहे, तर शांकरमत निगमाधिष्ठित – वेदपरंपरेवर आधारलेले आहे. काश्मीरी शैव लेखक वेद व आगम यांचा कर्ता परमशिव आहे या श्रद्धेने उपनिषदादि ग्रंथांचे आधार घेतात. श्रीकृष्ण हा उपमन्यूचा पाशुपत दीक्षा घेतलेला शिष्य असल्यामुळे भगवद्गीता हा शैवग्रंथ आहे. या श्रद्धेने वसुगुप्त व अभिनवगुप्त या थोर सिद्धपुरुषांनी तिच्यावर टीका लिहिल्या. शंकराचार्यांनी कोणत्याही आगमग्रंथावर भाष्य लिहिले नाही. श्रृंगेरी मठातील श्रीविद्येच्या उपासनेची असणारी परंपरा व शंकराचार्यांचे नावावर प्रसिद्ध असलेली सौंदर्यलहरीसारखी स्तोत्रे आद्य शंकराचार्यांची असतील तर त्यांना आगमग्रंथांचा परिचय असावा असे मानावे लागेल. सौंदर्यलहरीवर सुरेश्वराचार्यांची टीका आहे असे म्हणतात. पं. महादेवशास्त्रींनी सौंदर्यलहरीच्या प्रस्तावनेत म्हटले आहे :

The fact that S'ri S'ankaracharya was a reformer in his

---

१२५. जगदानंद म्हणजे जगद्रूपाने प्रकट झालेला आनंद. तंत्रालोक ५.५१–५२ मध्ये "ज्या आनंदात कुठेही व्यवच्छेद (खंड, मर्यादा) नाही, जो सर्व ठिकाणी स्फुरतो, जो परम ऐश्वर्याच्या स्वानंदमय परमामृताने ( divine joy of absolute sovereignty) संतुष्ट व पुष्ट (परमामृत — बृंहित ) असतो तो जगदानंद होय,' असे म्हटले आहे. टीकाकाराने (जयरथाने) निराळ्या शब्दात ही कल्पना मांडली आहे. '**जगता निजानन्दाद्यात्मना विश्वेन रूपेणानन्दो यत्र यतश्चेति जगदानन्दशब्दवाच्यम्।**

—तंत्रालोक ५.५१ वरील टीका, पृ. ३५६

**यत्र कोऽपि व्यवच्छेदो नास्ति यद्विश्वत: स्फुरन्। यदनाहतसंवित्तिपरमामृतबृंहितम्। यत्रास्ति भावनादीनां न मुख्या कपि संगतिः ॥ तदेव जगदानन्दमस्मभ्यं शम्भुरूचिवान्।**—तंत्रालोक ५१ व ५२

days of the Shakta Cult..., the very important part still played by S'akti worship in all the Advait Mutts, the identity of the soul and the Goddess spoken of in verse 22, the reference to Vedanta in verse 84, the peculiar style of the hymn, and an impartial reference to, and an attempt to unify the peculiar doctrines of, the mutually opposed sects of Samaya Marga and Kaula Marga, and lastly the unanimous testimony of such writers as Lakshmidhara and Bhaskararaya—all these incline me to believe that the hymn is a genuine work of S'ri S'ankaracharya.[१२६]

या मताचा प्रतिवाद करण्याचे हे स्थळ नाही.[१२७] पण जर आद्य शंकराचार्य आगमप्रामाण्यवादी असतील तर त्यांच्या प्रस्थानत्रयीतील त्यांची मते अद्वयवादी काश्मीरी शैव मतापेक्षा इतकी भिन्न का असावीत कळत नाही. वानगीदाखल मी पुढील संकल्पनांच्या बाबतीत काश्मीरी ईश्वराद्वयवाद व शांकराद्वैत यांची तुलना मांडतो.

१. परब्रह्म व परमशिव
२. माया – उपाधी का शक्ती
३. मायेचे स्वरूप – सदसत् स्वरूप, मिथ्या का सत्स्वरूप, शिवमयी सत्य
४. आत्मा – निष्क्रिय का पंचकृत्यकारी
५. विश्व किंवा संसार – नामरूपात्मक, मिथ्या, विवर्त का सत्य, 'चिद्विलास'
६. मुक्तावस्था – जीव परब्रह्मात विलीन
७. अविद्येच्या नाशार्थ साधना

वरील चर्चेवरून ईश्वराद्वयवादी काश्मीरी शैवमत व शंकराचार्यप्रणीत अद्वैतमत यांत पुढील ठळक भेद जाणवतात :

१. दोन्ही मतांत ब्रह्म किंवा शिव हे 'चिन्मय' तत्त्व असले तरी शांकरमतातील ब्रह्म हे ज्ञान किंवा प्रकाशरूप आहे. परंतु परशिव हा ज्ञान (प्रकाश) आणि विमर्श यांनी युक्त आहे. ज्ञातृत्व, कर्तृत्व व स्वच्छन्दता वा स्वातंत्र्य ही शिवाची लक्षणे आहेत. शांकरमतातील ब्रह्म परमार्थदृष्टचा निष्क्रिय आहे. ते अविद्या उपाधीने युक्त झाल्यावर – ईश्वरस्वरूपात – सृष्टयुत्पत्त्यादी कार्य

---

126. Preface to Soundarya-Lahari (Mysore Oriental Series) p. vii

१२७. याची चर्चा मी 'ललितासहस्रनामा'च्या प्रस्तावनेत करीत आहे.

होते.[१२८] म्हणजे एका अर्थी क्रिया अविद्येचे लक्षण मानले जाते. परंतु काश्मीरी शैवमतात ज्ञातृत्व व कर्तृत्व हा परमशिवाचा स्वभाव असून तो आपल्या (इच्छा) स्वातंत्र्याप्रमाणे सृष्टी (जगदुत्पत्ती), स्थिती (जगत्पालन), संहार, विलय किंवा तिरोधान (स्वात्मप्रच्छादन) व अनुग्रह ही पंचविध कृत्ये करतो म्हणून त्यास 'पंचकृत्यकारी' म्हणतात. श्रीविद्येचे उपासक गोरक्षनाथ अथवा महेश्वरानंद म्हणतात :

**सव्वअरो सव्वण्णो पुण्णो णिच्चो असंकुअंतो अ।**

—महार्थमंजरी १८

'महेश हा सर्वकर्ता, सर्वज्ञ, पूर्ण (**स्वातन्त्र्यात् स्वात्मतृप्तः**) नित्य (**प्राक्-प्रध्वंसाभावातिलङ्घी**) व असंकुचित (**सङ्कोचलक्षणनियन्त्रणाशून्यः**) आहे. यापुढील कारिकेवरील स्वोपज्ञटीकेत ते विचारतात की परमेश्वराचे हे सृष्टयादि 'पंचकृत्यकारित्व' जर नाकारले व 'मायावेदान्ता'प्रमाणे आत्मा क्रियाशून्य मानला तर तो कर्तृत्वहीन (परमशिव) असत् होईल. (**तथा हि परमेश्वरस्य ह्ययमेवासाधारणस्वभावो यत् सर्वदा सृष्टयादि–पंचकृत्यकारित्वम् ।... एतदनङ्गीकाराद्धि मायावेदान्तादिनिर्णीतस्यात्मनः स्वस्फुरणामोदमान्द्य लक्षणमसत्कल्पत्वमापतितम्**। —महार्थमंजरी, पृ. ५०

२. ईश्वराद्वयवादी (काश्मीरी शैवमत) स्वातंत्र्य हा महेश्वराचा स्वभाव असल्यामुळे सर्व कर्तृत्व त्याचेच आहे असे मानतात. माया ही त्याची उपाधी नसून शक्ती आहे व त्या शक्तीच्या द्वारा तो विविधता व भिन्नता तयार करतो. परंतु केवलाद्वैती ब्रह्म स्वभावतः निष्क्रिय असून ते मायेच्या उपाधीने युक्त झाल्यावर – ईश्वरस्वरूपात – विश्वोत्पत्ती इ. कार्य करते असे मानतात.

३. केवलाद्वैतमते सदसत्स्वरूप माया ही अनिर्वचनीय उपाधी असून ती मिथ्या आहे असे केवलाद्वैती मानतात, तर ईश्वराद्वयवादी माया ही शिवाची शक्ती असून ती सत्स्वरूप, शिवमयी किंवा चिन्मयी आहे असे मानतात. केवलाद्वैतातील कर्तृत्वशाली माया उपाधि ब्रह्मापेक्षा भिन्न – जणू काही स्वतंत्र असल्यासारखी वाटते. पण मायेला शिवशक्ती मानण्यामुळे ईश्वराद्वयत्व अधिक व्यापक व पूर्ण (inclusive and integral) वाटते.

४. जीव या अवस्थेतीलसुद्धा आत्मा निष्क्रिय असतो. सर्व कार्य प्रकृतीपासून निर्माण झालेल्या बुद्धीकडून होते असे केवलाद्वैती मानतात, पण काश्मीरी शैवमते जीवावस्थेतसुद्धा शिवाची पंच–कृत्यकारिता चालू असते.

---

**१२८. तदेवमविद्यात्मकोपाधिपरिच्छेदापेक्षमेवेश्वरस्येश्वरतत्त्वं सर्वज्ञत्त्वं, सर्वशक्तित्त्वं च, न परमार्थतो विद्ययापास्तसर्वोपाधिस्वरूप आत्मनीशित्रीशितव्य–सर्वज्ञत्वादिव्यवहार उपपद्यते —ब्रह्मसूत्रभाष्य २.१.१४**

५. विश्व अथवा संसार नामरूपात्पक व मिथ्या– विवर्त– आहे असे केवलाद्वैती मानतात, पण ईश्वराद्वयवादी विश्व हे शिवस्वरूप असल्यामुळे चिद्विलास आहे. तो 'आभास' असला तरी असत् नाही. विश्व आणि शिव यांत अद्वयत्व आहे असे तो मानतो.

६. शांकराद्वैतात मुक्तावस्थेतील जीव (आत्मा) परब्रह्मात विलीन होत असल्यामुळे (त्याच्यापुरते) विश्व संपते पण या शैवमतात मुक्तावस्थेत विश्व हे शिवरूप किंवा आत्मरूप झाल्याची अनुभूती येते.

केवलाद्वैती श्रवण, मनन, निदिध्यासन यामुळे विद्येची प्राप्ती होऊन अविद्येचा नाश होतो असे मानतात. पण शिवाद्वयवादी दोन प्रकारचे अज्ञान मानतात. (१) आणव किंवा पौरुष व (२) बौद्धिक. विद्येमुळे केवळ बौद्धिक अज्ञानाचा नाश होईल. आणव किंवा पौरुष अज्ञानाच्या नाशासाठी आत्मज्ञान-संपन्न गुरूंनी दीक्षा देणे किंवा साक्षात ईश्वरी अनुग्रह होणे आवश्यक आहे.

तत्त्वज्ञान या दृष्टीने कोणते मत – ईश्वराद्वयवाद वा केवलाद्वैत – बरोबर आहे हे शेवटी वैयक्तिक मतावर अवलंबून आहे.

काश्मीरी द्वैती शिवमताला सिद्धान्त शैवमत म्हणतात. हे द्वैती व अद्वैती शैव शिव हे परम श्रेष्ठ तत्त्व आहे आणि जीव व जगत् हेही सत् (वास्तव) आहेत असे मानतात. थोडे मतभेद असले तरी दोघेही ३६ तत्त्वे व तीन मल (पाश) स्वीकारतात, पण द्वैती शिव हा जीव व जगत् यांचेपासून नेहमीच भिन्न व स्वतंत्र आहे असे मानतात.

श्रीकण्ठ व श्रीपती पण्डित (वीरशैवमतवादी) यांच्यावर विशिष्टाद्वैताची – रामानुजांची – छाप आहे, त्याची चर्चा त्या त्या प्रकरणात होईल.

प्रकरण ३ रे

# सिद्धांत–शैवमत (द्वैती)

काश्मीरच्या निसर्गरम्य वातावरणात विकसित झालेले आणखी एक शैवमत 'सिद्धांत शैवमत' म्हणून प्रसिद्ध असून ते द्वैती आहे. ईश्वराद्वयवादी शैवमताप्रमाणे तेही अवैदिक व आगमाधिष्ठित आहे, पण त्याचे प्रमाणभूत आगम अद्वैती आगमापेक्षा भिन्न आहेत. त्या द्वैती आगमांची संख्या २८ असून त्यापैकी १८ रौद्र (रुद्र गटाचे) व १० शिवगटाचे आहेत. तत्त्वज्ञान दृष्टचा आगम व श्रुती यात फरक नसला तरी श्रीकण्ठाने[1] म्हटल्याप्रमाणे श्रुती द्विजांपुरत्या मर्यादित आहेत पण आगमांबाबतीत अधिकार सर्वसामान्य जनतेला आहेत. वैशेषिक व न्याय हे द्वैती शैवमताचे आहेत हे हरिभद्रसूरीचे षड्दर्शनसमुच्चयावरून (इ. स. ७००–७७०) वरून दिसते[2] आणि बादरायणांनी ज्या अर्थी या दोन्ही दर्शनातील मतांवर टीका केली आहे त्या अर्थी ती मते (आणि पर्यायाने शैव–द्वैतमत) बादरायणापूर्वीची आहेत हे स्पष्ट आहे. दुर्दैवाने असे निश्चितकाल असलेले इतके प्राचीन शिव–द्वैत प्रतिपादक ग्रंथ उपलब्ध नाहीत. जे द्वैतपर आगम ग्रंथ आहेत त्यांचा काळ इ. स. च्या प्रारंभीच्या शतकातील आहे असे अंदाजाने मानतात इतकेच. शिव पुराणात द्वैतमताचा पुरस्कार आहे हे आपण उपोद्घातात पाहिले आहे. पण ते पुराण इ. स. च्या ९ व्या किंवा १० व्या शतकातील आहे.

## ऐतिहासिक समालोचन

काश्मीरमध्ये द्वैती शैवमताचा अथवा 'सिद्धांत शैवमताचा' पहिला संस्थापक नसला तरी पुरस्कर्ता सद्योज्योति. 'शिवापासून परंपरेने आलेले भोग व मोक्ष साधक ज्ञान मुनींद्र रूपाने आत्रेयाला दिले' त्या रौरवागमाचा पुरस्कार आपण केल्याचे सद्योज्योतीने मोक्षकारिकेत म्हटल्यामुळे[3] (व तो उग्रज्योतीचा शिष्य असल्यामुळे) तो संस्थापक नसला तरी ग्रंथलेखन करून द्वैती शैवमतास दार्शनिक स्थैर्य देणारा बहुधा पहिला लेखक आहे. त्याचा काळ इ. स. चे ९ वे शतक; त्याने २८ द्वैती शैव आगमांचे आधारे 'तत्त्वमय निर्णय,' भोगकारिका,' 'मोक्षकारिका,' 'तत्त्वनिर्णय' ही प्रकरणे व 'रौरवागम' आणि 'स्वायंभुवागम' या शैव आगम

---

१. शैव विशिष्टाद्वैत पाहा. (पृ. ३४०)

२. लकुलीशपाशुपतदर्शन–प्रास्ताविक (पृ. ६५)

३. **रुरुसिध्दान्तसंसिध्दौ भोगमोक्षौ ससाधनौ।**
**वच्मि साधकबोधाय लेशतो युक्तिसंस्कृतौ ॥** –मोक्षकारिका ७९

ग्रंथावर टीका लिहिल्या. द्वैती शैव आगमावर आधारलेल्या मताला ' सिद्धान्त ' हे नाव त्यानेच दिले [४] व पुढे ते ' सिद्धांन्त शैवमत ' म्हणून रूढ झाले. त्याने अद्वयवादी व पाशुपत या दोन्ही शैव मतांचा प्रतिवाद केला असे त्याने ' परामोक्ष कारिकेत ' त्यांच्या मोक्षसंक्रांती मतावर केलेल्या टीकेवरून दिसते [५] सद्योज्योति अथवा खेटक याचा दबदबा काही शतके टिकला. त्याच्या ' मल ' विषयक व ' तत्त्वविषयक ' मतांचे खंडन करण्यासाठी अभिनवगुप्ताने तंत्रालोकात (८.३६,९) मध्ये खूप कोशीस केली आहे. तंत्रालोकात (आह्निक १,८,९) आणखी एका द्वैती शैव–आचार्याचे खंडन अभिनवगुप्ताने केले आहे. तो म्हणजे ' शिवतनु–शास्त्र ' कर्ता बृहस्पति. अघोरशिव व रामकण्ठ या सिद्धांतशैवी आचार्यांनी सद्योज्योति व बृहस्पति यांच्याबद्दल जो एकत्रित आदर व्यक्त केला [६] त्यावरून ते (सद्योज्योति व बृहस्पति) समकालीन (इ. स. चे ९ वे शतक) असावेत.

द्वैती शैवमताचा पुरस्कार करण्याचे श्रेय काश्मीरमधील कण्ठ घराण्याला सुद्धा आहे. यापैकी प्रथम रामकण्ठ हा ' भगवान् श्रीकण्ठाचा ' अवतार असून त्याने सूर्याप्रमाणें भिन्न शिवमतकमले विकसित केली '[७] असे अघोरशिवाने म्हटले आहे यावरून त्याने द्वैती व अद्वैती शैवमतांचे प्रतिपादन केले असावे व तसे असल्यास वसुगुप्ताच्या स्पंदकारिकावरील टीकाकार रामकण्ठ व हा (प्रथम) रामकंठ एक असावा असा कान्तिचन्द्र पांडयांचा निष्कर्ष आहे.[८] तसे असल्यास त्याचा काळ इ. स. ९७५ ते १०२५ मध्ये पडतो. या कण्ठ घराण्याची परंपरा पुढील प्रमाणे आहे :

(प्रथम) रामकण्ठ → श्रीकण्ठ → नारायणकण्ठ–द्वितीय रामकण्ठ

सारांश कान्यकुब्ज देशांतून काश्मीरात स्थायिक झालेल्या घराण्यांनी द्वैती व अद्वैती शैवमताचा ३–४ शतके प्रसार केला व या शैवमताला ' काश्मीरी ' असे

---

४. सिध्दान्तशब्द: पङ्कजादिशब्दवद् योगरूढ्या शिवप्रणीतेषु कामिकादिषु दशाष्टदशसु तन्त्रेषु प्रसिध्द: ।
–भोगकारिका २ (कातिचंद्र पांडे–भास्करी खंड ३ पृ. २३४ वरून उद्धृत)

५. आश्रयान्तरसंक्रान्ति: पूर्वाश्रयविवर्जनम् ।
विना नैव प्रसिध्दा: स्यात्त्यागे पूर्वस्तु निर्गुण: ।

६. उदाहरणार्थ अघोरशिवाने मोक्षकारिकेवरील टीकेत म्हटले आहे:
याभ्यां प्रकाशित वर्त्म सिध्दान्ते सिद्धभावत: ।
गुरूणामपि तौ वन्द्यौ सद्योज्योति–बृहस्पती ।। मोक्षकारिका १

७. साक्षाच्छ्रीकण्ठनाथादिव श्रीरामकण्ठाच्छिवमत कमलोन्मीलनप्रौढभास्वान
श्रीकण्ठकृत ' रत्नत्रया 'वरील टीकेचे प्रास्ताविक.

८. भास्करी–खंड ३, प्रस्तावना पृ. १८

भौगोलिक विशेषण मिळाले. पण द्वैती शैवमताचा काश्मीरबाहेरही खूप प्रचार होता. धाराधिपति भोज (इ. स. १०१८-६०) या विद्याप्रेमी सम्राटाने 'तत्त्व प्रकाशिका' नामक 'सिद्धान्तशैवमत' प्रस्थापित करणारा ग्रंथ लिहिला. त्यावर चोलदेशीय अघोरशिव व कुमारदेव यांच्या टीका आहेत.[९] भोजाचा सिद्धान्तशैवी गुरू उत्तुंगशिव हा लाट (दक्षिण गुजरात) मधील कल्याण नगरी येथे राहत असे.

सिद्धान्त शैवमत काश्मीर किंवा मध्यभारत-गुजरात असे उत्तर भारतापुरते मर्यादित राहिले नाही. त्याचा दार्शनिक प्रचारक चोलदेशातील कुण्डिनकुलाचा रहिवासी अघोरशिव (इ. स. चे १२ वे शतकाचा) याने केला. त्याच्या गुरूचे नाव सर्वात्मशिव. अघोरशिवाने द्वैती शैवमताच्या दृष्टीतून[१०] पुढील सिद्धान्त शैवमतावरील ग्रंथांवर टीका लिहिल्या.

(१) भोजकृत तत्त्वप्रकाशिका, सद्योज्योतिकृत (२) तत्त्वसंग्रह व (३) तत्त्वत्रयनिर्णय आणि (४) भोगकारिका, (५) श्रीकण्ठकृत रत्नत्रय, (६) द्वितीय रामकण्ठकृत नादकारिका, (७) नारायणकण्ठकृत मृगेंद्रवृत्ति.

याशिवाय त्याने काव्य-नाटकादि ललित साहित्य निर्माण केले. तो फार लोकप्रिय शिक्षक होता असे '**इति लक्षद्वयाध्यापकश्रीमदघोरशिवाचार्यविरचिता तत्त्वप्रकाशिकावृत्तिः समाप्ता.**' असे त्याच्या त्या वृत्तीच्या पुष्पिकेवरून दिसते. त्याचा काळ इ. स. च्या १२ व्या शतकाचा मध्य. त्याच्या काळापूर्वी द्वैती शैव आगमावर टीका ग्रंथ लिहिले गेले होते

आतापर्यंत आपण दार्शनिक पद्धतीने द्वैती शैवसिद्धान्ताची प्रस्थापना व पुरस्कार करणाऱ्या पंडितांचा विचार केला. पण दक्षिणेमध्ये बहुजनसमाजामध्ये सिद्धान्त शैवमत लोकप्रिय करण्याचे श्रेय तामिळी भाषेत रचना करणाऱ्या शैव संतांना आहे. पेरिय-पुराणामध्ये वर्णन केलेले हे संत सी. व्ही. नारायण अय्यर म्हणतात तसे 'असंस्कृत' असतील[११] पण ते उत्कट शिवभक्त होते. आणि बहुजन समाजातून आलेल्या त्या संतांनी जनतेच्या भाषेत जनतेच्या हृदयांत सिद्धान्त शैवमताची स्थापना केली त्या संतांपैकी तिरुमूलर, सम्बदर, अप्पर, माणिक्कवाशगर (माणिक्कवाचकर, माणिक्क वाचक) व सुंदरमूर्ती यांचा आग्नरता तात्त्विक

---

९. मला टी. गणपतिशास्त्रींची 'तत्त्वप्रकाशिकेची' आवृत्ती (त्रिवंद्रम् १९२०) उपलब्ध झाली. त्यावर कुमारदेवाची 'तात्पर्यदीपिका'ही टीका आहे. अघोरशिवाची टीका मला उपलब्ध झाली नाही. ती अप्रकाशित असल्याचे कळते.

१०. हे म्हणण्याचे कारण भोजकृत तत्त्वप्रकाशिकादि ग्रंथ ईश्वराद्वयवादी आहेत असे दाखवण्याचा प्रयत्न काही टीकाकारांनी केला आहे

११. ओरिजिन अँड अर्ली हिस्टरी ऑफ शैविझम इन साउथ इण्डिया, पृ. २०५

परिचय करून देऊन, द्वैती शैवमताची सैद्धांतिक रूपरेषा पाहू:

## तिरूमूलर

'तिरुमंदिरम्' या दाक्षिणात्य सिद्धान्तशैवमताच्या सर्वांत जुन्या प्रमाण ग्रंथाचा लेखक तिरूमूलर. याच्या जीवनाविषयी फारशी ऐतिहासिक माहिती उपलब्ध नाही. तामिळी शैव संतांच्या कथा असणारे 'पेरिय पुराण' चमत्कारमय आहे.[१२] अप्पर, संबंदर, दण्डि अडिगळ इ. संतांनी जैनमतावर मिळविलेले विजय तत्त्वचर्चा वा वादविवाद करून मिळविलेले नसून चमत्कार करून मिळविल्याचे त्यांत दाखवले आहे.[१३] त्यामुळे त्या संतांच्या काव्यवचनांतून मिळणारे तत्त्वज्ञान मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

तिरुमूलर हा कैलासाकडून आलेल्या योग्याने (तामिळी भाषक) प्रतामध्ये प्रवेश केलेला संत वा योगी होता. या दंतकथेपेक्षा त्याच्या 'तिरूमंदिरम्' ग्रंथातील शैव तत्त्वज्ञान व काश्मीरी शैवमत एक असल्यामुळे तो उत्तरेकडून आलेला (बहुधा काश्मीरी) पंडित असावा किंवा उत्तरेकडे जाऊन काश्मीरी-शैवमताचे अध्ययन केलेला तामिळी पंडित असावा असे मानणे सयुक्तिक वाटते. त्याचा उल्लेख इ. स. च्या ९ व्या शतकातील सुंदरने केला असल्याने तो ९ व्या शतकापूर्वी होऊन गेला हे निश्चित. नारायण अय्यर त्याचा काल इ. स. ६ वे शतक आहे असे ठामपणे सांगतात[१४]

## 'तिरुमंदिरम्' परिचय

'तिरुमंदिरम्' मध्ये ९ तंत्रे किंवा अध्याय वा भाग असून एकून ३००० हून अधिक पद्ये आहेत. १ ले तंत्र उपदेशपर आहे. त्यात गूढ उपदेशाबरोबरच धर्म

---

१२. सी. व्ही. नारायण 'ओरिजिन अँड अर्ली हिस्ट्री ऑफ शैविझम इन साउथ इण्डिया' (मद्रास युनिव्हर्सिटी हिस्टॉरिकल सेरीज १९३६ क्रम ६) मध्ये पृ. २०५ वर लिहितात.
The saints of The Periya Puranam were mostly uncultured folk whose outstanding virtue was their intense **Bhakti** which did not depend for its growth upon the saiva philosophy as it found expression in Tirumular's work. मी तिरुमंदिरम् वर जास्त भर देण्याचे कारण त्यांतील तात्त्विक विवेचन.

१३. ... The victories won for the cause of saivism were throngh miracles and not through controversies or philosophical disputations नारायण अय्यर–उपर्युक्त पृ. २०५

१४. उपर्युक्त पृ. २२४. हे मत बरोबर असेल तर वसुगुप्ताचे कालापूर्वी सिद्धान्त शैवमतरूढ होते असे मानावे लागेल.

(अग्निहोत्र, अन्नदान इ.) व नीति-तत्त्वे (अहिंसा, ब्रह्मचर्य इ.) यांचा उपदेश केला आहे. दुसऱ्या तंत्रात शिव पुराणामधील कथा (अगस्त्याचे दक्षिणेत आगमन लिंगाचा आविर्भाव, दक्षयज्ञ इ. कथा), उत्पत्ती, स्थिती, संहार, विलय किंवा तिरोधान, अनुग्रह ही शिवाची पंच कृत्ये, विज्ञानकळ (तामीळ –'विज्ञानकळर') सकल व प्रलयकर असे जीवांचे तीन वर्ग, शिव किंवा गुरू यांचा मान राखणे तितिक्षा इ. विषय आले आहेत. तिसरे तंत्र योगविषयक आहे. हा पातंजल योग नाही. पण पातंजल योगाची अष्टांगें त्याला वगळता आली नाहीत. त्यांची फळे वेगळी दिली आहेत. उदा. यम–सिद्धी झाल्यास उमेची कृपा व अमरावतीची प्राप्ती, प्रत्याहार साधल्यास शिवस्वरूपप्राप्ती, ध्यान सिद्धीने ब्रह्मा, विष्णू, रुद्र इंद्र याच्या लोकात गमन करता येते इ. त्यानंतर खेचरी, पर्यंक व चंद्र या योगांचे विवरण आहे. सारांश, तिरूमूलर प्रणीत (किंवा त्याचा परंपरागत) योग मार्ग तिसऱ्या तंत्रात आहे. चवथ्या तंत्रात मंत्रशास्त्र किंवा उपासनामार्ग असून त्यात अजयाजय, भैरवीमंत्र तसेच त्याच्या (तिरूमूलरच्या) योगमार्गातील विशिष्ट 'त्रिपुर' 'एरोळी', 'भुवनापति', 'नवाक्षरी' चक्रें व 'पूर्ण शक्तीचे' वर्णन आहे. हे सर्व गूढ वाटते. पाचव्या तंत्रात 'शुद्ध', 'अशुद्ध', 'मार्ग' व 'कडुम् (अति) शुद्ध' शैव मार्ग सांगितले आहेत. चर्या, क्रिया, ज्ञान व योग या चार साधनांचे वर्णन आहे सन्मार्गवर्णनात सखामार्ग, सत्पुत्रमार्ग व दासमार्ग यांचे वर्णन आहे. सालोक्य सामीप्य, सारूप्य, व सायुज्य या मुक्तींचे वर्णन व मंद, मंदतर, तीव्र, तीव्रतर शक्तिपात (अनुग्रह) हे वर्गीकरण केल्यानंतर उन्मार्गाचा निषेध केलेला आहे. सहावे तंत्र सामान्य लोकांचे दृष्टीने अतिशय महत्त्वाचे आहे. यात शिव हा गुरू असून (शिव–गुरुदर्शन), वैराग्य, तपश्चर्या, ज्ञान यांची चर्चा व अनुग्रहप्राप्त भक्तांना तपश्चर्या न करता ज्ञानप्राप्ती होते असे सांगितले आहे. सातवे तंत्रही योगविषयक आहे. षट्चक्रांचे वर्णन, सिद्धान्तशैवमतातील 'षडध्वा,' तिरूमूलरला त्याचे गुरू नंदी याने सांगितलेला संप्रदाय, अंड (=ब्रह्मांड,) पिंड (=शरीर), सदाशिव, आत्मा, ज्ञान व शिव या सहा लिंगांचे वर्णन, आत्मचर्चेत प्राण, पुरुष, अणु, जीव, पशु व बोध हे सहा भाग, तसेच इंद्रियदमन व खऱ्या सद्गुरूंची लक्षणे सांगितली आहेत. आठव्या तंत्रात शैव सिद्धांताची मूलभूत शिकवण, ११ (आध्यात्मिक) अवस्था, शैवसिद्धांत व इतर संप्रदाय, पति, पशु व पाश यांचे एकत्व, त्रिदोष, तीन करणे, तीन शून्ये इ. त्रिके, 'तत्त्वमसि,' 'अहं ब्रह्मास्मि' इ. महावाक्यांचे विवरण, जागृती, स्वप्न, सुषुप्ती या प्रत्येक अवस्थेचे तीन तीन प्रकार (उदा. जीवस्वप्न, परस्वप्न, शिवस्वप्न) व 'विश्वग्रास' संकल्पनेचे विवरण आहे. नवव्या (व शेवटच्या) तंत्रांत तिरमूलराचे आध्यात्मिक

अनुभव (शिवानंद नृत्य, सुंदरनृत्य, सुवर्ण मंदिर इ.) असून शेवटी सर्वव्यापी परमेश्वराची स्तुती आहे.

'तिरुमदिरम्' ग्रंथावरून प्रगल्भावस्थेतील सिद्धान्तशैवमत दक्षिण भारतात इ. स. च्या सहाव्या शतकापासून रूढ होते असे दिसते.

तिरुमूलर नंतर 'तेवारम्' या तामिळी वेदांचे रचनाकार यांचे कार्य महत्त्वाचे आहे.

## चार आचार्य[१५] (समयाचार)

तिरुमूलरनंतर ज्यांनी आपल्या वाणीने व आचरणाने दक्षिण भारतातील, (तामीळनाडूमधील) जैन व बौद्ध धर्मांचे प्राबल्य नष्ट करून सिद्धान्तशैवमताला सुस्थिर केले असे चार थोर आचार्य होऊन गेले. शैवमतातील चर्या क्रिया, योग व ज्ञान या मार्गांना सिद्धान्त शैवमतात अनुक्रमे दासमार्ग, सत्पुत्रमार्ग, सहमार्ग व सत्मार्ग म्हणतात व त्याचे प्रतिनिधी म्हणून (१) अप्पर (तिरुनावुक्कुरसु इ. स. ६००–६८१), (२) संबंदर (तिरुज्ञान संबंध इ. स. ६४४–६६०), (३) माणिक्क वाचकर (इ स. ६६०-६९२) व (४) सुंदर अथवा सुंदर-मूर्ति (इ. स. ७१०-७३५) या तामिळी आचार्यांना मानतात.[१६] अत्यंत उत्कट भक्तीने स्फुरलेली यांची सुमधुर तामिळी गीते वेदतुल्य मानली जाऊन हे 'तामिळीवेद' (तेवारम्) तामीळनाडमध्ये आजही गायिले जातात.

यापैकी अप्पर व संबदर समकालीन असून ते इ. स. च्या ७ व्या शतकात कांचीचा पल्लवराजा १ ला महेंद्र (इ. स. ६०० ते ६३०) याच्या कारकीर्दीत होऊन गेले. या दोघांपैकी 'अप्पर' ह्याचा जन्म इ स. ६०० च्या सुमारास दक्षिण अर्कांट जिल्ह्यात एका संपन्न वेळ्ळाळ (vellala) घराण्यात झाला. त्याने सत्यधर्माचे शोधात प्रथम जैन धर्म स्वीकारला. पण त्याला आतड्याच्या विकाराने फार त्रास होऊ लागला तेव्हा आपल्या बहिणीच्या सल्ल्याप्रमाणे तो शिवालयात गेला आणि अत्यंत आर्ततेने त्याने शिवाची प्रार्थना केली. प्रार्थनेनंतर त्याला बरे वाटले आणि एका दिव्य आकाशवाणीने त्याचे नाव 'तिरुनावुक्करसु' (= वागीश) ठेवले. त्याने जैनधर्म सोडल्याबद्दल जैनांनी व राजा महेंद्रवर्माने त्याचा अतिशय छळ केला व त्याला ठार मारण्याचे प्रयत्न केले. अप्पर हा भक्त प्रल्हादाप्रमाणे त्याना पुरून उरला. अखेर राजाने त्याची क्षमा मागितली व जैनधर्माचा त्याग करून

---

१५. या विभागातील तामिळी शब्दांचे उच्चार त्यांच्या इंग्रजी स्पेलिंगप्रमाणे दिले आहेत.

१६. हे काळ श्री सी व्ही. अय्यर यांच्या उपर्युक्त ग्रंथाप्रमाणे (पृ. ४२३–४३१) पृ. ४४४–४६२.

तो शैव झाला. तो संबंदर (जन्म इ. स. ६३९) पेक्षा वयाने खूप वडील असल्यामुळे संबंदर त्याला 'अप्पर' (म्हणजे 'बाबा') म्हणत असे व तेच नाव पुढे रूढ झाले. संबंदराचा जन्म शियाली (ब्रह्मपुरी) येथे एका ब्राह्मण घराण्यात झाला. तो चार वर्षांचा असता आपल्या वडिलांच्या बरोबर नदीवर आंघोळीला गेला. त्याच्या वडलांनी स्नान करताना पाण्यात बुडी मारल्यावर संबंदराने शेजारच्या शिव-मंदिराचे शिखराकडे पाहून 'आई', 'बाबा' अशी हाक मारली. आणि जगाची मातापितरे –शिव व पार्वती– त्या आर्त हाकेसरशी प्रकट झाले व पार्वतीने सोन्याच्या पेल्यातून त्याला (ज्ञान–) दुग्ध दिले व तेव्हापासून त्याची काव्यशक्ती जागृत होऊन सर्वशास्त्रात प्रगती झाली. या दंतकथेला संबंदराचे लेखनात आधार नाही, पण इतर तामिळी संतांचे तसे मत दिसते.

पेरीय पुराणात संबंदराचे नावावर अनेक चमत्कार आहेत. उदा. शिवाने स्वप्नात येऊन मोत्याची पालखी देणे (संबंदरकृत प. (Padigam) २२६, अप्पर-कृत प. ९), मालव (malava) देशाच्या राजकन्येला दुर्धर रोगातून बरे करणे (संबंदर प. ४४), सर्पदंशाने मृत झालेल्याला उठवणे (संबंदर प. १५४) इत्यादी. आपल्यास त्याच्या चमत्कारापेक्षा त्याच्या पडिगमांतून (कवितांतून) व्यक्त झालेले शैवदर्शन महत्त्वाचे आहे.

### संबंदर व शैवमत[१७]

शिवाची दोन स्वरूपे आहेत. त्यापैकी उच्चतर स्वरूप औपनिषद ब्रह्मासारखे आहे. त्याच्यापासून ब्रह्मा, विष्णू, रुद्र व अखिल वस्तुजात निर्माण होते. संबंदर जेव्हा पौराणिक शिवाच्या लीला वर्णन करतो तेव्हां त्या अपर (खालच्या दर्जाच्या) शिवाच्या असतात. त्याच्यामते शिव एक आहे. तो स्त्री व पुरुष असे दोन झाला. तो तीन गुण, चार वेद, पंच महाभूते झाला (प. ११). शिव चराचर विश्व व्यापून राहिला आहे. तो एकाचा अनेक झाला (प. १३). हीच संकल्पना तिरूमूलरच्या 'अँडलिंगम्' या संज्ञेत व्यक्त झाली आहे. परमशिवाचे विष्णु-रूपात चिंतन करणारे लक्ष्मीचे कृपापात्र बनतात (प. २१.२). विश्वसंहारक रुद्राचे पूजन करणारे कृतार्थ होत (प. २१.३). तो निराकार (तामीळ –'अरुवम्') परमशिव साकार अथवा रूपी ब्रह्मदेव व विष्णू यांनाही अदृश्य आहे (वैष्णवांची 'पर व 'अपर' विष्णुविषयक अशीच कल्पना आहे). परमशिव ज्योतिस्वरूप असून त्याच्या आदी व अंत याचा पत्ता ब्रह्मदेव व विष्णू यांनाही लागला नाही (प १९. ९) तो परमशिव सर्वांचा (ब्रह्मा, विष्णू व रुद्र या त्रिमूर्तींचाच नव्हे तर सर्व विश्वाचा) आदी, मध्य व अंत आहे (प. २९६.३,४४.८). तैत्तिरीय

---

१७ मुख्यत: सी व्ही नारायण अय्यर कृत "शैविझम् इन साउथ इंडिया" (पृ. ३४४–३६६) चे आधारे.

उपनिषदात सुद्धा परब्रह्माबद्दल **यतो वा इमानि भूतानि जायन्ते । येन जातानि जीवन्ति यत् प्रयन्त्यभिसंविशन्ति । तद्विजिज्ञासस्व तद् ब्रह्मेति ।** (तै उ. ३.१) असेच म्हटले आहे. माण्डूक्य उपनिषदात परमात्म्यास 'शिव' म्हटले आहे व त्याचे वर्णन संबंदराच्या परमशिव संकल्पनेसारखे आहे.[१८]

संबंदर अद्वैत्याप्रमाणे माया मिथ्या मानत नाही. ती परमात्म्याच्या शक्तीचा सर्वोच्च आविष्कार आहे, असे मानतो.[१९]

संबंदर अधूनमधून (आणव, कर्म व माया) मलांचा उल्लेख करतो. उदा. प. ११९.६ मध्ये 'तो (शिव) तापसांचा मल नाहीसा करील' असे म्हणताना तिरुमूलरने 'शिव-गुरू' या शब्दात व्यक्त केलेली संकल्पना असावी.

संबंदराला ईश्वर प्राप्तीचा योग संप्रदाय व ब्राह्मणांचा वैदिक संप्रदाय माहीत होते. उदा. तो. प. १२८. १७.२४ मध्ये म्हणतो, 'तुझी स्तुती आकाशगामी (योगी) करतात. त्यांनी पंचेंद्रिये, चार अंतःकरणे, तीन गुण आणि दोन वायू (प्राण व अपान) यांच्यावर ताबा मिळविला आहे. जो ब्राह्मण तुझ्यावर मन केंद्रित करतो, द्विजांचे नियमधर्म पाळतो, त्रिकाळ संध्या करतो, चार वेदांचे पठन करतो, पंच (महा) यज्ञ करतो, सहा वेदांगांचा अभ्यास करतो, एका अक्षराचा (ॐ कार) जप करतो व पुराणांचे वाचन करतो त्याचे रक्षण करण्यासाठी तू ब्रह्मपुरास येतोस.'

तिरुमूलरने 'तिरुमंदिरम्'मध्ये विवेचन केल्याप्रमाणे संबंदरसुद्धा सृष्टि (जगदुत्पत्ति), स्थिति (जगत्पालन), संहार, तिरोभाव (अदृश्यता) व अनुग्रह या शिवाच्या पाच शक्ती आहेत असे मानतो. फक्त तो त्या शिवाच्या कृपा (अरुळ) आहेत असे म्हणतो (प. १४३.३). अथर्ववेदातील 'स्कंभ' कल्पनेचे पौराणिक रूपांतर – शिवाने अग्निस्तंभरूपाने ब्रह्मदेव व विष्णु यांना दर्शन दिले – हे संबंदरने उल्लेखले आहे (प. १४८.९). हा ज्योतिरूप शिव सत् व असत् आहे. परमात्मा सदसत् आहे. तो सर्व आकारात भरला असल्यामुळे निराकार आहे. प. २३० मध्ये शिवाचे पुरुषसूक्तातील पुरुषाप्रमाणे किंवा भगवद्‌गीतेतील 'विश्वरूप'दर्शनाप्रमाणे तो सहस्राक्ष आहे इ. वर्णन केले आहे.

शैव मार्गाचे वर्णन करताना तो पंचाक्षरी (**शिवाय नमः**) मंत्र जपाने शिवमुक्ती साधेल, असे म्हणतो. तिरुमूलरने शैवसिद्धान्तात 'जीवमुक्ति' 'अतीत' आहे, 'परमुक्ति' ज्या ठिकाणी सर्वांचा लय आहे अशी 'उपशान्त' आहे व

---

१८. **अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिन्त्यम्...शान्तं शिवमद्वैतम्...स आत्मा स विज्ञेयः ।** –माण्डूक्य उप. ७.

१९. तो (शिव) हा सर्व शक्तींच्या मध्ये सर्व श्रेष्ठ असणाऱ्या शक्तीचा दुसरा अर्ध (भाग) आहे. —संबंदर प. ११५.४.

शिवमुक्ति 'आनंद' आहे असे म्हटले आहे (तिरुमंदिरम्–८ वे तंत्र). त्याच्या मते ॐकार जपाने परमुक्ति मिळते पण 'शिवाय नमः' या मंत्रावर–शिव नामावर–सर्व लक्ष केंद्रीभूत केले तर सर्व अडथळे नाहीसे होऊन आनंद अथवा शिवमुक्ती प्राप्त होते (महाविष्णु आनंदमय आहे अशी वैष्णवांचीसुद्धा कल्पना आहे.) संबंदरसुद्धा पंचाक्षर हे वेदातील गुह्य आहे व त्याच्या जपाने ब्रह्मा व विष्णू यांना जो अग्निस्तंभ (शिवस्वरूप) अगम्य होता त्या 'सकल' शिवाचे भक्ताला दर्शन होते असे म्हणतो. संबंदर, अप्पर किंवा सुंदर हे संत विष्णूला कमी लेखत नाहीत. वरील कथेचा उल्लेख शिवमुक्ती किंवा आनंद मिळविण्यासाठी सच्चिदानंदस्वरूप जो पर शिव (= महाविष्णू–वैष्णवमते) त्याचे ध्यान करावे असे सांगतात.

'तेवारम्' मधील इतर शैवकवीप्रमाणे संबंदर जेव्हा शिवाच्या आयुधांचा, डमरू इ. चा उल्लेख करतो तेव्हा त्याला विशिष्ट प्रतीकात्मक अर्थ असतो. उदा. तिरूमूलरने चिदंबरम्च्या नटराजाचे प्रतीकात्मक विवेचन करताना म्हटले आहे : 'सृष्टि' (जगदुत्पत्ती) हा त्याचा डमरू आहे. त्याचा अभय हस्त ही 'स्थिति' (जगत्पालन) दर्शवते. त्याचा हातातील परशु विश्व संहाराचे प्रतीक आहे. त्याने वर उचलेले पाऊल 'अनुग्रह' असून खाली रोवलेला पाय 'तिरोभाव' दाखवतो (तिरुमंदिरम् । २७९९).[२०]

संबंदराच्या 'तेवारम्' मधील पद्यात भक्तिमार्गाचा – भजन, पूजन, (पंचामृतादी साहित्याने) नामस्मरण, सहस्रनामपठन, भस्मधारण इ. चा– उपदेश केला आहे. त्यावरून त्याचे पूर्वीचे काळापासून भक्तिमाहात्म्य त्या प्रांतात होते' त्याचाच त्याने पुरस्कार केला असे दिसते.

### अप्पर

अप्पर जरी जन्माने ब्राह्मण नसला तरी त्याचे सिद्धांत–शैवमताचे ज्ञान सखोल होते व शैव आगम व वेदांत तत्त्वज्ञानात तसा फारसा फरक नसल्यामुळे त्याच्या सुमधुर तामिळी काव्यातून आपल्याला उपनिषन्मंत्रांचे ध्वनी ऐकू येतात. बहुजन समाजाला संस्कृत वेदांचा अधिकार नसेल, पण तामिळी वेदांचे अध्ययनाचा अधिकार निश्चित होता. या चार समयाचारांनी (समयाचार्यांनी) ब्रह्मस्पर्श झालेल्या आपल्या अधिकारसंपन्न वाणीने औपनिषद ज्ञान व भक्ती बहुजनसमाजापर्यंत पोचवून जैन व बौद्ध मतांकडे वळलेल्या समाजाला पुनश्च शैवसिद्धांताकडे आणले. या कार्यात अप्पराचा सिंहाचा वाटा आहे. गोष्टीतून तत्त्वज्ञान शिकवताना त्याने शिवाबद्दलच्या पौराणिक उल्लेखांचा तात्त्विक उलगडा केला आहे. अग्निस्तंभरूपाने शिवाने ब्रह्मदेव व विष्णू यांना दर्शन दिले, या कथेत शिवाचे त्रिविध स्वरूप

---

२०. सी. व्ही. एन्. अय्यर, उपर्युक्त, पृ. ३६२. आनंदकुमारस्वामींनी Dance of Siva मध्ये या नृत्याचे मोठे काव्यमय विवेचन केले आहे.

दिसते ते असे : (१) विश्वाचा संहार करणारा ब्रह्मा, विष्णू व रुद्र या त्रिमूर्तीतील खालच्या दर्जाचा शिव, (२) याहून उच्च असे परापर – शिवशक्तिस्वरूप. हे त्या वेळी ब्रह्मदेव व विष्णूला दिसलेल्या ज्योतीचे पररूप किंवा परंज्योति, आणि (३) यापलीकडे असणारे (अग्नि) स्तंभरूपी (अथर्वात उल्लेखलेले 'स्कंभ') रूप, या सर्वश्रेष्ठ स्वरूपाला तो शिव किंवा विष्णू न म्हणता 'पर' (= तिरुमूलर-संज्ञित 'परापरइ') म्हणतो. शिव विष्णूचे पूजन करतो किंवा विष्णू शिवाचे पूजन करतो हे उल्लेख खालच्या दर्जाच्या शिव–विष्णूबद्दल आहेत, महाविष्ण **किंवा 'पर' विष्णू व परंज्योतीपलीकडील शिव वस्तुतः एकच आहेत.**[२१] अप्पर विष्णूविषयी जे उल्लेख करतो, त्यावरून त्याला विष्णूबद्दल किंवा वैष्णवाबद्दल द्वेष वाटत नसे असे दिसते. उलट सामान्य रुद्राच्या वरच्या श्रणीचे 'परंज्योती' किंवा 'परापर' (सर्वांत श्रेष्ठ–पर–अशा शिवरूपाच्या खालच्या श्रेणीतील शिवरूप) हे हरिहररूप असून त्याचा (डावा) अर्धाभाग विष्णुरूप आहे असे तो म्हणतो (प. ४३. ७, ४८.३). विष्णूचा मोहिनी अवतार व शिवाला त्या विष्णुरूपाबद्दल पडलेला मोह याचे असे रहस्य असावे, असे त्याचे मत आहे. अप्पर म्हणतो: 'पंचेंद्रियनिग्रह करून एकाग्रतेने ध्यान केल्यास ॐकार रूपी शिवाचे दर्शन होते' (प २५.९). याचा अप्पर अर्थ असा करतो की, ॐकारापलीकडे गेलेला जीव शिवात विलीन होतो. कारण 'शिवमुक्ती' (असे संबंदरने संज्ञा दिलेल्या) अवस्थेत द्वैत राहात नाही. तिरुमूलरचेही असेच मत आहे.[२२] हा अर्थ जर बरोबर असेल तर हे शैवसंत अद्वैताकडे कललेले दिसतात.

शैवसिद्धांतात ३६ तत्त्वे सांगितली असली तरी अप्परने आपले शरीर ९६ तत्त्वांचे बनलें असून त्याच्या भोवती 'नियति', 'कला', 'काल', 'राग' आणि 'विद्या' या पाच 'कंचुकांचा' वेढा असून ती या ९६ तत्त्वांच्या शरीराला त्रास देतात, असे म्हटले आहे (प. ५४.३; ६७.५ इ.). ती ९६ तत्त्वे अशी :

[५ भूते + ५ तन्मात्र + ५ ज्ञानेंद्रिये + ५ कर्मेंद्रिये + ४ (मन, बुद्धि, चित्त व अहंकार अशी) करणे =] २४ आत्मतत्त्वे + १० नाडी + ५ अवस्था + ३ मल + ३ गुण (सत्त्व इ.) + ३ मंडले (सूर्य, अग्नि, चंद्र) + ३ रस (वात, पित्त, कफ) + ८ विकार (काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, दंभ, असूया) + ६ आधार + ७ धातू + १० वायू (प्राण, अपान इ. + कूर्म, कृकल इ.) + ५ कोश + ९ द्वारे (२ कर्णरंध्रे + २ नाकपुडया इ.) = ९६ तत्त्वे.

अप्पराचा आगमावर भर आहे. त्याच्या मते दक्षाला केवळ मंत्र (कर्मकाण्डा-त्मक भाग) माहीत होते. भक्तिमार्गाचा पुरस्कार करणारे आगम वा तंत्र माहीत

---

२१. सी. व्ही. एस नारायण अय्यर, 'शैविझम् इन साऊथ इंडिया', पृ. ३७२–७३.
२२. उपर्युक्त, पृ. ३७४.

नव्हते म्हणून त्याच्या यज्ञाचा नाश झाला. त्याच्या समकालीनाप्रमाणे तो आगमाचे संगायन करी (प. १२९.४). परंतु शिवकृपा होण्यासाठी चित्त एकाग्र करून 'शिवाय नमः' या मंत्राचे चिंतन (जप) करणे आवश्यक आहे, असे तो सांगतो. 'मी भस्म धारण करून "शिवाय नमः" या मंत्राचा जप केला आहे. मला शिवगती दे' अशी त्याची मागणी आहे (प. ९५.५–६). तो अज्ञानी लोकांनाही या पंचाक्षरी मंत्राचा उपदेश देई व या जपाने शिव अंतर्यामी प्रकटतो असे त्याचे मत आहे (प. १७४.१). तो शिव, नारायण, ब्रह्मा, वेद इ. स्वरूपी असला तरी तो त्यापलीकडे नामरूपातीत आहे (प. २२२.३, २२४.८), शैवपंथ हाच सर्व मार्गांत श्रेष्ठ मार्ग होय (प. २२५.१), असे त्याचे मत आहे.

उपनिषत्कालापासून चालत आलेले तत्त्वज्ञान व भक्तिमार्ग यांचाच पुरस्कार अप्परने केला. आणि त्याचे (आणि संबंदरांचे) शुद्ध आचरण, सुमधुर काव्य आणि उत्कट भक्ती यांनी तत्कालीन समाजाला मंत्रमुग्ध करून परधर्मातून शैव–संप्रदायाकडे आकर्षून घेतले.

## माणिक्क-वाचकर (इ. स. ६६०–६९२)[२३]

माणिक्कवाचक, माणिक्कवाचकर किंवा माणिक्कवाशगर (माणकाप्रमाणे वाचा असलेला) या नावांनी प्रसिद्ध असलेल्या या शैव संताचा 'तिरुवाचक' हा भक्ती व तत्त्वज्ञान यानी ओथंबलेल्या तामिळी पद्यांचा संग्रह तामिळी शैवांना वेदतुल्य वाटतो. माणिक्कवाचकर मदुरेचा पाण्डच राजा अरिमर्दन याचा अधिकारी होता. परंतु पुढे राजाने त्याला आध्यात्मिक गुरू केले व आपला मुलगा जगन्नाथ पाण्डच याला गादीवर बसवून तो परमार्थाला लागला. त्यानंतर लौकरच माणिक्क वाचकर चिदंबरम्‌ला गेला. तेथे त्याने वादात बौद्धांचा पाडाव करून शैवमताची पुनः प्रस्थापना केली. 'वातवुरार–पुराणम्'च्या आधारे ही हकीकत देऊन दासगुप्ता म्हणतात : त्या वादावरून उभयपक्षांना बौद्धमताची फारच बेताची माहिती होती असे दिसते.[२४]

माणिक्क–वाचकराने आपल्या आध्यात्मिक प्रगतीचा आलेख 'तिरुच्चडगम्' या पद्यशतकात पुढीलप्रमाणे दिला आहे :

प्रथम त्याला ईश्वरी स्वरूपाची कल्पना नव्हती. 'तो माझा धनी व मी त्याचा दास' एवढीच जाणीव (तिरु. = तिरुच्चडगम् प. = पद्य ९). पुढे हाच देव आकाश, पृथ्वी, देह, जीव, 'मी व माझे' असे लोकांना वाटावयास लावणारा

---

२३. सुरेंद्रनाथ दासगुप्तामते त्याचा काळ इ. स. चे ९ वे शतक असून शैवसिद्धान्ताच्या प्राचीन पुरस्कर्त्यांपैकी माणिक्क वाचकर हा एक प्रमुख संतकवी होता. (ए हिस्ट्री ऑफ इण्डियन फिलॉसफी, खंड ५, पृ. १५६).

२४. उपर्युक्त पृ. १५४.

आहे (तिरु. प. १५). परमेश्वर या सर्व रूपांनी प्रकट झाला आहे. तो पुरुष, स्त्री वा नपुंसक नाही. यच्चयावत् सर्व पदार्थ तोच आहे, ही अनुभूती येते. पुढे त्याची ' आत्मशुद्धी ' – जीवाचे पाश, मलत्रय साफ नाहीसे होतात. पुढे मध, दूध, उसाचा रस इ. शब्दांनी ज्याची गोडी (आध्यात्मिक सुख) व्यक्त करता येणार नाही असा देव आहे, असा त्याला अनुभव येतो. त्यानंतर त्याला शं (शान्ति) देणाऱ्या शंकराचे दर्शन होते. शेवटी आनंदातीत, ' परापरम् ' ईश्वराचा त्याला साक्षात्कार होतो.[२५]

## माणिक्क वाचकराच्या सिद्धान्त शैवविषयक कल्पना

सुरेंद्रनाथ दासगुप्तांनी माणिक्क वाचकराचे शैव तत्त्वज्ञान, त्याच्यानंतर लिहिल्या गेलेल्या ' शिवज्ञानबोधा 'प्रमाणे आहे असे मानून त्याचे (माणिक्क वाचकराचे) तत्त्वज्ञान पुढीलप्रमाणे दिले आहे.[२६]

जीवाचे मलत्रय (किंवा पाश) शिवकृपेने संपूर्ण नाहीसे होऊन ज्ञानप्राप्ती होते व तो शाश्वत आनंदात शिवाजवळ राहतो. पारमार्थिक प्रगतीमध्ये ईश्वरी अनुग्रहाला (' अरुळ् 'ला) फार महत्त्वाचे स्थान आहे. जीवाची सर्व कामे, इंद्रियद्वारा ज्ञानग्रहणसुद्धा ईश्वरी अनुग्रहाने होते. पण हे सर्व ज्ञान होण्याला व मलशुद्धीसाठी गुरूच्या मार्गदर्शनाची आवश्यकता आहे. शिव व जीव यांचे ऐक्य म्हणजे परमसौख्य. हे दोघे आपले स्वत्व राखून एक होतात. जीवाचे पाश नाहीसे होऊन जीव व शिव यांचे ऐक्य झाले की ज्ञेय, ज्ञाता व ज्ञान ही त्रिपुटी नाहीशी होऊन समाधिअवस्था प्राप्त होते. 'उमापति'(इ. स. १३१३) या 'तिरुवाचकम्'च्या भाष्यकाराने म्हटले आहे :

वेदांचे सार म्हणजे शैव सिद्धान्तातील ' पति ', ' पशु ' व ' पाश ' हे तीन पदार्थ (categories) होत. शिव सर्वश्रेष्ठ तत्त्व असून ते परमशुद्ध, शाश्वत व चिदानन्दमय आहे. तो निष्कल असला तरी ' सकल ' स्वरूप धारण करतो व स्वतःच्या मायाशक्तीने उत्पत्ती, स्थिती, लय करवितो. तो सर्वव्यापी असून आपल्याला शरण येणाराला तो वरदान करतो. पशू हे अनादिकालापासून मलयुक्त (पाशबद्ध) आहेत. परशिव व (त्याची) परा–शक्ती वस्तुतः एकरूपच आहेत. तथापि ज्ञान हे शिवाचे वैशिष्ट्य व क्रियाशक्ती हे शक्तीचे. शिव–शक्तिसमावेशनात ज्ञान व क्रिया या शक्ती समान राहतात व तिला इच्छाशक्ती म्हणतात. ज्यावेळी ज्ञान व क्रिया यांच्या मेलनात क्रिया अधिक प्रमाणात असते तेव्हा तिला ' क्रियाशक्ती ' म्हणतात व ज्ञान जेव्हा अधिक प्रभावी असते तेव्हा तिला ' ज्ञानशक्ती ' किंवा ' अरुळ्–शक्ती ' म्हणतात व ती जीवाला मोक्ष देण्यात

---

२५. सी. व्ही. एन् अय्यर–उपर्युक्त पृ. ४३६–४३९.
२६. सु. ना. दासगुप्ता–हिस्ट्री ऑफ इण्डियन फिलॉसॉफी खंड ५ पृ. १४९–१५९.

प्रभावी असते. जीवांना पाशबद्ध करण्यात शिवाची तिरोधानशक्ती कार्यप्रवण असते.

वस्तुतः शिवपुराणात (वायवीय संहिता) हा तत्त्वज्ञानाचा भाग येऊन गेला आहे. तामिळी संतांनी ते ज्ञान लोकभाषेद्वारा आम जनतेपर्यंत पोचवले व जैन व बौद्ध धर्मांचे प्राबल्य कमी केले हे काही कमी महत्त्वाचे कार्य नाही.

## सुंदर (सुंदरर किंवा सुंदरमूर्ति)

चौथा समयाचार्य सुंदरमूर्ति (इ. स. ७१० ते ७३५ चे दरम्यानची १८ वर्षे)[२७] हा 'सखामार्गा' (सख्यभक्ती) चा आदर्श मानला जातो. त्याचे आणि शिवाचे मैत्रीचे – लडिवाळपणाचे – नाते इतके घनिष्ट की त्याने संसारामधील सुखे – प्रेयसी, संपत्ती इ. – शिवाला मागायची व शिवाने ती पुरवायची. केवळ पेरियपुराणातील हकिकतीवरून नव्हे तर त्याने रचलेल्या – गायिलेल्या – पद्यांतूनही ही गोष्ट स्पष्ट होते. त्याचे प्रेम असलेल्या मुलीशी – शंगिलीशी – त्याचे शिवकृपेने लग्न झाले व त्यानंतर त्याला अंधत्व आले. 'देवा माझी दृष्टी काढून घेतलीस, आता निदान काठी तरी मला दे' (पद्य ५४.४). 'देवा तू शंगिलीसाठी मला अंधत्व आणलेस' (प. ६३.३). 'मी बायकांशी बोलण्याचा प्रयत्न करतो तेव्हा त्या म्हणतात, 'आंधळ्या, जा तिकडे !' 'सोसवत नाही रे देवा हा अपमान' (पद्य ९). सख्यभक्तीतल्या या लडिवाळपणाला तोड नाही. तथापि भक्तीच्या उत्कटतेत, भाषेच्या माधुर्यात त्याची पदे 'तेवारम्' या तामिळी वेदातील इतर संत कवींच्या रचनांपेक्षा यत्किंचित्‌ही उणी नाहीत.

चेरमान पेरूमाळ (Ceraman Perumal) राजाकडे तो पाहुणा म्हणून गेला असता त्याने कैलासवास मागितला व शिवाने तो तात्काळ दिला. सुंदरमूर्ति तेव्हा अवघा १८ वर्षांचा होता.

या चार तामिळी आचार्यांनी आपल्या पद्यातून जे शैव तत्त्वज्ञान शिकवले याचा संक्षिप्तपणे विचार केल्यानंतर केवळ तत्त्वज्ञानाला वाहिलेल्या ग्रंथातील सिद्धान्त शैव तत्त्वज्ञान पाहू :

## सिद्धांतशैवमत – तत्त्वज्ञान (रूपरेषा)[२८]

श्रीकण्ठ प्रणीत शैवविशिष्टाद्वैत व श्रीपतिपण्डित प्रणीत श्रीकरभाष्यातील विशेषाद्वैत (वीरशैवमत) यांना आधारभूत असलेल्या २८ आगमांवर[२९] सिद्धान्त शैवमत आधारले असल्यामुळे पारिभाषिक शब्द व इतर तपशील यामध्ये या तिन्ही

२७. सी. व्ही. नारायण अय्यर, उपर्युक्त, पृ. ४४४-४६२.

२८. मुख्यतः भोजप्रणीत 'तत्त्वप्रकाश' (त. प्र.) व माधवकृत सर्वदर्शनसंग्रह (स. द. सं.) यांच्या आधारे.

२९. यापैकी १८ आगम द्वैताद्वैती व १० आगमद्वैती आहेत.

शैवमतांत बरेच साम्य आहे. शैवागमात पति, पशू व पाश [ तामीळ इराइ (Irai) उयिर (uyir), कट्टु (kattu) ] हे तीन पदार्थ मानले आहेत.

**शैवागमेषु मुख्यं पति-पशु-पाशा इति क्रमात् त्रितयम्**।[30] तसेच **त्रिपदार्थं चतुष्पादं महातन्त्रम्**.[31] यापैकी पाश (मलस्वरूप व) जड असल्यामुळे या पदार्थ. त्रितयात त्यांना शेवटचे स्थान दिले आहे. भोजदेवाने 'मल', 'कर्म' व 'माया' या इतर शैवपंथीयांनी मानलेल्या पाश कल्पनांचा अधिक विस्तार करून 'मल'; 'कर्म', 'माया', 'मायोत्पन्न जग' व 'तिरोधान (शिवत्व झाकणारी) शक्ती' असे पाच 'अर्थपञ्चक' अथवा 'पाश' आहेत असे प्रतिपादन केले आहे.[32] हे दोन अधिक पाश मायापाशाचे स्थूल व सूक्ष्म असे पृथक्करण केल्यामुळे व शिवाच्या तिरोधानशक्तीचा यात समावेश केल्यामुळे हे 'पाशपञ्चक' अथवा 'अर्थपंचक' झाले.[33]

दुसरा पदार्थ पशू. हा व पति या दोघांत चैतन्य हा समान धर्म असला तरी पाशामुळे अथवा मलत्वामुळे शिवाशी साधर्म्य असणाऱ्या या पदार्थाला 'अणुत्व' आल्यामुळे यांना 'पशू'[34] म्हणतात. या पदार्थांत ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत संसारात भ्रमण करणाऱ्या (**संसारवशवर्तिनः**) सर्वांचा समावेश असून ते 'देवदेव' शिवाचे पशू आहेत.[35] माया कर्मादी पाशांनी बद्ध होऊन संसार चक्रात सापडलेले जीव हे सुख दुःख इ. बाबतीत परतंत्र आहेत.

वरील कर्ममलांचा स्पर्श नसलेला, स्वतंत्र, व परतंत्र जीवांना मलमुक्त करून मोक्षप्राप्तीचा अनुग्रह करणारा असा अंतिम तत्त्व असणारा पदार्थ 'शिव' असून सर्व विश्व हे त्याच्या मायेचा पसारा आहे. म्हणजे या जगाचे उपादान कारण माया आहे.[36] शिवाने पशूंना मोक्षप्राप्ती सुलभ व्हावी म्हणून विश्वनिर्मिती

---

३०. तप्र १–५ पृ. २३.

३१. माधव-सर्वदर्शनसंग्रह (सदसं) पृ. ७७.

३२. **मल कर्म च माया च मायोत्थमखिलं जगत् ।**
**तिरोधानकरी शक्तिरर्थपञ्चकमुच्यते ॥** –तप्र. पृ. ३२.

३३. कुमारटीका–तात्पर्यदीपिका (तादी) पृ. ३२.

३४. **शिवः पशुपतिः प्रोक्तः पशवो ह्यणवो मताः ।**
**ते पाशबन्धात्पशवः ।**—सिद्धान्तहृदय (तादीत उद्धृत, पृ. ३२).

३५. **ब्रह्माद्याः स्थावरान्ताश्च देवदेवस्य धीमतः ।**
**पशवः परिकीर्त्यन्ते संसारवशवर्तिनः ॥**
**तेषां पतित्वाद् भगवान् रुद्रः पशुपतिः स्मृतः ॥**
लिंगपुराण, तप्र उद्धृत, पृ. ३१.

३६. '**मायां तु प्रकृतिं विद्यादि'ति मायामूलोपादानस्य प्रतिपादनाच्च तत्सिद्धिरिति तस्मान्माया जगन्मूलोपादानमिति सिद्धम्** ।–तप्र. ११७.

केली असून तो स्वतंत्र असला तरी जीवांना कर्मसापेक्ष मुक्ती देतो.

वरील तीन पदार्थांचे स्वरूप समजण्यासाठी ज्ञान आवश्यक असल्यामुळे 'विद्या' हा प्रथम पाद मानला आहे. या ज्ञानानंतर पति (=शिव) स्वरूपाचा साक्षात्कार होण्यासाठी सशास्त्र दीक्षाविधीची आवश्यकता असल्यामुळे 'विद्या-पादा' नंतर 'क्रियापाद' सांगितला आहे. शिवस्वरूप प्राप्तीसाठी 'योग' साधनेची जरुरी आहे म्हणून 'क्रिया–पादा'नंतर 'योगाला' स्थान दिले आहे. योगसाधनेसाठी विशिष्ट विधि–निषेध पाळावे लागतात. त्या आचारधर्मांचे 'चर्या' पादात विवेचन येते.

शैवागमांवरील अधिष्ठित संप्रदायात पदार्थ व पाद यांची नावे, संख्या व आवश्यकता याबद्दल फारसे मतभेद नाहीत. आहेत ते तपशिलात येतात. पण तत्पूर्वी या मताची मांडणी व रूपरेषा पाहू.

## पति (=शिव)

या शैवमतात वेदातील 'पशुपति' हे शिवाचे अभिधान स्वीकारून पति हा शिव असून तो चिद्घन, सर्वव्यापी, नित्य, एक, आनंदरूप (शम्भु), सर्वांवर अनुग्रह करणारा, सर्वव्यापाररहित (शान्त), स्वयंप्रकाश (सततोदित), प्रभु (अप्रतिहत ऐश्वर्य असलेला) व सर्व जगाचे एकमेव बीज असणारा आहे.[३७] त्याला 'शिव' म्हणण्याचे कारण त्याचे ठिकाणी स्वभावतःच (सर्व जीवांचे–पशूंचे– ठिकाणी असणारा) अनादिमल (आणवमल) नसून तो अत्यंत परिशुद्ध आहे [३८] तो उदासीन वा निर्व्यापार असला तरी त्याच्या साक्षित्वामुळे विश्वोत्पत्ती इ. होतात. तांदळाचा भात होण्यात अग्नी हा स्वतः काही करीत नाही, त्याप्रमाणे तटस्थ, उदासीन शंभूकडून माया वगैरे विक्रिया होतात.[३९]

द्वैताद्वैती अठरा आगमांवर आधारल्यामुळे याचा अद्वैताकडे कल असला तरी हे तत्त्वज्ञान द्वैती आहे. शिव हा कर्ता, माया उपादान कारण व इतर शक्ती या करण आहेत असे भोजदेवाने स्पष्ट म्हटले आहे.[४०] तप्र. ३.१ मधील 'मायोपादान' याचे स्पष्टीकरण करताना कुमारदेव स्वच्छ मान्य करतो : माती किंवा तंतू (सूत) यासारखी माया ही उपादान आहे. पण ती सूक्ष्म असल्यामुळे घट-पटाप्रमाणे दिसत

---

३७. तप्र (तत्त्वप्रकाश १.१)

३८. अनादिमलसंश्लेषप्रागभावात् स्वभावतः ।
अत्यन्तपरिशुद्धात्मेत्यतोऽयं शिव उच्यते ॥
वायवीय (तप्र. पृ. ४२ वर उद्धृत)

३९. यथा ह्यविक्रियो वह्निर्जलतण्डुलविक्रियाम् ।
तथा करोत्युदासीनः शम्भुर्मायादिविक्रियाम् ॥ तप्र पृ. ४६.

४०. शक्तय इहास्य करणं मायोपादानमिष्यते सूक्ष्मा । तप्र ३.१, पृ. १११.

नाही.[४१] ती एक आहे, नित्य (**विनाशरहिता**) व व्यापिनी (ज्याप्रमाणे मातीच्या भांड्यात माती त्याप्रमाणे कालापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत जडत्वाने अनुस्यूत) आहे.[४२]

हे द्वैत अद्वैतात मुरडून घेण्यासाठी शिव हा सूर्यासारखा असून शक्ती त्याचे किरणाप्रमाणे आहे किंवा शक्ती व शिव यांचे संबंध धर्म व धर्मी याप्रमाणे आहेत, ती शिवापासून भिन्न नाही,[४३] असे रत्नत्रयकारांनी म्हटले असले तरी भोजदेव व त्याचा टीकाकार कुमार यांची भूमिका स्पष्ट आहे: "मायेला उपादान मानले नाही तर कार्यच होऊ शकणार नाही व अनवस्थाप्रसंग ओढवेल:

'या सर्व पाशांचे माया हे कारण आहे. ती अव्यक्त मूळ प्रकृती आहे.'

या वचनातील मायेचे मूल प्रकृतित्व ती उपादान कारण असल्यामुळेच सिद्ध होते.[४४]

धर्म-धर्मिसंबंध स्वीकारून शक्ती जगत्कारण मानणे म्हणजे सत्कार्यवाद नाकारणे होय. परंतु या धर्म-धर्मिसंबंधामुळे शक्त्यद्वयवाद (फक्त शक्तीच जगत्कारण आहे. त्यात शिवाची आवश्यकता नाही) हे मतही नाकारले जाते. कारण धर्मी (शिवा)च्या आधाराशिवाय धर्माला (शक्तीला) अस्तित्वच असू शकत नाही.[४५]

या ठिकाणी ईश्वराद्वयवाद्यांचा स्वातंत्र्यवाद व सिद्धान्तशैवांचा स्वातंत्र्यवाद यांतील फरक पाहणे महत्त्वाचे आहे. सिद्धान्तशैवमते पशूला कर्ममलामुळे सुख-दुःखादी पाशांचे बंधन असते. पशू (जीव, जंतु) अज्ञ असल्यामुळे आपल्या सुख-दुःखाविषयी अस्वतंत्र असतो. पण अशी कोणतीही बंधने नसलेला शिव प्राण्यांच्या कर्माप्रमाणे त्यांना फळे देतो.[४६] शिवाच्या या न्यायबुद्धीमुळे त्याच्यावर वैषम्य व

---

४१. **मायोपादानं मृत्तन्त्वादिस्थानीयमिति "मायां तु प्रकृतिं विद्यादि"ति श्रुतेस्तदुपादानत्वसिद्धिः।... सूक्ष्मत्वादनुपलम्भो मायाया नासत्वादिति।** –तप्र पृ. १११.

४२. **घटशरावकुम्भादिषु मृद्वत् स्वकार्येषु कालाद्यवन्यन्तेषु जडतयाऽनुस्यूता।** –तप्र पृ. ११४.

४३. **शिवशक्त्योरात्मभेदाभावेऽपि धर्मिधर्मभेद** ।–रत्नत्रय १००.

४४. **तस्या उपादानान्तराभावेनाकार्यत्वात् । तदभा (वे चा) नवस्थाप्रसङ्गः। "एतेषामेव पाशानां माया कारणमुच्यते। मूलप्रकृतिरव्यक्ता" इति मायाया मूलप्रकृतित्वोपादानाच्च सिद्धा**।–तप्र पृ. ११३.

४५. **शक्तेर्धर्मत्वेनाश्रयं विनाऽवस्थानासम्भवात् तदाश्रयः स एव शक्तिमान् सङ्कल्पमात्रेण विश्वकर्ता**। रत्नत्रय १०३.

४६. **बद्धाञ्शेषानपरान्विनियुङ्क्ते भोग भुक्तये पुंसः** । सदसं पृ. ८४ वर उद्धृत

नैर्घृण्याचा आरोप येत नाही. तसेच कर्म-सापेक्ष फळे देण्यामुळे त्याच्या स्वातंत्र्याला बाध येत नाही. स्वातंत्र्य याचा अर्थ आपण दुसऱ्याच्या प्रेरणेचा विषय न होणे, करणादिकांना प्रेरणा देणे असा होतो. कर्मादिकांची अपेक्षा नसणे असा नव्हे.[४७] तो जगत्कर्ता आहे. त्यामुळे तो कारण, साधन, फल इ. जाणणारा – सर्वज्ञ आहे.[४८] म्हणून त्याच्या ठिकाणी वैषम्य नाही. सूर्य सर्व कमलांवर सारखाच प्रकाश पाडतो तसा शिवाचा सर्वांवर अनुग्रह करण्याचा स्वभाव आहे. पण सूर्योदयानंतर सर्वच कमले एकदम विकसित होत नाहीत. ती आपल्या 'स्वभावा' प्रमाणे योग्यवेळी उमलतात त्याच प्रमाणे ज्यांचा मल पक्व झाला असेल अशांनाच शिव मोक्षाला नेतो.[४९] 'कर्मसापेक्षता' याचा हा अर्थ दिसतो. शिवाचे शरीर मल, कर्म, इ. नी युक्त–अथवा प्रकृतिजन्य नसून ते शक्तिरूप–ईशानादी पाच मंत्रांचे–आहे. मृगेंद्र तंत्रात म्हटले आहे : **तद्वपुः पञ्चभिर्मन्त्रैः पञ्चकृत्योपयोगिभिः। ईश-तत्पुरुषाघोरवामाद्यैर्मस्तकादिमत्** ॥ (सदसं पृ. ९) तसेच पारमेश्वरतंत्रात शिवाचे मस्तक 'ईशान,' मुख 'तत्पुरुषाय', हृदय 'अघोर', गुह्य 'वामदेवाय,' आणि पाय 'सद्योजातम्' ही प्रतीके असलेल्या मंत्राचे बनले आहे,[५०] असे म्हटले आहे.

याखेरीज शिवतनूची इतरही मंत्रात्मक पंचके सुचवली गेली आहेत उदाहरणार्थ, शिवाचे मुख्य ॐ कार रूप ऋग्वेद असून ते सामवेद या जिह्वेने युक्त आहे त्याची मान यजुर्वेद असून अथर्ववेद ओष्ठ आहे (लिंग पुराण). ते बीज, बिन्दु नाद, शक्ती, शान्तात्मन् असे पंचात्मक प्रणव-शरीर आहे. उष्णिक्, गायत्री इ. वैदिक छंदानी ते बनले आहे. अशा अनेक कल्पना 'पंचमन्त्रतनु' या संकल्पनेचे

---

४७. **स्वतन्त्रस्याप्रयोज्यत्वं करणादिप्रयोक्तृता।**
**कर्तुः स्वातन्त्र्यमेतद्धि न कर्माद्यनपेक्षता**॥ सदसं पृ. ७८

४८, **सर्वज्ञः सर्वकर्तृत्वात्साधनाङ्गफलैः सह।**
**यो यज्जानाति कुरुते स तदेवेति सुस्थितम्**॥ (मृगेंद्रतंत्र) सदसं पृ. ७९

४९, तप्रमधील 'वायवीय' वचनः
**अनुग्रहस्वभावत्वे न सर्वान्मोचयेच्छिवः।**
**स्वभावोऽपि हि भावानां भाविनोऽर्थस्य कारणम्।**
**समं न विकसन्त्येव स्वस्वभावानुरोधतः।**
**एवं पक्वमलानेव मोचयेन्न शिवः परान्**॥

५०. **पञ्चमन्त्रतनुः श्रीमान् सकलं परिपठ्यते...**
**ईशानमूर्धा पुंवक्त्रो ह्यघोरहृदयः प्रभुः।**
**उच्यते वामगुह्योऽयं सद्यमूर्तिर्महेश्वरः॥**
**एवं मन्त्रास्तु पञ्चैते यैर्निबद्धा तनुः शिवा**॥ तप्र. पृ. ४३

स्पष्टीकरण करण्यासाठी मांडल्या गेल्या आहेत.[५१] निराकार परमेश्वराची उपासना करणे अवघड असल्यामुळे भक्तावर अनुग्रह करण्यासाठी तो साकार झाला '[५२] अशी कल्पना केली गेली आहे.

या मंत्रमय शरीराने तो सतत उदित असलेला शिव सृष्टी, स्थिती, संहार, तिरोभाव (झाकणे, अदृश्य करणे) व भक्तांवर अनुग्रह ही पाच कृत्ये करतो.[५३]

ही पंचकृत्ये अलिप्तपणे करणारा शिव पशूंच्या विषयी करुणेने प्रेरित होऊन –त्यांनी मोक्ष मिळवावा, संसारमुक्त व्हावे – म्हणूनच ही कृत्ये शुद्धमार्गामध्येच करतो. अहितकरमार्गात प्रभूचा नोकर जो ' अनंत ' आहे, त्याच्या द्वारा ही कृत्ये होतात.[५४] या ठिकाणी शिव याचा अर्थ ' मंत्र ', ' मंत्रेश्वर ', ' महेश्वर ' ' मुक्तात्मे '. या शिवत्वाशी संबंध आलेले शिवत्ववाचक आध्यात्मिक अधिकारीही येतात इतकेच नव्हे तर शिवत्वप्राप्तीच्या दीक्षादी उपायांचाही संग्रह पति-पदार्थात होतो. (**शिवत्वप्राप्तिसाधनेन दीक्षादिनोपायकलापेन सह पतिपदार्थे संग्रहः कृत इति बोद्धव्यम्**)

## सिद्धांत-शैवमत

### पशु

ज्याला ' जीव ', ' क्षेत्रज्ञ ' इ. संज्ञा आहेत व मल, माया, कर्म इ. पाशांनी जो बद्ध आहे, त्या ' अनणु ' प्रमाण जीवात्म्याला ' पशु ' ही संज्ञा आहे.[५५] तो वैष्णवमताप्रमाणे आकाराने अणु नाही. लोकायत (चार्वाक अथवा बृहस्पतीचे अनुयायी) मानतात तसा देहस्वरूप नाही. तसा तो मानला तर स्वप्नातील अनुभव

---

५१, तप्र. पृ. ४२–४३

५२. **साधकस्य तु रक्षार्थं तस्य रूपमिदं स्मृतम् ।**
–पौष्करागम, सदसं पृ. ८० वर उद्धृत.

तसेच, शिवाला उद्देशून म्हटले आहे :
**आकारवांस्त्वं नियमादुपास्यो, न वस्त्वनाकारमुपैति बुद्धिः** ।–उपर्युक्त पृ. ८०.

५३. **पञ्चविधं तत्कृत्यं सृष्टि–स्थिति–संहार–तिरोभावः ।**
**तद्वदनुग्रहकरणं प्रोक्तं सततोदितस्यास्य** ।। –त. प्र. कारिका पृ. ४४, १.७

५४ **शुद्धेऽध्वनि शिवः कर्ता प्रोक्तोऽनन्तोऽहिते प्रभोः ।**
–श्रीमत्करण (सदसं पृ. ८० वरून)

५५. **आत्मा यदि भवेन्मेयस्तस्य माता भवेत्परः ।**
**पर आत्मा तदानीं स्यात्स परो यदि दृश्यते** । –सदसं. मध्ये उद्धृत पृ. ८० वर
**पाशबद्धत्वात्पशुत्वम् । ते न किञ्चित्कर्तृत्वादिनाऽणुत्वम्, न परमाणुवदवस्थानात् । तेषामव्यापकत्वेन तदसम्भवात्** । –कुमारदेव तप्र. पृ. ३१–३२.

किंवा सुषुप्तीतील आनंद वा अज्ञान आत्मा ( = देह) निद्रिस्त असल्यामुळे आठवणे अशक्य ठरेल. (**तान्यदृष्टं स्मरत्यन्य:**) या न्यायाने निद्रिस्त आत्म्याला जागृतावस्थेत स्वप्नादी आठवणे अशक्य आहे. नैयायिकांच्या मताप्रमाणे तो प्रकाश्य ( = ज्ञानाचा विषय) मानल्यास अनवस्था (Regressus adinfinituss) ओढवेल. कारण आत्मा हा मेय म्हणजे प्रमाणाचा विषय मानला तर त्याचा प्रमाता अथवा जाणकार त्याहून वेगळा मानावा लागेल आणि ही लांबड संपणार नाही. आत्मा देश व काल यांनी मर्यादित नाही त्यामुळे देहपरिच्छिन्न (देहापुरता मर्यादित आकाराचा) समजणारे जैन व क्षणिक मानणारे बौद्ध भ्रांत आहेत असे शैव मानतात. अद्वैतवादी एकच आत्मा मानतात. पण तसे असते तर एकाचा भोग दुसऱ्याच्या प्रतीतीस आला असता. त्यामुळे प्रत्येक शरीरात भिन्न आत्मा मानणेच सयुक्तिक आहे. त्याचप्रमाणे सांख्यांच्या मताप्रमाणे आत्मा अकर्ता मानणे योग्य नाही त्याच्या पाशांचा नाश झाला की तो शिवरूप होतो. (**पाशान्ते शिवता श्रुते:**) वस्तुत: पाशमुक्त आत्मे शिवच होतात पण ते शिवाच्या कृपेने मुक्त होतात. शिव मात्र अनादिमुक्त, एक, जाणण्यास योग्य (विज्ञेय) व पंचमन्त्रात्मक शरीर असलेला आहे.[५६]

पशूंचे वर्गीकरण त्यांच्या मला (पाशा) प्रमाणे पुढील प्रमाणे केले आहे:[५७]

| (१) विज्ञानाकल, | (२) प्रलयाकल | व (३) सकल |
|---|---|---|
| ((आणव) मलयुक्त) | (मल व कर्म यांनी युक्त (बद्ध)) | (मल, कर्म व माया यांनी बद्ध) |

हे वर्गीकरण तो जीवात्मा कोणत्या व किती पाशांनी बद्ध आहे त्यावर आधारलेले आहे. मुख्यत: पाश किंवा मल तीन प्रकारचे आहेत. ते असे: जावात्म्याबरोबर निर्माण झालेला असा अनादि (पण सान्त) मल. याला ईश्वराद्वयवादी (काश्मीरी शैव) 'आणव (अणु = जीव) मल' म्हणतात; कर्मांपासून निर्माण होणारा 'कार्म' मल व 'माया' मल. ज्या जीवात्म्याने योग, संन्यास किंवा विज्ञान यांच्या सामर्थ्याने माया व कर्म हे मल नाहीसे केलेले असतात पण ज्यांचा जन्मजात मल फक्त शिल्लक असतो त्या पशूंना 'विज्ञानाकल' ही संज्ञा आहे. यापैकी ज्यांचे हे जन्मजात मल साफ नाहीसे झाले असतील ते 'समाप्तकलुष.' होत. अशा श्रेष्ठ जीवात्म्यांना शिव कृपाळूपणे परोक्षज्ञान देऊन 'अनंत,' 'सूक्ष्म'

५६. **मुक्तात्मानोऽपि शिवा: किन्त्वेते तत्प्रसादतो मुक्ता: ।
सोऽनादिमुक्त एको विज्ञेय: पञ्चमन्त्रतनु: ।।**

५७. **तत्राद्यो मलमात्रेण युक्तो ऽन्यो मलकर्मभि: ।
कलादिभूमिपर्यन्ततत्त्वैस्तु सकलो युत: ।।** –सोमशंभू (सदसंमध्ये उद्धृत) सदसं पृ. ८२

'शिवोत्तम' 'एकनेत्र,' 'एकरुद्र,' 'त्रिमूर्तिक' 'श्रीकण्ठ' आणि 'शिखण्डी' या आठ विद्येश्वरांच्या पदावर नियुक्ती करतो.[५८]

जे 'असमाप्त–कलुष' आहेत त्यांना भगवान् शिव मंत्र–देवतांचे स्वरूप देतो[५९] प्रलयकालामध्ये फक्त आणव मल व कार्म मल शिल्लक असतात. या दोन मलांनी युक्त असणाऱ्या पशूंना 'प्रलयाकल' म्हणतात. या प्रलयाकल पशूंपैकी ज्यांचे (आणव) मल व कर्ममल अपक्व असतात ते 'पुर्यष्टक' देहाने युक्त होऊन आपापल्या कर्माप्रमाणे (प्रलयकाल संपल्यानंतर) त्या त्या योनीत जन्म घेतात.[६०] 'पुर्यष्टक' म्हणजे अंत:करणे, बुद्धी, कर्म–करणे (इंद्रिये) होत.[६१] याचा खुलासा करताना कुमारदेवाने दोन मते दिली आहेत :

पहिल्या मते : पुर्यष्टकात अन्त:करण म्हणजे (१) बुद्धी, (२) अहंकार (३) मन, धीकर्मकरण म्हणजे विषय निश्चित करणारी शब्द, स्पर्श, रूप, रस, गन्ध जाणणारी इंद्रिये[६२] येतात. दुसऱ्या मते (१) कर्मेंद्रिये (२) ज्ञानेंद्रिये (३) अन्त:करणचतुष्टय (४) प्राणपंचक (५) तन्मात्रपंचक (६) काम (७) कर्म आणि (८) अविद्या यांचे पुर्यष्टक असते.[६३] 'पुर्यष्टक' ही 'लिंग-शरीरा' सारखी कल्पना आहे. जे प्रलयाकल पशू ज्ञानाग्नीने 'पक्वकलुष' झाले आहेत, त्यांच्यावर भगवान् शिव अनुग्रह करून त्यांना भुवनपतित्व, गणेशत्व, मंत्र-तंत्रेश्वरत्व देतो.[६४]

---

५८. **आद्याननुगृह्य शिवो विद्येशत्वे नियोजयत्यष्टौ ।** त प्र. १–१० पृ. ४९
ही विद्येश्वरांची यादी सदसं पृ. ८१ मध्ये "बहुदैवत" ग्रंथातून उद्धृत केली आहे.

५९. **विद्येश्वरान् करोत्यष्टावीशोऽन्यान् मनुदेवता: ।** –सिद्धान्तहृदय. तप्र १–२० वरील कुमार देव टीकेत उद्धृत पृ. ४९.

६०. **प्रलयाकलेषु येषां पक्वे मलकर्मणी व्रजन्त्यन्ये ।**
**पुर्यष्टकदेहयुता योनिषु निखिलासु कर्मवशात्** ।।–त. प्र. १.११

६१. **पुर्यष्टकमन्त:करणं धीकर्मकरणानि** ।।–तप्र. १.१२.

६२. **शब्द: स्पर्शश्च रूपं च रसो गन्धश्च पञ्चम: ।**
**मनोबुद्धिरहंकार: पुर्यष्टकमुदीरितम्** ।।–तप्र. पृ. ५१ कुमारदेवटीकेत उद्धृत

६३. **कर्मेन्द्रियाणि खलु पञ्च तथापराणि ।**
**बुद्धीन्द्रियाणि मन आदि चतुष्टयं च ।।**
**प्राणादिपञ्चकमथो वियदादिकं च ।**
**कामश्च कर्म च तम: पुनरष्टमी पू:** ।। तप्र, कुमारदेवटीकेत पृ. ५२ वर उद्धृत

६४. तप्र १.११–१३ कुमारदेवटीका, तप्र. पृ. ५०

तिसरा वर्ग मल, कर्म व माया यांनी युक्त असणाऱ्या सामान्य 'सकल' पशूंचा. यापैकी ज्यांचा मल जसा जसा व जितका परिपक्व झाला असेल त्या प्रमाणात त्यांच्या ठिकाणी शक्तिपात करून त्यांना 'माण्डल्यादि' मंत्रेश्वर पद देतो व आचार्यस्वरूप होऊन त्यांना परतत्त्वामध्ये प्रवृत्त करतो.[६५] परंतु जे पशू 'अपक्वकलुष', आहेत, ज्यांची संसारातच आसक्ती आहे त्या सर्व बद्ध पशूंना त्या त्या पुरुषाच्या कर्माप्रमाणे तो भोग भोगण्यास लावतो.[६६]

सारांश, सिद्धांतशैवमताची 'पुर्यष्टक' ही कल्पना व परमशिवाची फल देण्यातील कर्मसापेक्षता ही ईश्वराद्वयवादी काश्मीरी शैवमतापेक्षा भिन्न आहे.

## पाश

सिद्धांतशैवमतात (१) मल, (२) कर्म, (३) माया व (४) तिरोधायक वा रोधशक्ती हे चारच पाश मानले आहेत पशुपती किंवा शिव आणि पशुत्व यांच्यात फरक एवढाच की शिवाला पाश नाहीत. पाशमुक्ती म्हणजे मोक्ष.

### (१) मल

'मल', 'अज्ञान', 'पशुत्व', 'तम', 'अविद्या' इ. पर्यायशब्द पहिल्या पाशाला आहेत. काही त्याला ज्ञानाचा प्रागभाव मानतात तर काही तिमिरसदृश, जडात्मक, भावरूप पण ज्ञानाने तो नाहीसा होणारा (**ज्ञान-निवर्त्य**) आहे असे मानतात.[६७] तो मल एक असला तरी अनेक शक्तींनी युक्त असतो. त्यामुळे पुरुषाचे (मूळचे शिवत्वाचे) ज्ञान व क्रिया या झाकल्या जातात.[६८] पण ज्याप्रमाणे तांदळाला झाकणारे तूस (भाताचे फोलकट) किंवा (खनिज) तांब्यावर हीण धातूचा थर प्रारंभापासूनच असतो त्याप्रमाणे जीवाच्या दृक् व क्रियाशक्ती या अनादी मलाने प्रारंभापासूनच झाकल्या जातात (**तुषकम्बुकवज्ज्ञेयस्ताम्राश्रित-कालिमावद् वा** – तप्र. १-१७). साधना (चर्या) पालनाने ईश्वरी कृपा होते व त्यामुळेच या मलाचा परिपाक होऊन तो नष्ट होतो. ईश्वराद्वयवादी काश्मीरी शैव याला 'आणव' मल म्हणतात. पण याच्यामुळे 'पशुत्व' (पाशबद्धता) प्राप्त होत असल्यामुळे याला 'पशुत्व' मल म्हणतात. कर्म आणि माया हे पाश नाहीसे झाले

---

६५. **परिपक्वमला ये तानुत्सादनहेतुशक्तिपातेन ।**
**योजयति परे तत्त्वे स दीक्षायाऽचार्यमूर्तिस्थः ।**–भोजदेव, तप्र. १.१५.

६६. **बद्धाञ्छेषानखिला विनियुङ्क्ते भोगभुक्तये पुंसः । तत्कर्मणानुगमात्–**
—तप्र. १.१६.

६७. तप्र. १.१७ तादी (तात्पर्यदीपिका) व्याख्या

६८. **एको ह्यनेकशक्तिर्दृक्क्रिययोश्छादको मलः पुंसाम् ।**–तप्र १.१७.

तरी हा पाश उरतो व या पाशांनी बद्ध असले तरी यातील प्रगत जीवात्म्यांना विश्वनिर्मिती इ. विषयक अधिकार शिवकृपेने मिळत असल्यामुळे याला 'अधिकार–मल' असे नाव आहे. अशाच प्रगत जीवात्म्यांना भगवान् शिव अनंत, सूक्ष्म, शिवोत्तम, त्रिमूर्ती इ. अधिकारपदे देतो.

## (२) कर्म

कर्म-पाशाचे लक्षण भोजदेवाने 'अनादी, धर्मा-धर्मात्मक व विविध फलदेणारा'[६९] असे केले आहे. कर्म हे बीजांकुराप्रमाणे प्रवाहरूपाने अनादी आहे. एकच कर्म अनादी व कायम नसते. कारण तसे असेल तर त्याला नित्यत्व येऊन मोक्ष अशक्य होईल.[७०] कर्म हे 'धर्म' व 'अधर्म' अशा स्वरूपाचे द्विविध आहे. त्यापैकी 'धर्म' हा नित्य, नैमित्तिक व काम्य असा तीन प्रकारचा आहे. 'यावज्जीव अग्निहोत्र पाळावे' अशा स्वरूपाचा नियम घालून केलेले धर्म्य कर्म हे 'नित्य' आहे. काही विशिष्ट निमित्ताने केले जाते ते नैमित्तिक कर्म. उदा. मुलगा झाल्यावर करावयाची इष्टि. आणि विशिष्ट कामना धरून तत्प्रीत्यर्थ केलेले कर्म ते काम्यकर्म उदा. 'स्वर्गाची इच्छा असणाराने ज्योतिष्टोम यज्ञ करावा.'[७१] कुमाराने आपल्या कालानुरूप 'नित्य', 'नैमित्तिक' व 'काम्य' या कर्मांची उदाहरणे वर दिलेली असली तरी त्याचे वर्गीकरण स्पष्ट आहे. तो या धर्म कर्मांचे (१) सविद्य (ईश्वरस्मरणपूर्वक केलेले) व (२) केवल (ईश्वरस्मरण रहित) असे भाग पाडतो. या धर्म (कर्मांचे) इष्ट व पूर्त असेही वर्गीकरण केले असून कुमारमते वैदिक कर्म ते इष्ट व तंत्रग्रंथात सांगितलेले ते 'पूर्त'[७२] (तप्र, पृ. ५९) असे दिसते.

प्रतिषिद्ध कर्मे करणे (उदा. दारू पिऊ नये असा प्रतिषेध असला तरी दारू पिणे), नित्य व नैमित्तिक कर्मे न करणे असा त्रिविध 'अधर्म' आहे.

भोजदेवमते धर्म आणि अधर्म अशी दोन्ही कर्मे बंधनकारक म्हणजे पाश आहेत व तो पाश स्वर्ग, नरक इ. चित्रविचित्र फले देतो. सिद्धांतहृदयकाराने म्हटले आहे :

---

६९. **कर्मानादि प्रोक्तं धर्माधर्मात्मकं विचित्र च ।** –तप्र. १.१८.

७०. **तथा (=एकस्यैव कर्मणः सर्वदावस्थानेन) सति भावरूपस्य कर्मणोऽनादित्वेनात्मवन्नित्यतया निर्मोक्षप्रसङ्गात्** । –तप्र. १.१८ कुमार व्याख्या पृ. ५८.

७१. तप्र. १.१८ कुमार टीका पृ. ५९ कुमारदेवाने केलेले हे विवेचन 'सिद्धान्त हृदय' या ग्रंथाधारे केले असून त्याचे एक मोठे अवतरण (९ श्लोक) त्याने आपल्या टीकेत घेतले आहे. ग्रंथसंक्षेपासाठी मी ते उद्धृत केले नाही.

७२. स्मृतिग्रंथाप्रमाणे (अत्रि. ४४) वापी, कूप, तडाग, देवळे बांधणे व अन्नदान करणे हे 'पूर्त' असून (लिखित. ५ व अत्रि. ४३ प्रमाणे) अग्निहोत्र, तप, वेदपालन, आतिथ्य व वैश्वदेव या कर्मांना 'इष्ट' म्हणतात.

"'कर्म' नावाचा महापाश असून प्राणी त्यातून सुटणे कठीण असते. कारण तो (दोरीने बांधलेल्या) जनावराला इकडून तिकडे फरफटत नेतात त्याप्रमाणे जीवांना फरफटत नेतो.'[७३] नीतिशास्त्राच्या दृष्टीने या संकल्पनेला महत्त्व आहे. कर्मामुळे प्राण्यांची योनी (देव, मनुष्य, तिर्यक् इ.), घराणे, जन्म, शरीर, इंद्रिये, विषयप्राप्ती इ. सर्व गोष्टी निश्चित होत असल्यामुळे व प्रलयावस्थेमध्ये सुद्धा कर्मे नष्ट न होता प्रलयकालानंतर विश्वाची पुनः उत्पत्ती होताना त्या त्या जीवाशी ती ती कर्मे संलग्न होत असल्यामुळे कर्माला महापाश का म्हटले आहे हे लक्षात येईल.

## (३) माया

सिद्धांतशैवमते माया ही विश्वाचे उपादान कारण आहे. म्हणून ती वास्तव आहे व नित्य आहे.[७४] विश्व हे अचित् (जड) आहे. त्याचे उपादान कारण चित्-स्वरूप असणारा शिव असू शकणार नाही. त्यामुळे जड (अचित्) असलेली माया विश्वाचे उपादान मानणे तर्कसंगत होईल. त्याचबरोबर हेही खरे की माया ही अचित् असल्यामुळे चित्स्वरूप परमेश्वराचे अधिष्ठानाशिवाय केवळ ती (माया) विश्वोत्पत्ती करू शकत नाही व चेतन (चिद्वस्तु) असलेला महेश्वरसुद्धा मायेशिवाय विश्व निर्माण करू शकत नाही. शिव व माया यांचे एकत्रीकरण (संसृष्टि) हे विश्वाचे मूल कारण आहे.[७५] हा सत्कार्यवाद वेदान्ताला अमान्य आहे सिद्धांतशैव म्हणतात की माया 'अ–सत्' आहे हे खरे आहे, पण 'अ-सत्' म्हणजे 'अस्तित्वात नसलेली' असा शांकराद्वैताप्रमाणे अर्थ नसून 'सत्' जो शिव त्यापेक्षा माया भिन्न आहे, असा आहे. सिद्धांतशैव त्यापुढे जाऊन म्हणतात की केवळ माया नव्हे तर मायेचे कार्य असलेले हे विश्वही वास्तव (वस्तुरूप) आहे. प्रपंच मिथ्या नाही.

'मा–या' शब्दाचा अर्थ 'ज्याच्यात सर्व विश्व विलीन होते (मा–) आणि ज्याच्यापासून विश्वोत्पत्ती होते (या) ते तत्त्व.[७६] मायेमुळे पशूला (जीवाला)

---

७३. कर्माख्योऽयं महापाशो दुर्मोचस्तेन जन्तवः ।
इतस्ततः समाकृष्य नीयन्ते पशवो यथा ॥
तप्र. १.१८ टीका (पृ. ६० वरून उद्धृत)

७४. माया च वस्तुरूपा मूलं विश्वस्य नित्या सा । –तप्र. १.१८.

७५. माया तावन्न परमेश्वराधिष्ठिता जडा जगदुपादानं भवति । महेश्वरश्चेतनोऽपि न मायां बिना विश्वमूलतां भजते, निर्व्यापारोदासीनमात्रत्वादिति तयोः संसृष्टयोरेव जगन्मूलत्वम् –तप्र. पृ. ६२.

७६. 'माया चेति' (टोप १ मधोल) चशब्देन मायाकार्यस्य विश्वस्य वस्तुरूपत्वमुपवर्णितम् । –तप्र. पृ. ६२
माया वस्तुरूपा शिवरूपा तत्का (र्यत्वं–यँ) च जगच्छिवरूपम् ।
—तप्र. पृ. ७१–७२.

शरीर (तनु), इंद्रिये (करण), भुवन व भोग्य विषय मिळतात. माया अचित् असली तरी शिवाच्या चिच्छक्तीमुळे ती विश्वोत्पत्ती करते. पण ती मोहाचे कारण असल्यामुळे 'माया' नामक बंधन मानले आहे. (**मोहहेतुत्वाद्विपरीतप्रतिपत्तिहेतुना मायाख्येन बन्धनेन** भाव्यम्–रत्नत्रय ८५–भास्करीतून उद्धृत)

सिद्धांतशैवमतात माया दोन स्वरूपाची मानली आहे. कार्म व आणव मलांनी स्पृष्ट नसलेली ती 'शुद्ध माया' अथवा 'महामाया' आणि या मलांनी युक्त असलेली अशुद्ध माया. शिव आपल्या इच्छा, ज्ञान व क्रिया या शक्तींनी शुद्धमायेकडून नाद, बिंदू, सादाख्य, माहेश्वरी व शुद्ध विद्या निर्माण करवतो. यापैकी नाद हे शिवतत्त्व असून बिन्दू हे शक्तितत्त्व आहे. शुद्ध मायेवरील (शिवाच्या) ज्ञानशक्तीच्या प्रभावामुळे नादाची निर्मिती होते आणि क्रियाशक्तीच्या नादावरील परिणामामुळे बिन्दू निर्माण होतो. ज्ञानशक्ती व क्रियाशक्ती यांचा समप्रमाणात परिणाम झाल्यास सादाख्याची निर्मिती होते. क्रियाशक्ती ज्ञानशक्तीपेक्षा अधिक प्रभावी-परिणामकारक झाली तर माहेश्वरी तत्त्व विकसित होते. आणि माहेश्वरीतत्त्वावर ज्ञानशक्तीचा प्रभाव अधिक पडल्यास शुद्धविद्येची उत्पत्ती होते. शुद्ध मायेपासून निर्माण होणाऱ्या या तत्त्वांना 'शिवतत्त्वे' किंवा 'प्रेरक काण्ड' म्हणतात.

सिद्धांतशैवांची वरील पाच तत्त्वे काश्मीरी शैवमतातील (१) शिव, (२) शक्ती, (३) सदाशिव, (४) ईश्वर व (५) विद्या यांच्यासारखी वाटली तरी त्यातील मूलभूत फरक असा की ते (शिवाद्वयवादी काश्मीरी तत्त्वज्ञ) शिव हे विश्वाचे उपादानकारण व निमित्तकारण आहे असे मानतात.

सिद्धांतमते शुद्ध मायेपासून परा, पश्यन्ती, मध्यमा व वैखरी या नादांची (वाणींची) उत्पत्ती झाली. नादांना (ध्वनींना) जो अर्थ प्राप्त झाला व ज्याला वैयाकरण 'स्फोट' म्हणतात, ती शक्ती नादतत्त्वात असते व शुद्धमायेचा तो आविष्कार अथवा परिणाम आहे.

उरलेली इतर तत्त्वे 'अशुद्ध माये'पासून निर्माण झाली असून त्यांची उत्पत्ती 'सदाशिव' किंवा 'रुद्र' यांच्यामुळे झाली. उदाहरणार्थ सदाशिव आपल्या शक्तीने अशुद्ध मायेपासून काल, नियती (destiny) व कला ही तत्त्वे निर्माण करतो व कलातत्त्वापासून विद्या (ज्ञान) व राग (आसक्ती) निर्माण होतात. या कालादी पाच तत्त्वांना आत्म्याची (जीवाची) पाच कंचुके मानली आहेत. या कंचुक–पंचकांनी युक्त आत्मतत्त्व 'पुरुष'तत्त्व या संज्ञेने संबोधले जाते. 'प्रकृति–तत्त्व' हे रुद्रामुळे कलातत्त्वापासून झाले आहे पंचकंचुके, प्रकृती व पुरुष यांना 'विद्यातत्त्व'ही म्हणतात आणि यांपासून भोग निर्माण होत असल्यामुळे यांना 'भोजयितृ–काण्ड' अशी संज्ञा आहे. शुद्ध मायेपासून निर्माण होणारे 'प्रेरक–काण्ड' यापासून भिन्न आहे.

अव्यक्तावस्थेतील प्रकृतीपासून चित्त व बुद्धी निर्माण होतात. अहं–कार (मी–त्व) हा बुद्धीचा विकार (evolute) आहे. सत्त्व, रजस् व तमस् यापासून

होणाऱ्या अहंकाराला सिद्धांती शैव अनुक्रमे तैजस, वैकृत व भूतादी म्हणतात, पण सांख्यमते 'तैजस' हा रजोगुणापासून होतो व 'वैकृत' हा सत्त्वगुणापासून निर्माण होतो. सिद्धान्तशैवमते तैजस अहंकारापासून मन व ज्ञानेंद्रिये निर्माण होतात. वैकृत अहंकारापासून कर्मेंद्रिये निर्माण होतात व भूतादी अहंकारापासून तन्मात्रे (सूक्ष्म भूते) व तन्मात्रांपासून महाभूते निर्माण होतात. सारांश मायेपासून होणारी ३६ तत्त्वे पुढीलप्रमाणे मांडता येतील :




७७. हिस्ट्री ऑफ फिलॉसॉफी, ईस्टर्न अँड वेस्टर्न, खंड १ मधील टी. एम्. पी. महादेवन् यांच्या 'शैवसिद्धान्त' लेखाधारे.

## (४) निरोध किंवा तिरोधान

भोजदेवाने मल, कर्म व माया यांचे विवेचन केल्यानंतर असे सांगितले आहे की, हे पाश स्वतः अचेतन असल्यामुळे जीवात्म्याला ते आपण होऊन बंधन करू शकत नाहीत तर परमेश्वराने त्यांचे ठिकाणी स्वतःच्या शक्तीचा 'आवेश' करून त्यांना कार्यप्रवण करावे लागते. या परमेश्वरी शक्तीच्या प्रेरणेने या पाशाकडून पुरुषाचे किंवा जीवात्म्याचे ठिकाणी असलेले ज्ञान किंवा दृष्टी मर्यादित होते. तेव्हा पाशांच्या ठिकाणी बंधन शक्ती करून पुरुषाचे ज्ञान किंवा दृष्टी झाकणारी (पुरुषतिरोधायिका) परमेश्वरी शक्ती ह्या एका अर्थी पाशच ठरतो. अशा रीतीने सिद्धांतशैवमतात चार पाश मानले आहेत.[७८]

पाशांची व्याख्या व परिगणना करताना[७९] 'मल, कर्म, माया, माया निर्मित जग व तिरोधानकरी (पुरुषाचे मूळज्ञान–दृष्टयादी सामर्थ्य झाकणारी शक्ती) हे 'अर्थपंचक' पाश आहेत असे मागे (तप्र. पृ. ३२) म्हटले असताना चारच पाश कसे हा प्रश्न उपस्थित करून टीकाकार म्हणतो की स्थूल माया (जगत्स्वरूप) व सूक्ष्ममाया मिळून शेवटी माया ही एकच बंधकतत्त्व ठरते. त्यामुळे चारच पाश मानणे सयुक्तिक आहे.[८०] अर्थात हे केवळ समर्थनच आहे.

### मोक्ष

आतापर्यंत वर्णन केलेल्या पाशांपासून मुक्तता कशी होणार ? सिद्धान्तमते चर्या, क्रिया, योग व ज्ञान या मार्गांनी पशूची पाशांपासून मुक्तता होते. या मार्गांना अनुक्रमे 'दास' (=दासमार्ग), 'सत्पुत्र', 'सखा' व सत्' अशा संज्ञा आहेत. शिवमंदिरांची झाडलोट करून स्वच्छता ठेवणे, शिवमूर्ती किंवा लिंग यांचे पूजन करणे, ईश्वराची संगीतद्वारा सेवा करणे किंवा शिवभक्तांची सेवा, देखभाल करणे ही सर्व 'दासमार्गामध्ये' किंवा चर्येत येतात. यापुढील पायरी क्रियामार्गाची. यामार्गाने भक्त देवाशी पुत्रत्वाचे नाते प्रस्थापित करतो. तो दासाप्रमाणे शिवाची बाह्य सेवा करीत असला तरी त्याचे दासापेक्षा अधिक जिव्हाळ्याचे संबंध किंवा प्रेम निर्माण झालेले असते. यानंतरची पायरी योगाची. यात जीवात्मा, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी यांच्या द्वारा जीव शिवाशी सख्यत्वाचे संबंध जोडतो.

चर्या, क्रिया व योग यांच्यामुळे शिवाशी अनुक्रमे सालोक्य, सामीप्य

---

७८. पाशानुग्राहित्वात् पुरुषतिरोधायिका विभोः शक्तिः।
पाशत्वेनाभिहिता पाशाश्च चतुर्विधास्त्वेवम् ॥ –१.१९.

७९. मलं कर्म च माया च मायोत्थमखिलं जगत् ।
तिरोधानकरी शक्तिरर्थपञ्चकमुच्यते ।। अर्थपञ्चकं पाशः । तप्र. पृ. ३३.

८०. स्थूलसूक्ष्मविभागेनोक्ताया मायाया एकत्व-विवक्षया चातुर्विध्याभिधानादिति।
–तप्र. कुमारटीका पृ. ७३.

व सारूप्य यांची प्राप्ती होत असली तरी शिवाशी सायुज्यता किंवा शिवत्व मिळविण्यासाठी आणव मल साफ होणे जरूर असते व आणव-मलाच्या नाशासाठी ज्ञानाची किंवा 'सत्' नामक मार्गाची आवश्यकता असते. ही या मार्गावरील शेवटची पायरी आहे.

तामिळी शैवसिद्धांतात ही पारमार्थिक प्रक्रिया पुढीलप्रमाणे होते, असे म्हटले आहे: प्रथमतः मोक्षदृष्टचा धर्म व अधर्म हे दोन्ही बंधनकारक आहेत हे जाणून धर्म व अधर्म या दोन्ही तऱ्हेच्या कर्मांना सारखेच लेखण्याची वृत्ती बाणवून घेणे. याला तामीळमध्ये 'इरुविनैयोप्पु' (iruvinaiyoppu) म्हणतात. ही वृत्ती अंगी बाणली म्हणजे मल–परिपाक होऊन अशुद्ध माया किंवा पाशज्ञान व पशुज्ञान यांच्याशी त्याला कर्तव्य राहात नाही. तो परमेश्वरध्यानात मग्न होऊन जातो व त्यावर ईश्वरीकृपा होते. या ईश्वरीकृपाप्राप्तीस 'शक्ति–निपात' म्हटले आहे. जीवावर (पशूवर) अशी कृपा झाल्यावर पुढे त्याला शिवदर्शन होते व भगवान् शिव त्याला मोक्षदायक ज्ञान देतो. या ज्ञानमार्गामधील ईश्वरी अनुग्रह असलेल्या अवस्थेस शुद्ध–अवस्था अथवा 'अरुळ्' (Arul) म्हणतात. तमोमय केवलावस्था किंवा 'इरुळ्' (Irul) व सकलावस्थेतील जीवाच्या विकल्पमय ज्ञान किंवा 'मरुळ' (Marul) या दोन्ही अवस्थांपेक्षा 'अरुळ्' ही निराळीच आहे. शुद्धावस्थेतील जीव 'विज्ञानकल' असून भगवान् शिव त्याचे समोर प्रकट होतो पण 'सकल' अवस्थेतील जीवांना तो (शिव) मानवी गुरूंच्या रूपात दर्शन देऊन अनुग्रह देऊन स्पर्श करून किंवा केवळ दृष्टिपाताने दीक्षा देतो व जीवाचा मल नाहीसा करून त्यालां शिवत्व देतो. 'शिवत्वप्राप्ती' म्हणजेच मोक्ष होय. हा मोक्ष – ही जीवन्मुक्तावस्था प्राप्त झाली तरी प्रारब्ध कर्म भोगावेच लागते. फक्त त्याचा मोक्षावर काही अनिष्ट परिणाम होत नाही.

भोजदेवानेसुद्धा 'भगवान शिव ज्यांचा मल परिपक्व झालेला आहे त्यांच्या संसाराचा नाश (=मोक्षप्राप्ती) होण्यासाठी शक्तिपात करून आचार्यरूपाने दीक्षा देतो व परतत्त्वाचे ठिकाणी त्याची योजना करतो' असे म्हटले आहे.[८१]

या ठिकाणी इतर तत्त्वप्रणालीतील मोक्ष कल्पनांचा विचार करणे उद्बोधक

---

८१. **परिपक्वमला ये तानुत्सादनहेतुशक्तिपातेन ।**
**योजयति परे तत्त्वे स दीक्षयाचार्यमूर्तिस्थः** । –तप्र. १.१५ पृ. ५३.
टीकाकाराने शिवाच्या 'बंधकरा' व 'मुक्तिदायिनी' अशा दोन शक्ती मानल्या जाहेत. पहिल्या शक्तींने तो जीवाला पाशबद्ध करतो व दुसऱ्या शक्तीने तो मुक्त करतो असे म्हटले आहे. तप्र पृ. ५४

ठरेल. शांकरवेदांतात कैवल्य म्हणजेच मोक्ष.[८२] कैवल्यावस्थेत माया व कर्म नाहीसे होतात. पण सिद्धांतशैवमते त्या अवस्थेत आणव मल नाहीसा होत नाही. म्हणून कैवल्यावस्थेत सर्वज्ञता असते का याबद्दल वेदांतात मौन पाळले आहे. शांकरवेदांतात सच्चिदानंदस्वरूपी आत्म्यापेक्षा भिन्न व आत्म्याव्यतिरिक्त इतर वस्तूला व जगाला अस्तित्वच नाही, असे मानतात. सिद्धांतशैव विचारतो की जग किंवा संसार अस्तित्वात नसेल तर मोक्ष अन् ब्रह्म सुद्धा मायिक व अस्तित्व-शून्य ठरेल. दुसरा मुद्दा असा की, वेदांत विषयिन् (subject) व विषय (object) यांच्या मधील द्वैत नाकारतो व अद्वैती चिद्विलासवाद (monestic idealism) मानतो. हे खरे असेल तर ध्यान किंवा उपासना यांचा पुरस्कार करणारे ग्रंथ लटके ठरतील. कारण ध्येय व ध्याता भिन्न असल्याखेरीज ध्यान अशक्य आहे. 'एकं सत्' हे उपाधीमुळे 'बहुधात्व' पावत असेल तर उपाधीला सत्यत्व येते व 'अद्वैत' संपते. म्हणून सिद्धांतशैवमते ईश्वर व जीव (आत्मा) भिन्न मानले पाहिजेत व ते परस्परांना ज्ञेय आहेत असे गृहीत धरले तरच ईश्वर किंवा ब्रह्म 'सर्वज्ञ' आहे असे म्हणता येईल व मतासाठी उपासना, ध्यान इ. ची उपयुक्तता वर्णन करणारे ग्रंथ विश्वसनीय ठरतील.

वेदांतमते 'मल' म्हणजे 'अज्ञान'. ज्ञानसूर्याचा उदय होताच ते नाहीसे होते. जसे 'हा शिंपला आहे' हे ज्ञान झाल्याबरोबर शिंपल्याचे ठिकाणी 'रुपे वाटणे' हे अज्ञान नाहीसे होते किंवा 'दोरी आहे' हे ज्ञान होताच तिच्यावर झालेला सापाचा आभास व भीती नाहीशी होते.

## मोक्ष कल्पना

सिद्धांतशैवमतात मोक्ष दोन प्रकारचा मानला आहे : (१) पर किंवा श्रेष्ठ व (२) अपर. जेव्हां सर्व मलांचा परिपाक (क्षय) होऊन जीवाच्या ज्ञान व क्रिया या शक्तींचा जेव्हा संपूर्ण विकास होतो व त्याला शिवसाम्य प्राप्त होते, त्या अवस्थेला पर-मोक्ष असे म्हणतात. ही अवस्था परमशिवाच्या अनुग्रहाने-शक्तिपाताने-साध्य होते मंत्र, महेश्वर इ. उच्च कोटीतील जीव हा मोक्ष साधतात. परंतु ज्या जीवांचे माया व कर्म हे मल संपूर्ण नाहीसे झाले असले तरी पशुत्व (आणव) मल

---

८२. तन्वात्मनां कैवल्यमेव श्रेय इति...प्रसिद्धम् ।-रत्नत्रय ८८.
वेदान्ते तावत् सच्चिदानंदलक्षणमात्मानमन्तरेण न वस्तु किञ्चिदभ्युपगम्यते ।

काहीसा शिल्लक राहिला आहे व त्यामुळे ज्यांचे केवळ 'बैंदव' (बिंदु[८३] निर्मित) शरीर असते अशा जीवांना भगवान् शिव विद्या-विद्येश्वरादी अधिकार देऊन सर्जनाचे (विश्वोत्पत्तीचे) काम देतो. अशा जीवांना अपरमोक्ष मिळतो.[८४]

## समालोचन

काश्मीरी सिद्धांतशैव ग्रंथकार, भोजदेव व तामिळी शैवसंत यांच्या तत्त्वज्ञानामध्ये तपशिलात काही फरक असले तरी त्यांच्या स्वरूपात स्थूलमानाने पुष्कळच साम्य आहे. परमशिवसंकल्पना, सांख्यांच्या चोवीस तत्त्वांत सात मिश्र तत्त्वांची (**भोजयितृ-काण्ड**) व पाच शुद्धतत्त्वांची (**प्रेरककाण्ड**) भर घालून मानलेली ३६ तत्त्वे, मलकल्पना, अनुग्रह अथवा शक्तिपाताचे महत्त्व, जीवन्मुक्तीची कल्पना इ. मूलभूत आराखडा समान आहे. परमशिव हा विश्वाचे निमित्त कारण आहे, माया किंवा प्रकृती हे उपादान कारण आहे, असे म्हणायचे व त्याचबरोबर माया ही 'पतीची, शिवाची परा, सूक्ष्म शक्ती द्योतनक्षम आहे' (**पत्युः शक्तिः परा सूक्ष्मा जाग्रतो द्योतनक्षमा**[८५] कुमारदेवटीकेत मातंग-परमेश्वरातून उद्धृत), 'शिव' संज्ञा असलेले वस्तुतः एकच तत्त्व शेकडो विविध शक्तींनी युक्त आहे व शक्ति-भेदामुळे त्याच्यात भेद मानले गेले आहेत[८६] असेही म्हणायचे. यातील विसंगती त्यांना जाणवत नाही. कुमारदेव अद्वैताकडे कललेला टीकाकार मानला[८७]

---

८३. बैंदव शरीर–बिंदूपासून झालेले, बिंदुमय शरीर. सिद्धांतशैवमतात शिव किंवा बिंदू हे पहिले तत्त्व आहे. हा शिव परमशिवाच्या खालच्या पायरीवरील आहे. कारण परमशिव ३६ तत्त्वांचे पलिकडे आहे. बिंदू हे विश्वाचे उपादान कारण असून त्याला महामाया असेही म्हणतात. (**एवंभूतमुपादानरूपं महामायाख्यं शिवतत्त्वमाचार्या जगदुरिति**।–तप्र. २२.
**शिवतत्त्वं बिन्द्वात्मकमाद्यं प्रधानमुपादानं स्मरन्ति पूर्वाचार्याः। परमोपादानत्वेनैव चास्य मायावन्नित्यत्वं सिद्धमित्युक्तम् अतश्चान्यानि चत्वारि तानि कार्याणि भवन्ति**। तप्र. २६) शिवतत्त्व नित्य असून त्याच्यापासून शक्ति, सदाशिव, ईश्वर व विद्या ही कार्ये (तत्त्वे) उत्पन्न होतात.

८४. **अत एव मायोत्तीर्णत्वान्मलरहितत्वाच्च विद्याविद्येश्वरप्राप्तेरपरमुक्तित्वम्**। –तप्र.

८५. पृ. ७९

८६. **तत्त्वं वस्तुत एकं शिवसंज्ञं चित्रशक्तिशतखचितम्। शक्तिव्यापृतिभेदात् तस्यैते कल्पिता भेदाः**।—तत्त्वप्रकाश १.१३.

८७. पण त्याच्यापूर्वी सूतसंहितेत (४.२८) शिवाद्वैत मत मांडले गेले आहे.

तरी द्वैतभक्तीतून अद्वैताकडे जाणाऱ्या मराठी संतांप्रमाणे तामिळ शैवसंत उत्कट भक्तीत वाहून जातात तेव्हा भारतीय मनाला अद्वैताची ओढ आहे असे म्हणावेसे वाटते. मग तो 'अद्वैत' शब्दावर श्लेष कसेही बसवो.[८८]

प्राचीन तत्त्वप्रणालीशी तुलना करताना पुढील प्रमाणे या मतात काही ठळक विशेष आढळतात. उदाहरणार्थ, सांख्यांच्या प्रमाणे हे तत्त्वज्ञान २४ तत्त्वे मानते पण त्यांना 'भोग्य' किंवा 'अशुद्ध' म्हणून आणखी बारा काल्पनिक (mythical) तत्त्वांची ते भर घालते.

सांख्यमते आत्मा किंवा पुरुष मूलत: शुद्ध आहे, पण सिद्धांतशैवमते तो अनादि मलयुक्त आहे म्हणून तो उपभोगार्थ प्रवृत्त होतो. उपभोगप्रवृत्ती आत्म्यामध्ये स्वाभाविक मानली तर ती मुक्तावस्थेतील आत्म्यात का नसते ? जर ही प्रवृत्ती रागा (आसक्ती) मुळे असेल तर मलयुक्त पुरुषाबरोबर आसक्ती किंवा राग संभवतो त्यामुळे आत्मा हा अनादी मलयुक्त असला पाहिजे.

या मताची 'भोग' विषयक कल्पना सांख्यांच्यापेक्षा भिन्न आहे. भोगकल्पनेचे विश्लेषण केल्यास त्या प्रक्रियेत पुढील घटक आढळतात :

(१) आतून पुरुषप्रतिबिंब बुद्धीवर पडणे.
(२) बाह्यवस्तूचे प्रतिबिंब बाहेरून बुद्धीवर पडणे.
(३) आंतर व बाह्यप्रतिबिंबाची ग्राहकबुद्धी.
(४) पुढील प्रक्रिया घडविणारा अहंकार:
 (अ) पुरुषप्रतिबिंब व बाह्यवस्तुप्रतिबिंब यांचे एकत्रीकरण.
 (आ) पुरुषप्रतिबिंब व पुरुष यांचे अभिनिर्धारण किंवा अभिज्ञान (identification)
 (इ) 'मी जाणतो' या जाणिवेचा (consciousness) उदय.

बुद्धीत आतून पडलेले पुरुषाचे प्रतिबिंब व बाह्यवस्तूचे बाहेरून पडलेले प्रतिबिंब यांचे अहंकाराकडून एकत्रीकरण झाल्यावर, दोन्ही प्रतिबिंबांचे मीलन झाल्यामुळे झालेले प्रकाशन अथवा जाणिवेची प्रक्रिया व तिचे फलस्वरूपज्ञान.

पुरुष आणि त्याचे प्रतिबिंब यातील भिन्नता किंवा फरक लक्षात न येता 'मी जाणतो' ही अहंकारप्रणीत जाणीव तिला 'भोग' म्हणतात हा बुद्धीच्या पातळीवर अहंकारप्रेरित झालेल्या दोन प्रतिबिंबांच्या मीलनातून पुरुषाच्या प्रतिबिंबाच्या आधारावर (sub-stratum) वर होत असतो.

परंतु सिद्धांतशैवमते 'भोग' म्हणजे वेदनक्षम (sentiment) पुरुषाला बाह्य सुखदु:खांमुळे बुद्धीमध्ये होणाऱ्या विकारांची अथवा परिणामांची (modification)

---

८८. 'अ-द्वैत' म्हणजे दोन वस्तूंचा अभाव नसून दोन वस्तूतील द्वैताचा अभाव.

जाणीव. त्यामुळे पुरुषामध्ये विकारनिर्मिती होत नाही. ज्याप्रमाणे आकाशातील चंद्राचा व पाण्यातील चंद्रप्रतिबिंबाचा जितका किंवा जसा संबंध असतो तसा या 'भोग' संवेदनेत पुरुष आणि विकारयुक्त बुद्धीत असतो. वेदनक्षम पुरुष हा भोक्ता आहे. म्हणून कर्ता आहे. बुद्धी ही अचेतन, संवेदनशून्य असल्यामुळे ती कर्त्री मानता येत नाही.[८९]

## वैशेषिक मत व सिद्धांतशैवमत

सांख्याप्रमाणे दुसरे प्राचीन मत वैशेषिकांचे. वैशेषिक असत्कार्यवादी आहेत. पण सिद्धांतशैवमत सत्कार्यवादी आहे. 'सत्कार्यवाद' म्हणजे कार्य (effect) हे प्रत्यक्ष उत्पन्न होण्यापूर्वी या ना त्या स्वरूपात अस्तित्वात (सत्) असते. माया ही काही अंशी (**घृतकीटकन्यायन**) कला इ. मध्ये विकसित (evolve) होते.

सिद्धांतशैवमते काल हा त्रिविध (भूत, वर्तमान व भविष्य) असा त्रिविध स्वरूपाचा व अचेतन आहे. त्याच्या या दोन्ही गुणांमुळे त्याचे अनित्यत्व सिद्ध होते. पण वैशेषिक काल नित्य मानतात.

सिद्धांतशैवमते कर्म हा बुद्धीचा गुण आहे. वैशेषिक मानतात तसा तो आत्म्याचा गुण मानल्यास कर्म जसे अनित्य (बदलते) आहे, तसा आत्मा अनित्य आहे असे मानावे लागेल.

वैशेषिक मतांत आकाश वस्तुजाताला अवकाश (जागा) देते व शब्द हा आकाशाचा गुण आहे असे मानतात पण तो गुण इतर महाभूतांतही असल्यामुळे तो फक्त आकाशाचाच गुण आहे (**आकाशैकगुणः** शब्दः), असे मानणे अयुक्त आहे.

## पाशुपत मत व सिद्धांतशैवमत

सिद्धांतशैवमतातील परिभाषा वेगळी असेल पण सिद्धांतशैवमताने पाशुपतांची उसनवारी केली असे न म्हणता त्यांच्यात काही महत्त्वाचे बाबतीत साम्य आहे, असे म्हणावे. उदाहरणार्थ, लकुलीशाने 'कारण' ज्या 'अर्थाला' म्हटले आहे त्याला सिद्धांतशैव (व इतर शैवमते सुद्धा) 'पति' म्हणतात.

दुसरा महत्त्वाचा भेद मोक्ष कल्पनेबद्दलचा मानतात. त्यांच्या मते पाशुपतांची 'दुःखान्त' म्हणजे मोक्ष ही अभावात्मक कल्पना आहे. पण त्या प्रकरणात दाखवल्याप्रमाणे पाशुपतांची 'दुःखान्त' ही कल्पना सिद्धांतशैवाप्रमाणे भावात्मक (positive) आहे. नुसता दुःखान्त म्हणजे पाषाणावस्था अशीच टीका पाशुपतांनी केली आहे.

---

८९. **अतो भोक्तृत्वाच्चेतनस्य पुरुषस्यैव कर्तृत्वं नाचेतनानां भोग्यानां बुद्ध्यादीनामिति ।**–सद्योज्योतिकृत भोगकारिका ३९, पांडे उद्धृत.

## शांकर वेदान्त व सिद्धांतशैवमत

या दोन्ही मतांची तुलना वर त्या त्या स्थळी केली आहे.
याशिवाय आणखी काही मुद्दे :

(१) शांकर वेदान्तात जीव व ब्रह्म एकरूप मानले आहेत (**जीवो ब्रह्मैव नापरः**) सिद्धांतशैवमतात आत्मे (जीव) अनेक आहेत व ते (शिवापेक्षा) भिन्न आहेत. ते कर्मभोग व मोक्ष या बाबतीत शिवाच्या अनुग्रहावर अवलंबून असतात.

(२) वेदान्ती ब्रह्म हे विश्वाचे उपादन कारण व निमित्तकारण मानतात. कार्य व कारण समानधर्मी असतात. जर ब्रह्मापासून विश्व–चित् व अचित् हे दोन्ही निर्माण होतात असे मानले तर ब्रह्म हे चित् व अचित् मानावे लागेल अन् ब्रह्म अचित् किंवा जड आहे असे मान्य करावे लागेल.

अद्वैतमते ब्रह्मज्ञान हे मोक्षाचे कारण (हेतु, साधन) आहे. पण शुद्ध अद्वैतात साध्य व साधन हे द्वैत कसे बसेल ?

इतर मुद्द्यांचा ऊहापोह वर केला आहे. सिद्धांतशैवमत तामिळ नाडूमध्ये अद्याप प्रभावी आहे.

प्रकरण ४ थे

# शैवविशिष्टाद्वैत

## ग्रंथसंक्षेप

प्रास्ताविक – आगम व 'औपनिषदी मीमांसा' (ब्रह्मसूत्र) यांचे तत्त्वज्ञान एकच व ते शैव विशिष्टाद्वैती आहे हे श्रीकण्ठांनी ब्रमीभा. (ब्रह्ममीमांसाभाष्यात) दाखवले– श्रीकण्ठाविषयी ऐतिहासिक माहिती नाही– त्यांचा काळ इ. स. १२००–१३०० केवळ अंदाज– श्रीकण्ठ स्वतंत्र प्रज्ञेचे भाष्यकार– विशिष्टाद्वैती म्हणून रामानुजांशी साम्य स्वाभाविक पण अनेक ठिकाणी त्यांनी रामानुजांपेक्षा भिन्न व शंकराचार्यांसारखे आणि कित्येकदा दोघांपेक्षा भिन्न अर्थ केले आहेत. उदाहरणे – इतर शैवांप्रमाणे ते पति, पशु व पाश हे त्रिक मानतात पण 'पति' विषयक कल्पना (१) पति = ब्रह्म = स्थूल सूक्ष्मचिदचित् प्रपंच निविष्ट–पतीच्या (शिवाच्या) अभिधानांचे स्पष्टीकरण - त्यांची पंचकृत्ये–माया व इतर शक्ति–उपादान कारण व निमित्त कारण—वैषम्यनैर्घृण्य नाही– कर्मविपाकामुळे विषमता – शिवलोक कल्पना पौराणिक (?) वाटते – शिवकृपेने मोक्ष (२) पशु (आत्मा, जीव) – ब्रह्मापासून उत्पन्न होत नाही – तो, ज्ञाता व कर्ता आहे पण जीवाचे कर्तृत्व परमेश्वरायत्त – आत्मा शिवाचा अंश अणुप्रमाणे–पण प्रकाशाप्रमाणे तो लहान मोठे शरीर व्यापतो. (३) मलत्रय– आत्म्याच्या शक्ती (उदा. ज्ञान, आनंद) मर्यादित अप्पय्य दीक्षित तिरोधान' हा ४ था मल मानतात.

मोक्ष– वैदिक संस्कार व पंचमहायज्ञाने पापमल जाऊन मोक्षमार्गाधिकारी–मोक्षावस्थेत जीव शिवसदृश पण भिन्न– जीवन्मुक्ती नाही. मरणोत्तर 'विरजा' नदी पार केल्यानंतर शिवलोक– मोक्ष अभावात्मक अवस्था नसून नित्यतृप्तत्व, आनंदस्वरूप अवस्था.

उपसंहार– तामिळी शैवसिद्धान्त व श्रीकण्ठमत तुलना– (१) आणवमल, (२) ईश्वर व जग, (३) पति-उपादानकारण, (४) तादात्म्य कल्पना, (५) जीवन्मुक्ती, (६) आत्म्याचे अणुत्व-मोक्ष : श्रीकण्ठांचा कल अद्वैताकडे.

# शैवविशिष्टाद्वैत

भारतीय तत्त्वविचाराच्या विकासात परब्रह्म किंवा सद्वस्तु (जिला 'शिव' 'विष्णु' इ. अभिधाने आहेत) व नाना जीव आणि जडवस्तूंनी युक्त असणारे जग यांचा परस्पर संबंध काय आहे यांचा निरनिराळ्या दृष्टींनी विचार झाला आहे. 'सर्वं खल्विदं ब्रह्म' हे खरे असले तरी ते- सर्व जीव-जड वस्तुजातांचे मूलकारण असणारे ब्रह्म-ईश्वर नानाविध जीव, अनेकविध पदार्थ यांच्या रूपाने ते विभिन्न वा अनेक मानण्यांत तर्कविसंगती नाही. जाति-व्यक्तीमध्ये जसा अभेद आहे, तसा भेद आहे. त्याचप्रमाणे जे कारणावस्थेत एकरूप असते ते कार्यावस्थेत नानात्व पावते.[1] या स्वरूपाची विचारप्रणाली ख्रि.श.चे ९ व्या शतकाचे सुमारास[2] प्रभावी होती. तिला 'भेदाभेदवाद' म्हणतात.[3]

या विचाराची परिणती पुढे जीव (चित्) व जगत् (अचित्) ही दोन्ही तत्त्वे एका ईश्वराचे शरीर आहे या मतात झाली. श्रीकण्ठ या शैव आचार्यांच्या शब्दांत सांगावयाचे झाल्यास 'परमेश्वराचे शरीर चित् आणि अचित् यांनी विशिष्ट

---

१. कार्यरूपेण नानात्वमभेदः कारणात्मना। भास्करभाष्य १:१.४.

२. वस्तुतः ब्र. सू. (ब्रह्मसूत्रा) मध्ये उल्लेखलेल्या औडुलोमी, आश्मरथ्य या आचार्यांचे काळापासून.

३. या वादाचे अधिक विवेचन पी. एन्. श्रीनिवासाचारीकृत 'दि फिलॉसॉफी ऑफ भेदाभेद, मद्रास, १९५०.

आहे.[४] रामानुजांनी परब्रह्म = विष्णू मानून चित् व अचित् ही दोन्ही तत्त्वे एकाच ईश्वराचे शरीर आहेत आणि चिदचित् या शरीराने विशिष्ट अशा ईश्वराचे अद्वैत म्हणजे विशिष्टाद्वैत[५] असे म्हटले आहे. शैवतत्त्वज्ञान आगमप्रणीत असले तरी श्रीकण्ठांनी ते वेदान्तात बसते – नव्हे तीच खरी वेदान्ताची विचारप्रणाली आहे – असे सिद्ध करणारे ब्र. सू.वरील आपले भाष्य उपनिषदांचे आधारावर लिहिले. त्यांनी ब्र. सू. ही "औपनिषदी मीमांसा" आहे व त्यावरील आपले भाष्य सर्व उपनिषदांचे सार असून त्यातील सौरभाचा आस्वाद घेणाऱ्या शिवनिष्ठ आर्यांना ते 'महानिधि'च आहे असे म्हटले आहे[६], ते अगदी समर्पक आहे, असे त्यांच्या प्रसन्न भाषाशैलीतील विवेचनावरून वाटते. या भाष्यावर निजगुणशिवयोगी, हरदत्त शिवाचार्य व ब्रह्मविद्याधरींद्र यांच्या टीका होत्या. पण आता फक्त अप्पय दीक्षितांची ( ख्रि. श. १६०० ) "शिवार्कमणिदीपिका' नामक विद्वत्ताप्रचुर टीका उपलब्ध आहे.[७]

आपल्या प्राचीन परंपरेला अनुसरून श्रीकण्ठांनी स्वतःबद्दल काहीही ऐतिहासिक माहिती दिली नाही. ब्र. सू. भाष्याचे प्रारंभी 'श्वेत नामक गुरूंना नमस्कार असो' (श्लोक ४ था) आणि भाष्याचे शेवटी 'श्वेताचार्यांच्या चरणशुश्रूषेमुळे उजळलेल्या मार्गाने केवळ भक्तीमुळेच हे भाष्य मी केले आहे'[८] त्यावरून व

---

४. ब्र सू १.४.२७ 'परिणामात्' या वरील भाष्याच्या समारोपात श्रीकण्ठ म्हणतात : **ततः समुचितं चिदचिद्विशिष्टः परमेश्वरः कारणं च कार्यं च तत्तदवस्थाविशेषात्** । ब्रमीभा. ( = श्रीकण्ठभाष्य) १, पृ. ५७१.

५. यतीन्द्रमतदीपिकेत म्हटले आहे :

**चिदचिद्विशिष्टो ब्रह्मशब्दवाच्यो विष्ण्वाख्यः परवासुदेवो नारायण एवैकं तत्त्वम् इति विशिष्टाद्वैतवादिनां दर्शनमिति सिद्धम् ।**

६. **सर्ववेदान्तसारस्य सौरभास्वादमोदिनाम् ।**
**आर्याणां शिवनिष्ठानां भाष्यमेतन्महानिधिः ॥**
ब्रमीभा. १.१४. (श्रीकण्ठभाष्य खंड १, पृष्ठ १४) प्रस्तावना, श्लोक ७.

७. मी येथे कुंभकोणम्च्या हालास्यनाथ शास्त्रींनी संपादिलेली आवृत्ती [ खंड १ ला (१९०८) व खंड २ रा (१९१८), निर्णयसागर प्रेस, मुंबई ] वापरली आहे.

८. **श्वेताचार्यपदद्वन्द्व-शुश्रूषाद्योतिताध्वना ।**
**कृतमेतन्मया भाष्यं केवलं भक्तिमात्रतः ॥**
ब्रमीभा. २.५०६ ( = श्रीकण्ठ भा. २ पृ. ५०६) ब्र. सू. ४.४ शेवटचा श्लोक.

टीकाकार अप्पय दीक्षितमतावरून श्वेताचार्य श्रीकण्ठांचे विद्यागुरु असावेत असे दिसते. भगवान् शंकराचा चालू मन्वंतरातील पहिल्या कलियुगात 'श्वेत' नामक अवतार होता व त्या श्वेतांचे 'श्वेत,' 'श्वेतशिख,' 'श्वेतास्य' व 'श्वेतलोहित' असे चार 'योगवित्तम' शिष्य होते, असे कूर्मपुराणात (पूर्वविभाग. ५१.४ व १३) म्हटले आहे. पण ते सर्व पौराणिक पुरुष आहेत. ते श्रीकण्ठांचे विद्यागुरु नसावेत. त्यामुळे श्रीकण्ठांचा काळ त्यांच्या गुरूवरून ठरविता येत नाही.[९]

श्रीकण्ठांनी ब्र. सू, वरील भाष्याला 'ब्रह्ममीमांसा भाष्य' म्हटले आहे. पण या भाष्यात आपण 'विशिष्टाद्वैत' मत मांडतो असे म्हटले नाही. 'पूर्वाचार्यांनी कलुषित केलेले हे व्याससूत्र (ब्र.सू.) श्रीकण्ठाकडून शुद्ध केले जात आहे (**प्रसाद्यते**)' अशी प्रस्तावनेच्या ५ व्या श्लोकात प्रतिज्ञा आहे. (श्रीक = श्रीकण्ठभाष्य १.६). त्यांनी आपल्या ग्रंथात शंकर, रामानुज, निंबार्क इ. आचार्यांबद्दल मौन पाळले आहे, तथापि त्यांच्या भाष्यातील मतमतांतरावरून व खण्डनमण्डनावरून त्यांचा काल व भूमिका स्पष्ट होईल.[१०] उदाहरणार्थ– **जन्माद्यस्य यत :** । (ब्र. सू. १.१.२) वरील भाष्यात शंकराचार्यांच्या ब्रह्माच्या निर्गुणत्वविषयक मताचे खंडन करून 'ब्रह्म हे निर्विशेष कधीच असत नाही. ब्रह्म सर्वमांगल्याचा आधार असल्यामूळे ते 'शिवतत्त्व' म्हणून ओळखले जाते व त्यामुळे ते सकल जगताच्या जन्मादींचे कारण आहे' असे म्हणून 'सूक्ष्म चिदचिद्विशिष्ट ब्रह्म हे कारण आहे व स्थूल चिद-चिद् विशिष्ट कार्य आहे, म्हणून जगज्जन्मादि (ज्याच्यापासून जगाची उत्पत्ती इ. होते) असे लक्षण असणारे ब्रह्म आहे,[११] असा सिद्धान्त मांडला आहे. पुढे 'आरम्भणाधिकारात[१२] (ब्र. सू. २.१.१५–२०,२५), 'ज्ञाधिकरणातील' **सोऽत**

---

९. सी. हयवदनराव श्रीकरभाष्याचे प्रस्तावनेत (खंड १ पृ. ४४) श्रीकण्ठांना १३ व्या शतकातील मानतात.

१०. श्रीकण्ठाच्या कालनिश्चितीपेक्षा त्यांनी शैवतत्त्वज्ञानाची जी मांडणी केली, तिला प्रस्तुत ग्रंथात अधिक महत्त्व आहे. सी. हयवदनराव (१३ वे शतक), सुरेन्द्रनाथ दासगुप्ता (१३ वे शतक), एस्. सूर्यनारायणशास्त्री (१२ वे जतक), जतूनाथ सिन्हा (१३ वे शतक) इ. नी केलेल्या चर्चेचा निश्कर्ष इतकाच की श्रीकण्ठांचा निश्चित काल विवाद्य आहे.

११. **सूक्ष्मचिदचिद्विशिष्टं ब्रह्म कारणं, स्थूलचिदचिद्विशिष्टं तत्कार्यं भवति । अतो जगज्जन्मादिलक्षणं ब्रह्मेति सिद्धान्तः ।** (ब्र. सू. १.१.२ ब्रमीभा. १.१३५)

१२. ब्रमीभा २. २१–२९; ३६–३७.

**एव**[13] (ब्र. सू. २.३.१९) व 'कर्त्रधिकरणातील' **कर्ता शास्त्रार्थत्वात्**[14] (ब्र. सू. २.३.३३) या सूत्रांचे विवेचन करताना श्रीकण्ठांनी शंकराचार्यांच्या आत्म (जीव) विषयक मतांवर टीका करून आत्म्याचे अणुत्व, ज्ञातृत्व व कर्तृत्व सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यावरून त्यांचा काळ खि.श.च्या ७ व्या शतकानंतरचा व भूमिका विशिष्टाद्वैताची होती असे दिसते.

श्रीकण्ठांना भास्कराचा (खि. श. चे ९ वे शतक) 'भेदाभेदवाद' माहीत असावा. कारण 'अधिकं तु भेदनिर्देशात्' (ब्र. सू. २.१.२२) वरील भाष्यात ते म्हणतात:

"कार्य व कारण यात अनन्यत्व असले तरी प्रपंच व ब्रह्म यातील भेदाभेद सिद्ध होत नाही. आम्ही ब्रह्म व प्रपंच यांमध्ये अत्यंत भेद मानणारे नाही किंवा अभेद मानणारे नाही किंवा भेदाभेदवादी नाही. परंतु शरीर व शरीरी (जीव) किंवा गुण व गुणी यांच्यातील संबंधाप्रमाणे विशिष्टाद्वैतवादी आहोत."[15] 'परिणामात्' (ब्र. सू. १.४.२७) वरील समारोपात परमेश्वराचे शरीर चित् (चैतन्य, जीव) आणि अचित् (जड) वस्तूंनी युक्त आहे, असे ते म्हणतात.[16]

रामानुजांनी याच भूमिकेतून श्रीभाष्य लिहिले म्हणून श्रीकण्ठांनी रामानुजांचे मत चोरले असे मानण्याचे कारण नाही. श्रीकण्ठांचे मत २८ शैव आगमांवर आधारलेले होते.

## वेद व शैवागम शिवप्रणीत

शैवागम व वेद हे दोन्ही शिवप्रणीत असल्यामुळे त्यांच्यामध्ये भेद नाही. त्या दोहोंचे सारखेच प्रामाण्य आहे. परंतु वेदांचा अधिकार फक्त त्रैवर्णिकांना आहे

---

१३. ब्रमीभा २. १४१–१४३.

१४. ब्रमीभा २. १५२.

१५. **कार्यकारणयोरनन्यत्वेऽपि कार्यभूताच्चिदचित्प्रपञ्चात् कारणमत्राधिकेन श्रूयते... न वयं ब्रह्म-प्रपंचयोरत्यन्त्यमेव भेदवादिनः... न वात्यन्ताभेदवादिनः— न च भेदाभेदवादिनः... किन्तु शरीर-शरीरिणोरिव गुणगुणिनोरिव च विशिष्टाद्वैत-वादिनः।** ब्रमीभा खंड २, पृ. २.३१.

१६. **ततः समुचितं चिदचिद्विशिष्टः परमेश्वरः कारणं कार्यं च तत्तदावस्था-विशेषात्।** ब्रमीभा १.५७१.

व आगमाचा सर्व वर्णांना आहे एवढाच फरक. वस्तुतः दोन्ही शिवागमच आहेत.[१७]

## श्रीकण्ठ–स्वतंत्रप्रज्ञ भाष्यकार

त्यामुळे श्रीकण्ठांनी शैवागमांचा विशिष्टाद्वैती अर्थ लावून उपनिषदांचे आधारे भाष्य लिहिले हे म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. परब्रह्माला ' शिव ' मानून वा ' विष्णू ' समजून दोन ग्रंथकारांनी स्वतंत्रपणे विशिष्टाद्वैत मत मांडले व ते मांडतांना बोधायनवृत्तीसारखे काही समान संदर्भग्रंथ वापरले तर त्या दोन्ही (शैव व वैष्णव) भाष्यांत साम्यस्थळे असणे अटळ आहे. श्रीकण्ठकृत ब्रमीभा. व रामानुजकृत श्रीभाष्यातील साम्यस्थळांची यादी सूर्यनारायणशास्त्रींनी दिली आहे.[१८]

**श्रीकण्ठ व रामानुज : मतभिन्नता**–परंतु मला असे म्हणावयाचे आहे की श्रीकण्ठ हे स्वतंत्र प्रज्ञा असलेले भाष्यकार असून त्यांनी रामानुजापेक्षा भिन्न भूमिका घेतली आहे. उदाहरणार्थ : **आत्मेति तूप गच्छन्ति ग्राहयन्ति च ।**

ब्र. सू. ४.१.३ या सूत्राचा बहुधा ' परब्रह्माला आत्मा असेच श्रुती मानतात व त्याचा ' आत्मा ' असाच बोध करून देतात ' असा अर्थ करून ' ईश्वराचे

---

**१७. वयं तु वेदशिवागमयोर्भेदं न पश्यामः । वेदेऽपि शिवागम इति व्यवहारो युक्तः, तस्य तत्कर्तृकत्वात् । अतः शिवागमो द्विविधः त्रैवर्णिकविषयस्सर्वविषयश्चेति । वेदः त्रैवर्णिकविषयः । सर्वविषयश्चान्यः । उभयोरेक एव शिवः कर्ता । ' ईशानः सर्वविद्यानाम् ', ' अस्य महतो भूतस्य निःश्वसित् ' इत्यादिश्रुत्या ।**

**ब्र. सू. २.२.३८ वर ब्रमीभा २.१११**

या श्रद्धेने प्रेरित होऊन श्रीकण्ठांनी उपनिषदादी श्रुतींच्या आधारे ही ' औपनिषदी ' ब्रह्ममीमांसा लिहिली.

श्रीकण्ठांच्या श्रद्धेबद्दल मला काही म्हणायचे नाही. पण २८ शैवागम व श्रुती एकच (सारखेच तत्त्वज्ञान मांडणाऱ्या) आहेत हे त्यांचे मत आधुनिक वाचकांना पटेलच असे नाही. तथापि ही श्रद्धा शैवसिद्धान्तवाद्यांचीसुद्धा होती. उदा. तिरुमूलरने (खि. श. ६ वे) वेदान्त हा शुद्धशैवसिद्धान्त आहे व २८ शैवआगम वेदान्तच (वेदान्त–प्रतिपादक ?) आहेत असे म्हटले आहे. (तिरुमन्दिरम्, पद्य १४२२) तामिळी शैव संत सुंदर (खि. श. ९ वे) यांनी वेद व आगम शिवप्रणीत आहेत व दोहोत भेद नाही असे म्हटले आहे. ( शिवाद्वैत ऑफ श्रीकण्ठ पृ. ९, टीप ९)

१८. द शिवाद्वैत ऑफ श्रीकण्ठ, परिशिष्ट ३, ए, पृ. ३२१ ते ३२९.

ठिकाणी हा आत्माच आहे' अशी बुद्धी करावी[१९] असा शंकराप्रमाणे निष्कर्ष काढला आहे. रामानुज मात्र 'या ठिकाणी उपास्य असलेले जे ब्रह्म आहे ते उपासकापेक्षा निराळे मानून (**अन्यत्वेन**) उपासना करावी का उपासकाचा आत्मा आहे असे मानून (**उपासितुरात्मत्वेन**) करावी' असा प्रश्न निर्माण करून ते आपल्या विशिष्टाद्वैती भूमिकेस अनुसरून 'शरीरापेक्षा आत्मा अधिक व आत्म्यापेक्षा परमात्मा अधिक असे अनुसंधान ठेवल्याने दोहोतील भेद रक्षिला जातो. (**पृथक्त्वानुसंधानं च रक्षितम्**) प्रत्यगात्म्यापेक्षा ब्रह्म मोठे (अधिक) व तो ब्रह्माचे शरीर असल्यामुळे उपासकाचा आत्मा म्हणून ब्रह्म उपास्य आहे हे सिद्ध होते[२०] असे मत दिले आहे.

वस्तुत: श्रीकण्ठांनी रामानुजाप्रमाणे भूमिका घ्यावयास हवी होती. पण शंकराप्रमाणे अद्वैती भूमिका घेऊन ब्रह्मभावाने (म्हणजे आपल्यात व शिवात भेद नाही या भावनेने) उपासना करणे उपासकाला मुक्तिप्रद आहे. त्याशिवाय संसारातून सुटका (अनिवृत्ति–संसारात परत न येणे) होणार नाही[२१] असे म्हटले आहे. अप्पय्य दीक्षित स्वच्छ स्पष्टीकरण करतात शिवाभेदभावनेने शिवत्व प्राप्ती होते. उपासक व शिव भिन्न आहेत (शिवेतर) अशी भावना केल्यास होणार नाही.[२२]

दुसरे उदाहरण : ब्र. सू. ४.२.१–६ मध्ये मृत्युसमयी इंद्रियांचा लय कसा होत जातो. याचे वर्णन आहे : वाणी मनात (लय पावते), मन प्राणात (लय पावते)

---

१९. **तस्मादात्मेत्येवेश्वरे मनो दधीत** । शा. भा. (=शारीरकभाष्य) पृ. ८३४.

२०. **स्वशरीरात्स्वात्मनोऽधिकत्वानुसंधानवत्स्वात्मनोऽपि परमात्मनोऽधिकत्वानुसंधानात् पृथक्त्वानुसंधानविधानं च रक्षितम्** । **अधिकस्य ब्रह्मणः प्रत्यगात्मन आत्मत्वात्तस्य च ब्रह्मशरीरत्वान्निषेधवाक्ये अकृत्स्नो ह्येषः । इत्युक्तम् । अत उपासितुरात्मत्वेन ब्रह्मोपास्यत्वम् स्थितम्** । श्रीभाष्य III पृ. ९८१–९८२.

**यद्यपि जीवादधिकमेव शिवाख्यं परं ब्रह्म, तथाप्युपासिताहं ब्रह्मास्मीति तदुपासीत** । ब्रमीभा २.४२७.

२१. **ब्रह्मभावेनोपासनमुपासकस्य मुक्तिकरम्, अन्यथा संसारानिवृत्ति :** ।
ब्र. मी. भा. २.४२८.

२२. **यतश्शिवाभेदभावनयैव शिवत्वप्राप्तिः न तु शिवेतरभावनया इत्यर्थः**।– शिमदी (शिवार्क–मणिदीपिका) उपर्युक्त (२.४२८).

इ. अनुक्रम दिला आहे. यातील ' लय ' ही कल्पना स्पष्ट करताना शंकरांनी ' वाणी ' याचा अर्थ ' वाणीचा व्यापार ' केला आहे.[२३]

रामानुज लय = संयोग (Association) विलय नव्हे असा अर्थ देताना ' वाङ्मनसि सम्पद्यते ' (छां. ६.८.६) या वचनावरून ' वाणी मनाशी संयोग करते, ती त्यात विलीन होत नाही ' असा अर्थ होतो.[२४] असे म्हणतात. श्रीकण्ठ लय म्हणजे ' वृत्तिलय ', ' स्वरूपलय ' नव्हे असा अर्थ देतात.[२५] अशाच तऱ्हेची शांकरभाष्याशी ब्रमीभा. चे साम्य असलेल्या किती तरी स्थळांची यादी सूर्यनारायणशास्त्रींनी दिलेली आहे.[२६]

## काश्मीरी अद्वयवादी शैव–परिचय

श्रीकण्ठांनी काश्मीरी (अद्वयवादी) शैवग्रंथ पाहिले असावेत. ब्र. सू. २.१.१८ वर " आप्तवचन " म्हणून ते

**चिदात्मैव हि देवोऽन्तः स्थितिमिच्छावशाद् बहिः ।**
**योगीव निरुपादानमर्थजातं प्रकाशयेत् ॥**

ही उत्पलाचार्यांची[२७] अथवा उत्पलांनी दिलेली ईश्वर–प्रत्यभिज्ञेतील कारिका देतात व ' **ततः परमकारणात् परब्रह्मणः शिवादभिन्नमेव जगत्कार्यम्** '

---

२३. **तस्मादत्र वृत्त्युपसंहारविवक्षा । वाग्वृत्तिः पूर्वमुपसंहरियते मनोवृत्तावस्थितायामित्यर्थः ।**– शा. भा. २.१, पृ. ८५६.

२४. ' **वाङमनसि संपद्यते** ' (छा. ६.८.६) **इति वचनान्मनसा वाक्संयुज्यते न तु तत्र लीयते** ।– श्रीभाष्य, पृ. ९९७.

२५. **वागादीनां मनसि न स्वरूपलय उच्यते, किन्तु वृत्तिलय एव।**
ब्रमीभा. २.४५१.

२६. **उर्प्युक्त**, पृ. ३३०–३३३.

२७. कदाचित् उत्पलांनी ती आगमातून (वातुलागमातून) घेतली असावी असे श्रीकण्ठ ही कारिका ब्र. सू. २.२.३८ वर देऊन ती आगमातील आहे हे ' **इत्याद्यागमप्रामाण्याच्च** ' या शब्दांनी स्पष्ट करतात यावरून वाटते.

श्रीकरभाष्यात श्रीपतिपण्डितांनी थोड्या पाठभेदासह ही कारिका देऊन ती वातुलागमातील आहे असे स्पष्ट म्हटले आहे. त्यामुळे डॉ. कान्तिप्रसाद पाण्डे मानतात तशी ती उत्पलकृत नसून वातुलागमातून त्यांच्या समोर असलेल्या पाठभेदासह उत्पलांनी उद्धृत केली. ही कारिका वातुलागमातून श्रीकण्ठांनी घेतली असे मानले, तरी पुढे दिलेल्या पुराव्यावरून श्रीकण्ठांनी काश्मीरी शैवमत पाहिले असावे, असे वाटते.

असा समारोप करतात. (ब्रमीभा. २.२९) ब्र. सू. १.२.१ वरील भाष्यात जग ब्रह्माव्यतिरिक्त नाही हे सांगताना श्रीकष्ठ पुढील कारिका उद्धृत करतात :

> **शक्त्योऽस्य जगत् कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वरः ।**
> **शक्तिस्तु शक्तिमद्रूपात् व्यतिरेकं न गच्छति ॥**
> **तादात्म्यमनयोर्नित्यं वह्निदाहकयोरिव ।**
> **शक्तिशक्तिमतोर्यस्मादभेदः सर्वथा स्थितः ॥** ब्रमीभा. १.३००

भास्करकण्ठाने भास्करीत (खंड १.२६६, ३४५) अद्वैतसिध्दयर्थं या कारिका वापरल्या आहेत.

श्रीकण्ठांनी काश्मीरी (अद्वयवादी) शैवमतावरील ग्रंथ पाहिले होते व त्यांचा कल अद्वैताकडे होता एवढेच मला म्हणावयाचे आहे. अप्पय दीक्षितांनी त्यांना 'आनंद लहरी' व 'शिवाद्वैत निर्णयात' 'अद्वैती' ठरवले असले तरी ब्रमीभा. वरून तितक्या प्रमाणात ते अद्वैती नसावेत असे मला वाटते.

## एक स्वयंप्रज्ञ भाष्यकार

श्रीकण्ठांनी पूर्वसूरींची भाष्यें पाहिली असली तरी ते स्वतंत्रप्रज्ञेचे भाष्यकार आहेत. ब्रमीभा. मध्ये अशी अनेक स्थळे आहेत की जेथे ते शंकर, रामानुज वा इतर ब्र. सू. भाष्यकारांपेक्षा निराळा, स्वतंत्र अर्थ देऊन तो सिद्ध करतात. शिव म्हणजेच परब्रह्म व तो सर्वश्रेष्ठ आहे—नारायणापेक्षासुद्धा—ही भूमिका ब्रमीभा. मध्ये त्यांनी अनेकदा ठामपणें मांडली आहे. उदाहरणार्थ ब्र. सू. १.१,२१ व २२ यात सूर्यामध्ये असलेला हिरण्मय पुरुष शिव असून त्याच्या 'पुण्डरीकमेव अक्षिणी' अशा दोनच डोळ्यांचा उल्लेख करण्याचे कारण तिसरा डोळा मिटलेला (**मुकुलित स्वभाव**) असल्यामुळे तो उल्लेखला नाही.[२८] ब्र. सू. १.२.५ मध्ये 'नारायणपरं व्रह्म' याचा 'परब्रह्म हे नारायणापेक्षा श्रेष्ठ आहे' (**नारायणात् परम्**) असा अर्थ श्रुतींच्या आधारे केला आहे. (ब्रमीभा. १.३२४) ब्र. सू. १.१.१७–२० मध्ये (**इतरानुपपत्त्यधिकरण**) जगाची उत्पत्ती हिरण्यगर्भापासून न होता शिवापासून होते व तेथे 'प्रजापती'चा अर्थ 'पशुपति' (शिव) होतो असे मुख्यत: महोपनिषदा (महानारायणीयोपनिषदा) चे आधारे दाखवले आहे. (ब्रमीभा. १.२३०–२४१) ब्र. सू. ३.२.३५–३६ मध्ये (**अन्यप्रतिषेधाधिकरण**). शिव सर्वश्रेष्ठ विष्णूपेक्षासुद्धा श्रेष्ठ आहे असे श्रुत्याधारे म्हटले आहे. (ब्रमीभा. २.२६६–२७०). ब्र. सू. ३.३.१५–१७ मध्ये (आध्यानाधिकरण)

---

२८. **तृतीयलोचनं तु मुकुलितस्वभावं विकसितपुण्डरीकसदृशं न भवति, मुकुलितपुण्डरीकसदृशमित्यभिप्राय:** ।— ब्रमीभा. १.२५६

शिवाचे माहात्म्य सांगून 'म्हणून आनंदमय असलेल्या एका शिवाचेच ध्यान करावे' असे प्रतिपादन केले आहे. (ब्रमीमा. २.३०८–३१०). ब्र.सू. ३.४.४८–४९ मध्ये पाशुपतव्रत भुक्तिमुक्तिप्रद असून (**भुक्तिमुक्तिहेतुतयोभयात्मिकमिदं व्रतम्**) दीर्घकाल आचरले तर मोक्षप्रद (अपवर्गहेतु) आहे (ब्रमीभा. २.४१२–४१६) असे म्हटले आहे. ब्र. सू. ४.४.९ मध्ये मुक्त झालेला जीव पशुत्वव्यावृत्ति होऊन त्याचे मल नाहीसे झाल्यामुळे शिवत्व पावतो, असे सांगून त्याच्या शिवसदृशस्वभावाची सर्वज्ञत्व, नित्यतृप्तत्व, स्वतंत्रत्व, सर्वशक्तिमत्व इ. आठ सामर्थ्ये त्याला प्राप्त होतात असे म्हटले आहे (**अतो मुक्तस्य शिवसदृशस्य स्वातंत्र्यं युक्तमेव**-ब्रमीभा. २.४८७–४८८).

स्वमतस्थापनार्थ श्रीकण्ठानी ब्र. सू. चा अनुक्रम एके ठिकाणी बदलला आहे. सांपरायाधिकरणात (ब्र. सू. ३.२७–३०) ब्रह्मज्ञाचा कर्मनाश (पुण्यपापविमोचन) देहवियोगाबरोबर तात्काळ होते का त्यानंतर काही काळाने होते याबाबतीत श्रीकण्ठांचे मते कर्मनाश दोन टप्प्यांनी होतो– एक मृत्युसमयी व दुसरी विष्णुलोकाची सीमा असलेली विरजा नदी ओलांडताना. विरजा पार केली की विष्णुलोकापलीकडील जे परमानंदमय शिवपद आहे ते (संपूर्ण कर्मनाश झाल्यामुळे) प्राप्त होते. व त्याला आधार म्हणून '**सोऽध्वनः परमाप्नोति तद्विष्णोः परमं पदम्**' (कठ ३.९) असा ते श्रुतीचा आधार देतात. शिमदी. मध्ये '**विष्णोः परमं**' चा अर्थ विष्णुपदाचे वरती असलेले (**विष्णुपदादूर्ध्वम**) असा स्पष्ट अर्थ केला आहे. या ठिकाणी इतर भाष्यकारांनी काय अर्थ केला व त्यांच्यापेक्षा श्रीकण्ठांचा अर्थ कसा तर्कशुद्ध आहे (तसा तो आहेही) हे दाखविण्यापेक्षा त्यानी ब्र. सू. संगति कशी बदलली पाहा. श्रीकण्ठांची ब्र. सू. संहिता व रामानुजांची ब्र. सू. संहिता जवळ जवळ सारखीच आहे पण येथे श्रीकण्ठ ब्र.सूंचा अनुक्रम पुढीलप्रमाणे देतात.

**सांपराये तर्तव्याभावात् तथा ह्यन्ये** । ३.३.२७
**छन्दत उभयाविरोधात्** । ३.३.२८
**उपपन्नस्तल्लक्षणार्थोपलब्धेर्लोकवत्** । ३.३.२९
**गतेरर्थवत्त्वमुभयथाऽन्यथा हि विरोधः** । ३.३.३०

रामानुजीय ब्र. सू. संहितेत श्रीकण्ठांचे ३.३.३० हे सूत्र ३.३.२९ क्रमांकाचे आहे व श्रीकण्ठांचें ३.३.२९ हे सूत्र रामानुज ब्र. सू. ३.३.३० क्रमांकाचे आहे. शंकर, निंबार्क व रामानुज यांची ब्र. सू. ३.३.२९ व ३.३.३० संहिता सारखीच आहे. श्रीकण्ठांनी मात्र तो अनुक्रम बदलला आहे. या ठिकाणी या सूत्रांचा अर्थ काय आहे हा मुद्दा नसून सूत्रानुक्रमामधील बदल हा आहे. द्वैतसिद्धीसाठी 'तत्त्वमसि' या महावाक्याचे 'अतत्त्वमसि' करणाऱ्या लेखकापेक्षा श्रीकण्ठांचा प्रयत्न बरा

की वाईट हे ज्याचे त्यानी ठरवावे. पण आगमप्रणीत शैवतत्त्वज्ञान श्रुतिप्रणीत दाखवण्यात श्रीकण्ठांचे सामर्थ्य व मर्यादा स्पष्ट होतात.

इतर शैवतत्त्वज्ञांप्रमाणे श्रीकण्ठ पति (शिव), पशु (जीव), पाश (मल) हे त्रिक मानतात. त्यांविषयीची त्यांची भूमिका आता पाहू–

## पति (ब्रह्म, शिव)

श्रीकण्ठमते अंतिम तत्त्व ब्रह्म किंवा शिव आहे हे आपण वर पाहिले आहे. 'ब्रह्म' याचा अर्थ ते देश, काल इ. मर्यादांच्या अतीत आहे.[२९] त्याचे ब्रह्मत्व म्हणजे केवळ बृहत्व (इतर सर्वापेक्षा मोठे, व्यापक असणे) नसून सृष्टयुत्पत्तीचे वेळी सर्व चित्–अचित् वस्तुजातांचा विस्तार करणे मोक्षप्रसंगी जीवामधील धर्म, ज्ञान इ. चा विकास करणे इ. – ज्याला 'बृंहणत्व' म्हणतात– अशा 'बृंहण–विशिष्ट बृहत्त्वात' आहे. सूक्ष्म चित् व अचित् या वैशिष्टयांनी युक्त असे ब्रह्म 'कारण' असते व स्थूल चित् व अचित् विशिष्ट (विश्व) हे 'कार्य' स्वरूप ब्रह्म होय.[३०] म्हणून 'स्थूल–सूक्ष्म–चिदचित्प्रपंच–विशिष्ट' परमेश्वर 'कार्य कारणरूप' आहे असे म्हटले आहे.[३१] सर्व विश्व त्याच्यापासून निर्माण होते म्हणून त्याला 'भव' (< √भू–) म्हणतात.[३२] तैत्ति. आरण्यक व पाशुपत त्याला 'भवोद्भव' असे संबोधतात. त्याच्या ठायी सर्व कल्याणकारक गुण आहेत व तो सर्व विश्वाचे कल्याण करतो म्हणून त्याला 'शिव' म्हणतात.[३३] प्रलय-कालाचे वेळी तो सर्व जगाचा संहार करतो म्हणून त्याला 'शर्व' (< √शृ–) म्हणतात.[३४] सर्व जीवांना (=पशूंना) घोडा, बैल इ. जनावराप्रमाणे पाशांनी बांधून त्यांना स्वकार्य करावयास तो लावतो म्हणून त्याला 'पशुपति' अशी संज्ञा

---

२९. जन्माद्यधिकरणा (ब्र. सू. १. १.२) वरील भाष्य–सारांश

३०. सूक्ष्म–चिदचिद्‌विशिष्टं ब्रह्म कारणम्, स्थूलचिदचिद्‌विशिष्टं ब्रह्म कार्यं भवति ।– ब्रमीभा. I पृ. १४

३१. स्थूल–सूक्ष्म–चिदचित्प्रपंचविशिष्टः परमेश्वरः कार्य–कारणरूपः ।
ब्रमीभा १.२७ १.१.५

३२. सर्वत्र सदा भवतीति भवशब्दवाच्यं ब्रह्म । भू–धातोस्सत्तार्थकत्वात् । सर्वत्रानुवर्तमानं सद्रूपं ब्रह्मेति विज्ञायते । ब्रमीभा. १. १२ / I. १२५

ततः सद्रूपं ब्रह्म भवशब्दवाच्यं भवति । ब्रमीभा. I. १२५

३३. अनन्तानन्दकल्याणगुणैकघन ईश्वर शिव इत्युच्यते सद्‌भिः ।
ब्रमीभा (३.२.१७), २ पृ. २४८–४९ पाहा.

३४. शर्वशब्देन 'श्रृंहिंसाया' मिति धात्वर्थवशात् सकल–संहर्तृ ब्रह्म प्रतिपद्यते । – ब्रमीभा. . I १२६.

आहे. या संज्ञेवरून तो चित् व अचित् यांचा नियामक आहे हे स्पष्ट होते.[३५] तो पूज्य आहे व सर्व जगावर सत्ता चालवतो म्हणून त्याला '**परमेश्वर**' म्हणतात. तो भक्तांचे संसारदुःख पळवून लावतो (√ द्रु–) अथवा घालवतो म्हणून त्याला '**रुद्र**' म्हणतात.[३६] सर्व वैषयिक आनंदापेक्षा सर्वश्रेष्ठ (महत्–) जो स्वात्मानंद त्यात तो रमतो (√दीव्–) म्हणून त्याला '**महादेव**–' म्हणतात.[३७] अन तो सुख (शम्) देणारा अथवा स्वानंदमय असणारा (√भू–) म्हणून त्याला '**शम्भु**' म्हणतात.

ब्रह्म किंवा शिव शांकरमतात मानतात तसे निर्गुण नाही. त्याच्या ठिकाणी रागद्वेषादि त्याज्य (**हेय**) गुण नाहीत, पण तो अनंत कल्याणकारक गुणांनी संपन्न आहे.[३८] तो आ–काश (=प्रकाश) स्वरूप, सर्वज्ञ, सत्यज्ञानरूप, निरतिशय आत्मानंदयुक्त आहे. त्याला अनादिमलाचा स्पर्श नसल्यामुळे तो अत्यंत परिशुद्ध आहे.[३९] तो उत्पत्ती, स्थिती, लय, तिरोभाव (अदृश्य करणे, झाकणे) व अनुग्रह ही पंचकृत्यें करतो. तो चित् व अचित् असलेल्या प्रपंच शक्तींनी युक्त असला तरी

---

३५. **ईश्वरस्येशितव्यापेक्षतया पशुपतिशब्दवाच्यं ब्रह्म ... ... ...**
**अनेन चिदचिन्नियामकं ब्रह्मेति विज्ञायते।** ब्रमीभा. I १२७.
**ब्रह्माद्याः स्थावरन्ताश्च देवदेवस्य शूलिनः।**
**पशवः परिकीर्त्यन्ते संसारवशवर्तिनः॥**
**तेषां पतित्वाद्देवेशः शिवः पशुपतिः स्मृतः।**
**मलमायादिभिः पाशैः स बध्नाति पशून्पतिः।**–उपर्युक्त
सर्व शैव लेखक ही संकल्पना मानतात.

३६. **संसाररुग्–द्रावकत्वाद्रुद्रशब्दवाच्यं ब्रह्म।** ब्रमीभा. I १२७.

३७. **महत्त्वेन दीव्यमानतया 'महादेव' इत्युच्यते शिवः।** ब्रमीभा. I १२८.
यावर अप्पय्य दीक्षित म्हणतात :
मानवीं आनंदापासून ते हिरण्यगर्भाच्या आनंदापर्यंतच्या सांसारिक भावापेक्षा उत्कृष्ट असलेल्या स्वात्मानंदाच्या विषयात जो रमतो (दीव्यति), असा देव हे 'महादेव' शब्दाने विवक्षित आहे –उपर्युक्त.

३८. **हेयगुणराहित्येन कल्याणगुणसाहित्येन चोभयलिङ्गं ब्रह्म।**
इ. ब्र. सू. ३.२.१७ वरील सर्व भाष्य ब्रमीभा पृ. २.२४८
**निरवद्यं कल्याणगुणास्पदं ब्रह्म।** ब्र. सू. ३.२. १५ वर ब्रमीभा २.२४७

३९. **अनादिमलसंश्लेषप्रागभावाद्विशेषतः। अत्यन्तपरिशुद्धात्मा शिवः ..॥ अनन्तानन्दकल्याणगुणैकघन ईश्वरः। शिव इत्युच्यते .. ...।** ब्रमीभा पृ. २४८–४९-मधील उद्धृत– कारिका.

त्याच्या शक्ती अनंत आहेत व त्या शक्ती अनाकलनीय (अपरिच्छिन्न) आहेत.[४०] तथापि ब्रह्माची जी लक्षणे वेदान्तात सांगितली आहेत ती लक्षणे नसलेले सजातीय व विजातीय असे जे ब्रह्माव्यतिरिक्त इतर पदार्थ आहेत त्यापेक्षा निराळे (व्यावृत्तरूप) ब्रह्म आहे असे म्हणता येईल. परंतु श्रीकण्ठानी ब्रह्माचे प्रपंचरूपत्व नाकारले नाही. ते चिदचिद्विशिष्ट (जड व चैतन्ययुक्त) आहे. पानकरसाप्रमाणे त्याच्या एकत्वात विविधता आहे पण ते सर्व दोष, वासना इ. कलंकापासून मुक्त आहे. सागरात निर्माण होणाऱ्या लाटा, फेस, बुडबुडे वाऱ्याने निर्माण होतात. त्याप्रमाणे त्याच्या इच्छेने हा प्रपंच निर्माण होतो ही त्याची मायाशक्ती तद्रूप आहे कारण शक्ति व शक्तिमान् एकरूपच असतात.

शक्तयोऽस्य जगत् कृत्स्नं शक्तिमांस्तु महेश्वरः।
शक्तिस्तु शक्तिमद्रूपाद् व्यतिरेकं न गच्छति।
शक्ति–शक्तिमतोर्यस्मादभेदः सर्वदा स्थितः।

(ब्रमीभा. १.३००–३०१ मध्ये उद्धृत)

चंद्र आणि चंद्रकिरणाप्रमाणे शिव व जगतातील विविधता आणणाऱ्या शक्तींचे संबंध आहेत. ब्र. सू. १.२.१ वरील (शिमदी, खंड १, पृ. ३००)

प्रलयकाली सूर्य, चंद्र, दिशा, काल इ. नाहीसे होतात व देव, मनुष्य चिद् अचिद् पदार्थांच्या नामरूपांचा नाश होतो पण हे मलावृत पशू नाश न होता (व शिवदर्शन न होता) शिवाधीन असतात. सृष्टीचे उत्पत्तीचे वेळी स्वतःच्या केवळ संकल्पाने कुंभाराला बाहेरील उपादान (माती) लागते. तसे न लागता कोणत्याही समवायी कारणाशिवाय (**समावायिकारणनिरपेक्षम्**) सर्व चिदचित् सृष्टी तो निर्माण करतो (ब्रमीभा. १.३४०–४१). कारण सृष्टीचे उपादान कारण व निमित्त कारण शिवच आहे.

परमेश्वर अतिशय दयाळू आहे. त्याचे ठिकाणी वैषम्य व नैर्घृण्य नाही. विषमता त्या त्या पशूचा कर्मविपाक आहे आणि संहार हा संसारात भ्रमणाऱ्या पशूना विश्रांती देण्यासाठी होतो. त्यात कठोरता नाही. पशूंच्या विविध कर्मविपाका-मुळे जगात विषमता दिसते आणि पशूना कर्मभोग भोगून अंतःकरणशुद्धी झाली की शिव आत्मविषयक ज्ञान निर्माण करून निरतिशय आनंदरूप असलेली मोक्ष-लक्ष्मी त्याचे ठायी प्रकाशित करतो.[४१] कठ [४२] (२.२३) व मुण्डक (३.२.३)

---

४०. ब्र. सू. १.१ २ वरील ब्रमीभा.

४१. ब्रमीभा. (वैषम्यनैर्घृण्याधिकरण) २.४६–५१.

४२. **नायमात्मा प्रवचनेन लभ्य… यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्।**

मध्ये व्यक्त केलेले ' ईश्वरी अनुग्रह ' (God's Grace) हे तत्त्व दाक्षिणात्य शैवा-प्रमाणे श्रीकण्ठांनाही मान्य आहे पण त्यात वैष्णवांप्रमाणे दास्यभावना नाही. तसेच लोककल्याणासाठी वेद हे ईश्वराने निर्माण केले असून ते अपौरुषेय आहेत अशी श्रीकण्ठांची श्रद्धा आहे. त्यांची शिवलोकाची कल्पना पौराणिक वाटते. तो लोक स्वर्ग, सत्यलोक व वैकुण्ठ यांच्या पलिकडे असून तो कोटयावधी सूर्यासारखा प्रकाशमान आहे. कर्मनाश व शिवकृपा यांनी त्याची प्राप्ती झाल्यावरच पुनर्जन्म येत नाही आणि हीच मोक्षावस्था होय.

## पशु (जीव, आत्मा)

पशु किंवा जीव वा आत्मा पशुपतीपेक्षा (ब्रह्मापेक्षा) भिन्न आहे. श्रीकण्ठांनी जीवत्वाची व्याख्या करताना अनादि–अज्ञान कर्म, माया इ. मलानी व्याप्त, वासनांच्यामुळे प्राप्त होणारे जे विचित्रकर्मभोग ते भोगण्यासाठी तत्तदनुरूप शरीरांचे मध्ये ज्याला सक्तीने प्रवेश व निर्गम (जन्म व मृत्यू) करणे भाग पडते व आत्यंतिक ताप सोसावे लागतात.[४३] ते जीवत्व या शब्दांत पति (शिवा–) पासून तो कसा भिन्न आहे हे स्पष्ट केले आहे. तथापि जीव अनादि आहे. शिवा (ब्रह्मा–) पासून त्याची उत्पत्ती होत नाही. आत्माधिकरणात ब्र. सू. २.३.१८ वरील टीकेत ' आकाशाची उत्पत्ती ब्रह्मापासून होते तशी जीवाची होते का ' हा प्रश्न उपस्थित करून **' आत्मा न जायते '** (आत्मा किंवा जीव निर्माण होत नाही) तो अनादि आहे. सृष्टयुत्पत्तीपूर्वी तो ' नाम–रूप व्यवहाराचे ' अभावामुळे परब्रह्मात असला तरी त्याची 'स्वरूपसत्ता ' (स्वतंत्र अस्तित्व) नाहीसे होत नाही. अग्नी आणि त्याचे स्फुल्लिंग या प्रमाणे ब्रह्म व आत्मा संबंध कौषीतकीउपनिषदात (३.३, ४.२०) सांगितला आहे. पण स्फुल्लिंगत्वाचा अर्थ जीवाला नाम–रूप प्राप्ती होते असा असून ब्रह्मापासून जीवाची उत्पत्ती होते असा नव्हे (**विस्फुल्लिङ्ग-श्रुतिः... तेषां नामरूपसमुन्मेषाभिप्राया, न जन्मपरा**). कारण जे उत्पन्न होते त्याचा नाश होतो या नियमाने आत्मोत्पत्ति मानल्यास आत्म–नाश मानावा लागेल व ते श्रुतिविरोधी होईल. सारांश जीव हा ब्रह्मापासून उत्पन्न होत नाही.[४४]

जीव हा स्वभावाने ज्ञाता (स्वाभाविक ज्ञानधर्मी) आहे.[४५] परंतु संसारी

---

४३. ब्रमीभा. १. पृ. ८९–९०.

४४. ब्रमीभा. २. पृ. १४०.

४५. **ज्ञोऽत एव** ब्र. सू. २,३.१९. यातील ' ज्ञ ' = स्वाभाविक ज्ञानधर्मी (श्रीकण्ठ), स्वयंज्योतिःस्वरूप (शंकर), पण मध्व **' जीवोऽप्यत एव परमेश्वरादुत्पद्यते '** (जीव परमात्म्यापासून निर्माण होतो) असा श्रीकण्ठांच्यापेक्षा उलटा अर्थ घेतात.

जीव मलत्रयांनी लेपल्यामुळे त्याची ज्ञानशक्ती मर्यादित होते. पण जेव्हा ब्रह्मज्ञान व उपासना यांच्या अभ्यासाने मलत्रय दूर होतात त्यावेळी त्याचा ब्रह्माशी सदृश असलेला स्वाभाविक असा निरतिशय ज्ञानधर्म प्रकट होतो.[४६] आत्म्याला 'ज्ञान' असे उपनिषत्कारांनी म्हटले असले तरी तो ज्ञाता असल्यामुळे ज्ञाता व ज्ञान यांचे संबंध पृथ्वी व गंध (गुण–गुणिन्) या प्रमाणे मानावेत.

जीव हा कर्ता आहे. तसे नसते तर मनुष्याने अमुक करावे अमुक करू नये असे शास्त्राने सांगितले नसते. परंतु हे कर्मस्वातंत्र्य स्वायत्त नसून मर्यादित-परमेश्वरायत्त, ईश्वरी अनुमतीवर अवलंबून आहे. जीव आपल्या कर्मांच्या परिपाकाप्रमाणे स्वतःच्या इच्छेने काही गोष्टी करणे न करणे ठरवतो, तसा प्रयत्नही करतो. पण ईश्वर त्याच्या कृत्याला अनुमति देऊन किंवा न देता (विधि–निषेध अथवा अनुग्रह वा निग्रह करून) ते काम त्याच्याकडून करवतो किंवा करू देत नाही.[४७] ज्याप्रमाणे मुलाला लाकूड उचलतांना त्याला मदत करणारा वडील मदतनीस 'उचल' 'उचलू नकोस' अशा सूचना देतो त्याप्रमाणे परमेश्वरसहाय असणारा व विशिष्ट कर्म करण्यास परमेश्वराने प्रवृत्त केले तरी तो परमेश्वराच्या विधि–निषेधात्मक आज्ञेस पात्र होतो. कर्मस्वातंत्र्य व नियतिवाद (Free will and Determinism) यांचे असे संबंध स्पष्ट करताना कर्मविकापाप्रमाणे प्रयत्नशील मनुष्याला कर्मासाठी प्रवर्तक ईश्वर आहे, त्याचे ठिकाणी वैषम्य नाहीं, कर्मानुरूप फले मिळणे त्याच्या अनुमतीवर अवलंबून असते असे पशु व पति यांचे संबंध आहेत असे म्हटले आहे.[४८]

बुद्धी व प्रकृती याना कर्तृत्व देणाऱ्या मतांचा उल्लेख करून ते म्हणतात की, बुद्धी 'करण' आहे ती कर्ता होऊ शकत नाही.[४९] प्रकृतीस कर्ता मानल्यास तीच कर्त्री व भोक्त्री होईल आणि आत्माच्या भोक्तृत्वशक्तीची हानी मानावी लागेल. प्रकृती एक व आत्मे अनेक आणि प्रकृतीची स्वाभाविक जडता लक्षात घेता प्रकृती कर्त्री मानता येणार नाही.

---

४६. ब्रमीभा. २. पृ. १४२.

४७. ब्र. सू. २.३.४०–४१ वरील भाष्य, ब्रमीभा. पृ. १५६-१५७.

४८. ब्र. सू. २.३.४१ वरील पशु-पतिसंबंधाचा समारोप ते पुढील शब्दात करतात :

**अतो जीवकृतप्रयत्नापेक्षत्वात् कर्मसु जीवस्य प्रवर्तक ईश्वरो न वैषम्यभाक्, तस्यापि स्वाधीनप्रवृत्तिसद्भावात् विधिनिषेधादि वैयर्थ्यं न सम्भवति ।**

ब्रमीभा. २. पृ. १५६–१५७.

४९. ब्र. सू. २.३.३६–३९.

पशू व पती यांचे ऐक्य 'अयमात्मा ब्रह्म', 'तत्त्वमसि' या वचनांवरून वाटण्याचा संभव आहे. ब्र. सू. २.३.४२-४५ यांच्या विवेचनात श्रीकण्ठ म्हणतात : जीव आणि ब्रह्म यांच्यामध्ये अनन्यत्व भासते ते व्याप्य-व्यापक भावामुळे. अग्नीने सगळीकडून पेटलेले लाकूड, स्वत: अग्नीहून भिन्न व त्याचा काही अंशच अग्नि असला तरी अग्निरूप भासते तसे महेश्वराच्या एका अंशाने हे सर्व जग व्यापले आहे. (श्वेताश्वतर ४-१०). आत्मा ही परमात्मा शिवाची अंशभूत मूर्ती आहे.[५०]

जीव हा जर ब्रह्मांश असेल तर त्याचा आकार केवढा आहे. श्रीकण्ठमते तो अणुप्रमाण असून भावी शरीराची बीजे असलेल्या सूक्ष्मभूतांचे लिंगशरीराने वेष्टित होऊन तो दुसऱ्या शरीरात प्रवेश करतो.[५१] देहान्तरांच्या आकारात फरक असला (उदा. मुंगी व हत्ती) तरी ज्याप्रमाणे दिवा प्रकाशाने लहान मोठी खोली व्यापतो तसा अणुप्रमाण आत्मा आपल्या ज्ञानाने प्राप्त झालेले सर्व शरीर व्यापतो[५२] (**प्रकाशादिवत्– ब्र. सू.** २.३.२४–२७).

## पाश (मलत्रय)

द्वैतवादी शैवाप्रमाणे श्रीकण्ठ (१) मल (पशुत्व, आणव) (२) कर्म आणि (३) माया असे तीन पाश मानतात.[५३] या मलांमुळे जीवाची ज्ञानशक्ती व आनंद मर्यादित होतात ('ज्ञाज्ञौ' इति जीवस्याज्ञत्वं किञ्चिज्ज्ञत्वमेव[५४]) किंवा 'तिरोधान' होते.

## पाश (आणव मल, पशुत्वमल)

देह हाच आत्मा आहे (**देहात्मैक्यभाव**) अशी कल्पना या मलामुळे दृढ होऊन संसारातील सुख:दुखे भोगावी लागतात व जन्ममृत्यूंच्या चक्रात जीव सापडतो. श्रीकण्ठ म्हणतात: "हा जीव अनादि कर्मशृंखलेने बद्ध आहे. त्या त्या कर्मांच्या भोगाला अनुरूप अशा मायामय कलेवरात तो प्रवेश करतो. दुर्निवार्य दु:खे सक्तीने भोगावी लागल्यामुळे व त्यांचे निराकरण करण्यास असमर्थ असल्यामुळे तो शोकसागरांत निमग्न होतो.[५५] अप्पय्य दीक्षित 'तिरोधान' नामक चौथा

---

५०. ब्रमीभा. २. पृ. १५८–१५९.

५१. ब्रमीभा. २. १९६–१९७.

५२. अंशाधिकरणा (ब्र. सू., २-३-४२–५२) वरील भाष्याचा सारांश. समारोपात श्रीकण्ठ म्हणतात– **ततो ब्रह्मणोंऽशभूतो जीवस्तद्विशेषणैकस्वभाव इति युक्तमेव ।** ब्रमीभा. २.१६२.

५३. ब्रमीभा. २. १४२.

५४. ब्रमीभा. २. १४३.

५५. ब्रमीभा. १. ३५०–३५१.

(पण गौण) मल मानतात.[५६] पण वस्तुतः 'तिरोधान करणे' ही शिवाची[५७] शक्ती आहे व ही 'रोधशक्ती' हा पाशच आहे असे ते पुढे स्पष्टीकरण करतात. श्रीकण्ठानी पशुत्वमलापेक्षा माया व कर्म या मलांचे अथवा पाशांचे अधिक विवेचन केले आहे.

## मोक्ष

ज्यावेळी गर्भाधानादि संस्कार झालेला द्विज पंचमहायज्ञादि पापमल नाहीशी करणारी कर्मे करतो, तेव्हा तो मोक्षमार्गाधिकारी होतो. पण वस्तुतः श्रवणमननादी भक्तिज्ञानमार्गामुळे परमकारुणिक व सर्वांवर अनुग्रह करणारा, शिव प्रसन्न होतो तेव्हा त्याच्या कृपेने मल, माया व कर्म हा पाशसमूह नाहीसा होतो.[५८] मोक्ष म्हणजे शिवसाम्यप्राप्ती. त्यासाठी निर्मलत्व आवश्यक आहे. कारण मलत्वामुळे (ज्यामुळे पशुत्व प्राप्त होते) जीवाच्या स्वाभाविक ज्ञान, कर्म व आनंद या शक्ती तिरोहित होतात तो मल नाहीसा झाल्यामुळे प्रकट होतात.[५९] मोक्षावस्थेत जीव शिवसदृश होतो. मोक्षावस्थेत परमशिव पशूपेक्षा भिन्न असतो.[६०] ब्रसू. ४. ४. ४ वर श्रीकण्ठ स्पष्ट म्हणतातः 'मुक्ताचे ब्रह्माशी सादृश्य असते.' '**निरञ्जनः परमं साम्यमुपैति**–' '**मुक्तः शिवसमो भवेत्**' या वचनांत शिवसाम्य किंवा ब्रह्मसदृशता सांगितली आहे. "ब्रह्म जाणणारा" ब्रह्मासारखा (ब्रह्म + इव) होतो हा 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' या वाक्याचा अर्थ आहे. येथे 'एव' शब्द 'इव' या अर्थी योजला आहे (**तत्र ह्येवकार इवार्थे**–अप्पय्य दीक्षित). मुक्तावस्थेत जीवाला शिवासारखे सुखोपभोग असले तरी जगदुत्पत्तीचे सामर्थ्य नसते (**मुक्तस्य परमेश्वरसाम्येऽपि जगत्सृष्टयादिव्यापारवर्जमेव स्वातन्त्र्य-**

---

५६. **जीवानां जीवत्वापादकस्य सकलसंसारनिदानस्य मलावरणस्या-ग्राहकतया।**

५७. **रोधशक्त्याख्यस्य पाशत्वव्यपदेशस्य शिवागमेषु प्रसिद्धत्वात्। यदाहुः 'माहेश्वरी शक्तिः... परानुवर्तनादेव पाश इत्युपचर्यते।** ब्रमीभा १. ५६७–६८.

५८. **तत्र श्रवणमननादिनिश्चितस्य भक्तिज्ञानविशेषाभिमुखस्य परम-कारुणिकस्य महादेशिकस्य सर्वानुग्राहकस्य शिवस्य परब्रह्मणः प्रसादातिशयेना-स्याधिकारिणः प्रध्वस्तपाशपटला . . . कैवल्यलक्ष्मीः प्रयोजनं च भवति–** ब्रमीभा. १-९१-९५

५९. **ब्रह्मप्राप्तजीवस्य मलतिरोहितं ब्रह्मसदृशगुणस्वरूपं पूर्वं सदेव मला-वरणापगमादाविर्भवति। ... सर्वानुग्राहकस्य शिवस्य परब्रह्मणः प्रसादेन स्वावरणे मले विगलिते तत्सदृशगुणमात्मस्वरूपं प्रादुर्भवति।** ब्रमीभा. २. ४८१–८२

६०. ब्रमीभा. २.४२७–२८.

मस्य भोगवस्तुषु) असे श्रीकण्ठ स्पष्ट सांगतात.[६१] (ब्रमीभा. २. ४९६) **ब्रह्माशी भोगादी बाबतीत साधर्म्य असल्यामुळे ब्रह्माशी सादृश्य असणे हेच मुक्तांचे सायुज्य होय.**[६२] मोक्षाचे अवस्थेत जीव हा शिव असतो याचा अर्थ तो पाशमुक्त व पशुत्वमुक्त असतो. कारण शिवत्वाची व्याख्या '**पशुपाशविलक्षणत्व**' अशी आहे' अन् शिवत्व प्राप्त झाल्यामुळे जीवाला पुनर्जन्म नाही (**अनावृत्तिः**). मोक्षावस्थेत मुक्त जीव सर्वक्लेशविरहित, सर्वज्ञ, शुद्ध, प्रज्ञानघन, सत्यसंकल्प, नित्यतृप्त, आनंदस्वरूप, अवाप्तकाम, स्वतंत्र, परमैश्वर्यसंयुक्त होऊन शिवलोकात (मोक्षावस्थेत) निरंतर राहतात.[६३]

मोक्षावस्थेच्या वर्णनावरून श्रीकण्ठांची मोक्षविषय कल्पना केवळ 'दुःखान्त' अशी नकारात्मक नाही हे लक्षात येईल.

## उपसंहार

आतापर्यंत आपण श्रीकण्ठप्रणीत शैव विशिष्टाद्वैताचा अथवा 'शिवाद्वैताचा विचार केला. या मताचा विकास दक्षिणेत झाल्यामुळे त्याच भूविभागात प्रसृत झालेल्या तामिळी (द्वैती) शैवसिद्धान्ताशी किंवा 'सिद्धान्तमता'शी त्याची तुलना करणे उद्‌बोधक ठरेल. दोन्ही मते आगमप्रणीत-शैव आगमांवर आधारलेली-असून 'पति', 'पशु' व 'पाश' या पदार्थांना (catagories) ते मान्यता देतात. संसार हा ईश्वराच्या वैषम्य-नैर्घृण्याचा पुरावा नसून पशूंनी (जीवांनी) आत्मशुद्धी व परिपूर्णत्व प्राप्त करावे या 'पतीच्छे' चा (ईश्वरी इच्छेचा) परिपाक आहे असे दोन्ही मते मानतात. ईश्वरी अनुग्रह, मलनिर्मूलनानंतर मोक्ष (दुःखान्त) प्राप्ती या बाबतीतही उभयतात साम्य आहे. पण या दोन्ही मतात पुढील महत्त्वाचे फरक आहेत.

**(१) आणव मल :**

शैव सिद्धान्तमत अनादि पण सान्त 'आणव' मल (किंवा पशुत्व, अज्ञान, अविद्या) मानते. श्रीकण्ठ 'पशु' संज्ञा 'जीव' किंवा आत्मा या अर्थी मानतात

---

६१. तसेच पुढे (ब्र. सू. ४-४-२१ वर) म्हणतात : **अतो यथा ब्रह्म सकलान् कामान्भुङ्क्ते तथा मुक्तोऽपीति भोगमात्रसाम्यं मुक्तस्य ब्रह्मणेति समीचीनम् ।**
ब्रमीभा. २.५०.

६२. **ब्रह्मणा सादृश्यं सायुज्यं मुक्तानाम्, भोगादिधर्मसाधर्म्यात् ।**
ब्रमीभा. २.५०१.

६३. ब्रमीभा. ४. ४. २२ वरील भाष्य पृ. ५०१–५०६

पण 'आणव' मलाचे परिणाम कर्मवाद व माया यांच्यामुळे होतात असे त्यांचे मत आहे. आणव मल आणि माया यांची कार्ये भिन्न व परस्पर विरुद्ध असतात ही शैव-सिद्धान्ती कल्पना श्रीकण्ठांना मान्य दिसत नाही. वेदान्तमत व आगमिक शैव मत यांच्यामध्ये सांधा साधण्याचा श्रीकण्ठांचा प्रयत्न असावा[६४] असे दिसते. शैव ऐक्यवाद मताशी श्रीकण्ठांचे याबाबतीत साम्य आहे.

(२) **ईश्वर व जग :**

श्रीकण्ठमते जग हे चित् व अचित् (जड) असून चिदानंदमय ईश्वरी चित् शक्तीचा परिणाम आहे. शैव सिद्धान्तमते शक्ति व शक्तिमान अभिन्न असल्यामुळे जग हे भगवान शिवाचे परिनिष्कृत रूप आहे. शैवसिद्धान्तात अतिबाह्य, बाह्य, बाह्य-अंतरीय आणि मध्यवर्ती (अहच्चमयम्) सत्याचे सम्यक् दर्शन असणारी अशा चार श्रद्धा (faiths) मानतात. यापैकी चौथ्या वर्गात श्रीकण्ठप्रणीत शिवाद्वैत बसते.

(३) **पति–उपादान कारण** (material cause) :

श्रीकण्ठ वर उल्लेखलेल्या शेवटच्या विभागापेक्षा अधिक त्या (तामिळी) सिद्धान्तमताशी सहमत होत नाहीत. वर उल्लेखल्याप्रमाणे त्यांचे मत हे चित् व अचित् (चिदचित्) जग पतीच्या चिच्छक्तीचा परिणाम असून ती चित् (Intelligence) व आनंद (Bliss) या दृष्टींनी पतीपेक्षा भिन्न नाही. यामुळे तामिळी शैवसिद्धान्ताला मान्य नसणारे पुढील निष्कर्ष निघतात.

(१) शक्ती व शक्तिमान यातील अभेदामुळे जग हा पतीचा परिणाम (result of the transformation of the Lord) आहे.

(२) अचित् (उदा. शरीर, इंद्रियांचे उपभोग्य विषय) पदार्थ उपभोक्ता जो चित्स्वरूप आत्मा हेही पतितत्वापासून परिणत झाले आहेत.

माया आणि चिच्छक्ति मिळून एकच तत्त्व मानणे तामिळी शैवसिद्धान्तास मान्य नाही. उमापति शिवाचार्यांनी 'संकल्पनिराकरणम्' मधील 'निमित्तकारणपरिणामवादम्' या विभागात श्रीकण्ठांच्या या मताचे खंडन केले आहे. श्रीकण्ठ अचित्-प्रपंचाचे उपादानकारण स्वतंत्र मानत नसल्यामुळे श्रीकण्ठ विश्वाला ब्रह्माचे विवर्तरूप मानतात. कारण चित्चा परिणाम अचित् होऊ शकत नाही असे अप्पय्य दीक्षितांनी म्हटले आहे. वस्तुत: अद्वैतीसुद्धा व्यावहारिक

---

६४. सूर्यनारायणशास्त्री, एस्. एस्., दि शिवाद्वैत ऑफ श्रीकण्ठ, मद्रास युनिव्हर्सिटी, १९३०, पृ. २३.

भूमिकेतून (for emperical purpose) परिणामवाद मानतात आणि या परिणामवादाची परिणति विवर्तवादात होते. सर्वज्ञात्ममुनींनी 'संक्षेपशारीरका'त म्हटलेच आहे:

विवर्तवादस्य हि पूर्वभूमिर्वेदान्तवादे परिणामवादः ।
व्यवस्थितेऽस्मिन् परिणामवादे स्वयं समायाति विवर्तवादः ॥

चित्स्वरूपब्रह्माची अचित् जगात परिणती मानण्यात श्रीकण्ठ विवर्तवादाकडे कलले आहेत.

**(४) तादात्म्य कल्पना :**

तादात्म्य दोन प्रकारचे असते. गुण व गुणी असे एकाच वस्तूचे पृथक्करण करून त्या दोहोतील एकात्मता हा एक प्रकार. आणि ज्यावेळी दोन भिन्न वस्तूंचे साहचर्य अतूट असते हा दुसरा प्रकार. परमात्मा व आत्मा आणि आत्मा व शरीर यांच्या संबंधांत सारखेपणा आहे. परमात्म्याशिवाय आत्मा काही करू शकत नाही. विभक्त न होता ते **एकत्रच** नेहमी कार्य करतात. या एकत्रपणाला 'अद्वैत' म्हटले तर श्रीकण्ठ पहिल्या प्रकारचे तादात्म्य मानतात.

**(५) जीवमुक्ति :**

परिपूर्ण ज्ञात्याला मरणापूर्वी 'याची देही याच डोळा' मुक्ती मिळते असे सिद्धान्त शैवमत मानते. पण श्रीकण्ठांना ते मान्य नाही. ब्रह्मज्ञानी माणसाला त्याचे प्रारब्ध–गतकर्मांचा चालू असलेला भोग–आयुष्याच्या अंतापर्यंत भोगावा लागतो. ब्रह्मज्ञानामुळे तो नवीन कर्मांनी लिप्त होत नाही. ज्ञानप्राप्ती झाली की त्याची पूर्व कर्मे लय पावत नाहीत.[६५] अग्निहोत्रादिकर्मांनी त्यांचा नाश करावा लागतो.[६६] नाही तर ते फळ भोगायला लावते (**प्रारब्धकर्म स्वफलं भोजयितृ केवलम्**).

**(६) आत्म्याचे अणुत्व :**

तामिळी शैवसिद्धान्त जीव 'विभु' ' सर्व व्यापी) आहे असे मानतो. श्रीकण्ठ आत्म्याला अणुप्रमाण मानतात. या मुद्द्यावर त्यांचे आणि रामानुजांचे एकमत आहे.

श्रीकण्ठाना सिद्धान्तशैवी मानण्याच्या प्रयत्नांना उद्देशून एस्. एस्. सूर्यनारायण शास्त्री लिहितात :

---

६५. ब्रमीभा. ब्रसू. ४.१.१५ व १९ वरील भाष्य.

६६. **विद्यानुगुणकर्मणां फलप्रतिबन्धोच्छेदायाप्यग्निहोत्रादिकमनुष्ठेयम्** । ब्रमीभा. २.४४८ (ब्र. सू. ४.१.१८ वरील)

Any attempt to show that S'rikantha is essentially a Siddhantin, is extremely forced and unconvincing.

(शिवाद्वैत ऑफ श्रीकण्ठ, पृ. ७९).

श्रीकण्ठांचा अद्वताकडे कल होता हे वर अनेकदा दाखवले आहे. अनेक ठिकाणी ते रामानुजांची ब्र. सू. संहिता किंवा त्यांचा अर्थ न स्वीकारता कित्येकदा शंकराप्रमाणे व कित्येकदा स्वतंत्र अर्थ घेतात. वर सांगितल्याप्रमाणे श्रीकण्ठ व रामानुज यांची ब्र. सू. संहिता बरीचशी सारखी आहे फक्त १३ सूत्रांमध्ये फरक आहे. पुढील सूत्रे त्यांनी शंकरांच्या ब्र. सू. संहितेप्रमाणे दिली आहेत :

ब्रसू. २.३.४४ व ४९; ३.१.१५; ३.४.३०; ४.२.२; ४.४.८.

श्रीकण्ठांनी शांकरभाष्याप्रमाणे काही ब्र. सू. चा अर्थ केला आहे म्हणून ते अद्वैती होते हे अप्पय्य दीक्षितांचे मत जसे बरोबर नाही तसे ब्र. सू. चा विशिष्टाद्वैती अर्थ करताना रामानुजासारखा ब्र. सू. चा त्यांनी अर्थ केला म्हणून त्याना ' रामानुजमतचोर ' म्हणणे शुद्ध अन्यायाचे होईल. परब्रह्माला शिव किंवा विष्णु संबोधून शिव, जीव व जगत् यांचे संबंध विशिष्टाद्वैती दाखवतांना (दोन्ही ग्रंथकार स्वतंत्र लिहित असले तरी) विवेचनात सारखेपणा येणारच. त्यामुळे याबाबतीत अधिक भक्कम, विश्वसनीय पुरावा मिळेपर्यंत स्वतंत्रप्रज्ञतेचे श्रेय श्रीकण्ठांना देणे न्याय्य ठरेल.

श्रीकण्ठांनी काही सूत्रांचा शंकरांप्रमाणे अर्थ केला आहे तर काहींचा अगदीच स्वतंत्र अर्थ दिला आहे. शिव हे औपनिषद् ब्रह्म मानून त्यांनी विशिष्टाद्वैती अर्थ केल्यामुळे त्यांनी रामानुजाप्रमाणे अनेक सूत्रांचा अर्थ केला असला – आणि एकच तत्त्वज्ञान मांडतांना तसे असणे अटळ आहे- त्यावरून त्यांनी रामानुजांचे अनुकरण केले असे म्हणता येणार नाही. त्यांचे महत्वाचे कार्य म्हणजे ज्या २८ शैवआगमावर[६७] विशिष्टाद्वैती शैवमत आधारले आहे ते श्रुतिप्रणीत आहे असे

६७. ते आगम पुढीलप्रमाणे आहेत :

(अ) शैविक : १. कामिक, २. योगज, ३. चिन्त्य, ४. क(का)रण, ५. अजित, ६. दीप्त, ७. सूक्ष्म, ८. सहस्रक, ९. अंशुम(ा)न् व १०. सुप्रभ.

(आ) रौद्रिक : १. विजय, २. निश्वास, ३. स्वायंभुव, ४. आग्नेय (अनिल?), ५. भद्र (वीर), ६. रौरव, ७. म(ा)कुट, ८. विमल, ९. चंद्रहास (०ज्ञान), १०. बिंब, ११. उद्गीत, १२. ललित, १३. सान्त (सन्तान), १५. नरसिंह (सर्वोत्तर), १६. परमेश्वर, १७. किरण, १८. पर (वातुल, वाटुल).

दाखवणारे ते पहिले भाष्यकार आहेत. असे करताना काही धागे नीट न गुंफले गेल्यामुळे सुटे राहिले असले तरी साकल्याने विचार करता त्यानी आगमिक शैव-मत श्रुतिप्रणीत आहे हे यशस्वी रीतीने दाखवले आहे. त्यांच्या भाष्यावरील निज-गुणशिवयोगीकृत 'तारावली', हरदत्त शिवाचार्यकृत 'श्रीकण्ठभाष्य' व ब्रह्म-विद्याधरींद्र कृत 'वेदान्तसर्वस्वशिवदर्पण' या टीका अद्याप उपलब्ध नसल्या तरी शिवार्कमणिदीपिकेवरून त्यांचा अद्वैताकडे कल दिसतो. पण ते '**शक्त्यादि पृथिव्यन्तं शिवतत्त्वसमुद्भवम्**' अशी आगमप्रणीत ३६ तत्त्वे मानत असल्यामुळे (पहा– ब्रमीभा. १.२.१, २.१.१६ व ३६) वेदान्ताचे २४ तत्त्वापलिकडे (जीव-तत्त्वापलिकडे) १२ तत्त्वे[६८] (७ विद्यातत्त्वे + ५ शिवतत्त्वे) मानणाऱ्या शैवसिद्धान्ताकडेही त्यांचा कल असावा असे दिसते. अर्थात् अद्वैतज्ञान हे 'पशुज्ञान' असून 'पतिज्ञान' त्या पलिकडे आहे असे शैव सिद्धान्तमताप्रमाणे ते मानत नाहीत. ते परमतखंडन सौम्यशब्दात करतात. ते जग मिथ्या मानत नाहीत. जीवाच्या कर्मस्वातंत्र्याला मर्यादा आहेत, पण ते स्वातंत्र्य नाकारत नाहीत. त्यांच्या मते ब्रह्म किंवा शिव मांगल्यमय असून ते अनुग्रहप्रवण आहे. सर्व पशूंना पाशमुक्त करण्यासाठी (त्यांच्या कर्मानुसार जन्म मिळत असले) तरी त्यांच्या मुक्ततेसाठी तो कृपानिधी हे सर्व करवतो आणि शेवटी आत्मौपम्य देतो. मोक्षावस्थेत जीव व शिव भिन्न असले तरी सरूपता, सलोकता, अनिर्वचनीय आनंद इ. बाबतीत त्यांचे शिवाशी साम्य असते. मोक्ष म्हणजे दुःखान्त अशी अभावात्मक कल्पना नाही.

भाष्यकारपरंपरा, बहुसंख्य संप्रदाय इ. बाबतीत रामानुज अधिक भाग्यवान ठरले. पण ब्रह्ममीमांसाभाष्याने वीरशैव संप्रदायाला ब्रह्मसूत्रप्रामाण्य दाखवण्याचा श्रीपतिपंडितांचा मार्ग सुकर केला हे श्रीकण्ठांचे श्रेय मान्य केले पाहिजे.

---

६८. ७ विद्यातत्त्वे : अशुद्धमाया, कला, काल, नियति, विद्या, राग, पुरुष.
५ शिवतत्त्वे : शिव, शक्ति, सादाख्य, ईश्वर, शुद्धविद्या.

□ □

प्रकरण ५ वे

# वीरशैवमत

## ग्रंथसंक्षेप

'वीरशैव '– भिन्न व्युत्पत्ती पण लौकिक ( popular etymologies)– वीर = ' निष्ठावान् निर्धारपूर्वक ' भक्त हा अर्थ शक्य– परंपरा रेवणसिद्धापासून पण रेवणसिद्ध पौराणिक– बसवपूर्व कालामुख आचार्यांना पार्श्वभूमीचे श्रेय – वीरशैवानी पाशुपत कालामुखापासून घेतलेले ऋण– ईश्वराद्वयी काश्मीरी (त्रिक) मतापासून केलेली उसनवारी– वीरशैवमत आगमाधिष्ठित पण स्वत:ला वैदिक-मतानुसारी मानणारे – बसवेश्वर व समकालीन कानडी संतांचे कार्य – वचन-साहित्य – बसवाची वचने मराठी संतसाहित्यासारखी – बसव क्रियाशील समाज-सुधारक आचार्य –श्रीपति पण्डितांचे ब्रह्मसूत्रावरील ' श्रीकरभाष्य '– श्रीपतीचे स्वत:च्या मताला घेतलेले पर्याय व त्यांचे अर्थ – ' विशेषाद्वैत ', ' द्वैताद्वैत ', सेश्वराद्वैत ', ' शिवाद्वैत ', ' सर्वश्रुतिसारमत ', ' भेदाभेद '– मत आगमाधिष्ठित पण औपनिषद तत्त्वज्ञानाशी सुसंगत– श्रीपति.

### पति

परशिव, ब्रह्म – पशु – पाशनियंता – परस्परविरुद्ध गुणदर्शक विशेषणे शिवास लागू – पंचकृत्ये – जग व ईश्वर यातील भेदखंडन – जीव – ईश्वर संबंध सच्चिदानंदस्वरूप, तटस्थ.

### लिंग

लिंग परमतत्त्व – अग्निस्तंभ प्रतीक – लिंग = स्थल निष्कल किंवा मूल लिंग – महालिंग, भावलिंग, प्राणलिंग, इष्टलिंग, पशु, आत्मा, पिंड, जीवाचे

पर्यायशब्द : अणु, आत्मा, पुद्गल इ. — पिंड व अंग यांचे विशेषार्थ – पिंडाचे वर्गीकरण – लिंगांग – सामरस्य – श्रीपति पंडिताची भूमिका – अनेक आत्मे पण ते नित्य – मलशुद्धीनंतर जीव शिव यांचे एकरूप.

विश्वविकास व तत्त्वे – वीरशैवांच्या तत्त्वांतील घटकांचे प्रमाण श्रद्धेय – काश्मीर (त्रिक) शैवमत, सिद्धांत शैवमताप्रमाणे ३६ तत्त्वे – षट्स्थलांना साधन मार्ग म्हणून महत्त्व, तत्त्वज्ञानातील स्थान विवाद्य.

## मोक्ष

शिवैक्य– अभावात्मक संकल्पना नाही– शिवैक्यासाठी षडध्वा (सहामार्ग) वर्ण–पद–मंत्र–कला–भुवन–तत्त्व–शिवकृपा किंवा शक्तिपात होण्याचे सहा प्रकार– (१) महेश्वरतत्त्वाविर्भाव, (२) सदाशिवतत्त्वसाक्षात्कार, (३) शिव–शक्तिसंयोग, (४) सर्वभुवनगमनपरोक्ष दर्शन, (५) अणिमादिऐश्वर्यसंपन्नता, (६) उन्मन्य-वस्थाप्राप्ति–स्थल–अनुग्रहप्रकार.

## काही तुलना

वीरशैवमत व केवलाद्वैत = (१) अध्यासवाद, (२) बिंब–प्रतिबिंबवाद, (३) जगन्मिथ्यात्व–श्रीपति पंडित आणि विशिष्टाद्वैती.

□

# वीरशैवमत

'वीर शैव' या संज्ञेच्या भिन्न 'व्युत्पत्त्या' सांगण्यात येतात. या व्युत्पत्त्या 'वि' किंवा 'वी' आणि 'र' ज्यांच्या आद्याक्षरात आहेत असे दोन शब्द एकत्र आणून साधल्या आहेत. उदाहरणार्थ प्रा. अळ्ळी संपादित 'सिद्धान्त–शिखा–मणी'त (पृ. २२–२५) पुढील व्युत्पत्त्या दिल्या आहेत :

[१] 'वी' म्हणजे शिवजीवाचे ऐक्य (सामरस्य) आहे हे ज्ञान देणारी 'विद्या'. तिच्यात 'र' म्हणजे 'रमणारे' ते वीरशैव.

[२] 'वि' (विद्या–वेदान्तजन्य ज्ञान) त्यात 'र' (=रमणारे) अशीच आणखी व्युत्पत्ती (क्रियासार–३).

[३]. 'वि' (=विकल्प), र (=रहित) विकल्परहित असलेले शैवतत्त्व-ज्ञान व परमार्थ मार्ग.

लोकांच्या बोलभाषेतून संस्कृतचा लोप होऊन प्राकृत भाषा रूढ झाल्या त्यावेळी ज्या संस्कृत मूळ धातूपासून शब्द बनले त्या धातूंच्या अर्थाची विस्मृती

---

१. वीशब्देनोच्यते विद्या शिवजीवैक्यबोधिका ।
तस्यां रमन्ते ये शैवा वीरशैवास्तु ते मताः ॥ ५.१५

२. वेदान्तजन्यं यज्ज्ञानं विद्येति परिकीर्त्यते ।
विद्यायां रमते तस्यां वीर इत्यभिधीयते ॥ ५.१८

३. विशब्दो वा विकल्पार्थो रशब्दो रहितार्थकः ।
विकल्परहितं शैवं वीरशैवं प्रचक्षते ॥ – क्रियासार, ३

(Loss of root sense) होणे स्वाभाविक होते. त्यामुळे पुराणांचे शेवटचे संहितीकरण (redaction) झाले त्यांत (सामन्यत: ख्रि. श. च्या १० व्या शतका-पूर्वी) अशा स्वरूपाच्या व्युत्पत्त्या मान्यता पावल्या होत्या. उदा. 'रुद्र' हा √रुद् पासून निरुक्त होतो हे लोक विसरले व तो शब्द √रु--+ √द्रु- या दोन धातूंपासून झाला असे समजण्यात आले.[४] 'गन्धर्व' हा √धि-धय 'पिणे' या पासून व्युत्पादला गेला.[५] वरील उदाहरणे ब्रह्माण्ड पुराणासारख्या जुन्या ग्रंथा-तली आहेत, इतर पुराणात व त्यानंतर लिहिलेल्या साहित्यात आहेत. तेव्हां ख्रि. श. १००० पूर्वी शब्दव्युत्पत्ती करण्याची पडलेली रूढी ख्रि.श. १२०० नंतर होऊन गेलेल्या वीर शैवांनी मानली तर त्यांना दोष देण्यासारखे काही नाही. ऱ्हस्व-दीर्घ 'वि', 'वी' चे भान राहिले नाही इतकेच. वीरशैव मत ज्या तंत्रांच्या (आगमांच्या) वर आधारले आहे असे मानतात. त्यांपैकी पारमेश्वरतंत्रात (पटल ९.७.२२) कोणत्याही कठिण परिस्थितीत निर्धाराने शैव धर्माचे पालन करणारा तो 'वीर-शैव' असे म्हटले आहे.

'हे पार्वती, रणामध्ये योद्धा ज्याप्रमाणे वीर असतो, त्याप्रमाणे सद्‌भक्ती-मुळे व दृढवैराग्यामुळे पुरुष (परमार्थमार्गात) वीर होतो.[६]

कर्नाटकात 'वीरशैव', तामीळनाडमध्ये 'वीरवैष्णव', महाराष्ट्रात 'वैष्णव वीर' या संज्ञांत 'वीर' शब्द 'निर्धाराने परमार्थप्रवण वा ईश्वरभक्त' या अर्थी वापरत. त्याला व्युत्पत्तीची प्रतिष्ठा मिळवून देण्याचा या वरील 'व्युत्पत्तींत' प्रयत्न आहे. यापेक्षा त्यात भाषाशास्त्रदृष्ट्या स्वारस्य नाही.

वीरशैव आपली परंपरा बसव-पूर्व मानतात. पण रेवणसिद्ध, मरुळसिद्ध, एकोराम, पंडिताराध्य व विश्वाराध्य हे पूर्वाचार्य असून त्यांची उत्पत्ती अनुक्रमे

---

४. ब्रह्माण्ड पुराण १.२.९.७८
रुद्र-रुवतो द्रवतश्चैव एवं युक्तान् सहस्रशः । अयातयामान् सृजतम् इ.

५. उपर्युक्त १-२-८-४१
गन्धर्व— धयेति धातुः कविभिः पानार्थे परिपठ्यते ।
पिबतो जज्ञिरे वाचं गन्धर्वास्तेन ते स्मृताः ।।

६. वीरत्वं नाम देवेशि यथा वीरो रणे भटः ।
तथा मते च सद्‌भक्त्या वीरो वैराग्यतो दृढात् ।। ७

प्रा. अखिल सि. शि. पृ. २३—२४ मधील पारमेश्वरतंत्रातील उताऱ्यातील सर्व श्लोकातून हीच वीरत्वविषयक कल्पना निरनिराळ्या संदर्भात पुनरुक्त आहे.

कोल्लीपाक येथील सोमेशलिंग, उज्जन (जि. बेळ्ळारी) येथील सिद्धेश लिंग, श्रीशैल मल्लिकार्जुन-लिंग, केदारनाथ (हिमालय) येथील रामनाथ लिंग, वाराणसी येथील विश्वेश्वर लिंग यांच्यापासून झाली असे मानतात. त्यांच्या कार्यांबद्दल तर खूपच पौराणिक स्वरूपाच्या कथा सांगतात. उदाहरणार्थ रेवणसिद्धानी मलयपर्वतावर अगस्त्य ऋषींना वीरशैव सिद्धान्त सांगितला.[७] लंकेत बिभीषणाकडून एकाच मुहूर्तावर तीन कोटी लिंगांची स्थापना करवली.[८] आद्य शंकराचार्यांचे बरोबर परकायाप्रवेशावर चर्चा करून त्याने 'चंद्रमौलीश्वर' नामक लिंग त्याना दिले इ. हे सर्व अनैतिहासिक दिसते. यात शंकराचार्य यांनी गौडपाद–गोविंदयती यांची परंपरा सोडून, शाखारंडत्व करून, रेवणसिद्धांचे अनुयायित्व स्वीकारले इ. गोष्टी वीरशैव संप्रदायामधील अंधश्रद्ध लोक वगळता इतराना प्रचारात्मक वाटतील. याचा अर्थ हे रेवणसिद्धादी आचार्य होऊन गेले नाहीत असा नसून 'ऐतिहासिक व्यक्ती व कार्य' या दृष्टीकोनातून या आचार्यांचे बद्दल संशोधन होणे आवश्यक आहे असे वाटते.

बसवपूर्वकाळात त्या संप्रदायाची पार्श्वभूमी निराळ्या घटनानी बनत गेली. खि.श.च्या १० व्या शतकाचे शेवटी इस्लामी आक्रमणानी सोरटी सोमनाथ व मथुरा ही पाशुपतांची केंद्रे उध्वस्त होऊन पाशुपत संप्रदायी पंडित धर्मरक्षणासाठी दक्षिणेत आले. त्या आक्रमणांची थोडी झळ काश्मीरला पोचली व काश्मीरी पंडित आपापल्या ग्रंथसंभारासह दक्षिणेत आले. त्या काळात आजच्या सारखे भाषिक वा प्रांतिक संघर्ष नसल्यामुळे दक्षिणी राजांनी त्यांची विद्वत्ता व त्यांच्यावरील प्रसंग लक्षांत घेऊन त्यांना आधार दिला. देवगिरीच्या यादवांच्या आधारामुळे 'संगीतरत्नाकर' हा ग्रंथ शार्ङ्गधर हा काश्मीरी पंडित लिहू शकला. ती निर्वासित ब्राह्मण घराणी शैव असली तरी त्यापैकी काही लकुलीशाचे अनुयायी असलेले पाशुपत व काही वसुगुप्ताचे परंपरेतील ईश्वराव्दयवादी (काश्मीरी शैवमताचे) होते. त्यापैकी लकुलीशाचे अनुयायानी कर्नाटक व आंध्रप्रदेशाचा लगतचा भाग यात आपला जम बसवला, हे या भूप्रदेशात इ. स. च्या ११ व्या, १२ व्या व १३ व्या शतकाच्या पूर्वार्धात खोदलेल्या शिलालेखांवरून दिसते. हे लिंगधारक ब्राह्मण[९] भस्मधारण, लिंगपूजन करीत. विजापूर जिल्ह्यातील (इ.स. १०७४–७५

---

७. सि. शि. (= सिद्धान्त शिखामणि) = वंशानुक्रम प्रसंग, परिच्छेद ४.

८. उपर्युक्त–परिच्छेद २१–३३.

९. लकुलीशपाशुपतदर्शन–गुणरत्नाची हरिभद्रकृत षड्दर्शन–अमुच्चयावरील टीका.

११४७, ११५८ या वर्षातील) उत्कीर्ण लेखांवरून हे ब्राह्मण लकुलागमात (लकुलीशकृत पाशुपतसूत्र) तज्ज्ञ होतेच पण त्याचप्रमाणे ते वेद, शास्त्र, पुराण, इतिहास व नीतिशास्त्र यात पारंगत होते. योगविद्येवर त्यांचा भर होता. आपल्या शिवलिंग असणाऱ्या मंदिरांना जोडून असलेल्या मठांतून वरील विद्यांचे शिक्षण सर्ववर्णांना देत (हे पाशुपतांचे वैशिष्टय आहे) व त्याबद्दल तत्कालीन राजसत्तांनी केलेली त्या आचार्यांची प्रशस्ती व दिलेल्या देणग्या या शिलालेखांतून नमूद आहेत विशेष म्हणजे त्या लिंगधारक ब्राह्मणांनी स्थापन केलेली केदारेश्वर, सोमनाथ, पंचलिंग इ. महादेवाची (शिवलिंगांची) देवालये आज वीरशैवांची पवित्र स्थळे असून, त्या ब्राह्मणांनी मठ स्थापून विद्यादान करण्यांची जी परंपरा सुरू केली तीच वीरशैवांनी स्वीकारून सर्वत्र रूढ केली आहे. या ब्राह्मणांना 'कालामुख' व मंदिरप्रमुखांना व धर्मगुरूंना 'जंगम' अशी संज्ञा होती. कालामुखांच्या शक्तिपरिषद् व सिंहपरिषद् या उप-पंथांपैकी 'शक्तिपरिषदे'चे कार्य कर्नाटकात अधिक प्रभावी, लोकमान्य व राजमान्य होते.[१०]

वीरशैवांनी पाशुपतांचे द्वैताद्वैत मत, लिंगपूजनाविषयी दृढ (कडवा म्हणावा हवे तर) आग्रह, भस्मधारण, रुद्राक्षधारण, लिंगधारण इ. अनेक आचरण— विशेष आत्मसात केले. पण त्या पलिकडे जाऊन त्यांनी काश्मीरी ईश्वराद्वय वादी ग्रंथकारांचेही आधार घेतले आहेत.

काश्मीरी शैवमतातील परमशिव तत्त्वाबरोबरच शक्तितत्त्वाचे असलेले असाधारण महत्त्व, ३६ तत्त्वसंख्या व त्यांचे वर्गीकरण, मलत्रय, इ, आगमाधिष्ठित तत्त्वज्ञान व स्वत:ला शक्तिविशेषाद्वैती म्हणवणाऱ्या वीरशैवांचे आगमीय तत्त्वज्ञान यातील लक्षणीय साम्यामुळे वीरशैवांना (ईश्वराद्वयवाद वगळता) काश्मीरी शैवमताबद्दल परकेपणा वाटण्याचे कारण नव्हते. या कारणामुळे वीरशैव ग्रंथकार काश्मीरी शैवग्रंथांचे आधार घेतात. उदाहरणार्थ [११] सिद्धान्तशिखामणी (२०.७) मध्ये परात्रिंशिकेतील पुढील कारिका आढळते:

> यथा न्यग्रोधबीजस्थः शक्तिरूपो महाद्रुमः ।
> तथा हृदयबीजस्थं जगदेतच्चराचरम् ।।

---

१०. अधिक माहितीसाठी पुढील प्रकरण 'काही शैवसंप्रदाय' या मधील 'कालामुख' पाहा. तसेच डेव्हिड एन्. लोरेन्झनकृत 'द कापालिकाज अँण्ड कालामुखाज' (पृ. ९६–१७२) पाहा.

११. ही उदाहरणे मी सुधेन्दुकुमार दासकृत 'शक्ति ऑर डिव्हाईन पॉवर' (पृ. २८२–८३) मधून घेतली आहेत.

त्रिकशैवमतांत ' विमर्श ' ही वैशिष्ट्यपूर्ण संकल्पना आहे. पण शिव व शक्ति यांचे संबंध स्पष्ट करताना सि. शिखामणिकाराने ती संकल्पना सि. शिखामणीत भाजन स्थलाबद्दल (२०. १,२,४) मांडली आहे:

विमर्शाख्या परा शक्तिर्विश्ववैचित्र्यकारिणी ।
यस्मिन् (?) प्रतिष्ठिता ब्रह्म तदिदं विश्वभाजनम् ॥
यथा चन्द्रे स्थिरा ज्योत्स्ना विश्ववस्तुप्रकाशिनी ।
तथा शक्तिर्विमर्शात्मा प्रकारे ब्रह्मणि स्थिता ।।

इ. स. च्या १४ व्या शतकातील मरितोण्टदार्य (Maritontadarya) या सिद्धान्तशिखामणीवरील टीकाकाराने उत्पलाच्या ईश्वरप्रत्यभिज्ञेमधील पुढील कारिका घेतली आहे:

चिदात्मैव देवोऽन्तः स्थितमिच्छावशाद् बहिः ।
योगीव निरुपादानमर्थजातं प्रकाशयेत् ॥
(सि. शिखामणि ५.३९ वरील टीका)

अशा पुराव्यावरून उत्तरेकडून इ. स. ११ व्या शतकाचे प्रारंभी आलेल्या शैव पंथानी स्थानिक वीरशैव मताला पाठबळ दिले असे म्हटले तर चूक ठरणार नाही. **पण हे पंथ म्हणजे वीरशैव मताचे पूर्व रूप नव्हत.** कामिकागम, सूक्ष्मागम, वीरागम, परमेश्वरागम इ. आगम ग्रंथातून वीरशैव व त्यांचे आचार यांचे उल्लेख येतात. त्यामुळे आज जरी रेवणसिद्ध, मरूळसिद्ध इ. बसवपूर्व[१२] वीरशैव आचार्यांची आजच्या काळाला पटेल अशी ऐतिहासिक माहिती उपलब्ध नसली तरी ज्याअर्थी आगमात त्या पंथाच्या आचारविचारांचे उल्लेख येतात त्याअर्थी तो पंथ बसवेश्वरापूर्वी कित्येक शतके अस्तित्वात असावा व ज्यांचे मठ अजून अस्तित्वात आहेत असे मानतात ते रेवणसिद्धादि आचार्य प्रत्यक्ष होऊन गेलेले–ऐतिहासिक–पुरुष असावेत असे मला वाटते.

परंतु गंमत अशी आहे की या आगमाधिष्ठित पंथाचे आचार्य व ग्रंथकार स्वतःला वैदिक–वेदानुयायी–म्हणवून घेतात. उदाहरणार्थ ' लिंगधारणचंद्रिका ' या सुप्रसिद्ध ग्रंथाचा लेखक नंदिकेश्वर त्या ग्रंथाच्या पुष्पिकेत स्वतःला वैदिकमतानुसारी विशिष्टाद्वैतमत संस्थापक मानतो:

---

१२. या आचार्यांना काही लेखक असे इतके प्राचीन मानीत नाहीत.

"श्रीमद् वेद–वेदान्त–पुराणागमेतिहाससारभूत–श्रीमद् विशिष्टाद्वैतसिद्धान्त-स्थापनाचार्य... द्वैतकुम्भिकुम्भदलन– रौद्रपञ्चानन– श्रीमन्नन्दीश्वर– विरचितायां लिङ्गधारणचन्द्रिकायाम्–[१३]"

आजही त्या पंथाचे अध्वर्यु –मठपती– आपण वैदिक धर्माचेच अनुयायी आहोत असे सांगतात.

वीरशैव सांप्रदायाची स्थापना 'कामिका' ते 'वातुल' या २८ आगमांवर झाली असे म्हटले असले व त्यातील काहींच्या अलिकडील भागात वीरशैव आचार व विचार आढळले तरी या संप्रदायाची व्यवस्थित मांडणी करण्याचे श्रेय मुख्यतः बसवेश्वर, अल्लम प्रभु, सिद्ध रामेश्वर, चन्न बसवेश्वर व श्रेष्ठ स्त्रीसंत अक्कमहादेवी यांना आहे. ते सर्व श्रेय बसवेश्वराना दिले पाहिजे असे प्रा. साखऱ्यांचे आधारे धारवाडचे कुमारस्वामी म्हणतात.[१४] असे सांगतात की बसवेश्वर व त्यांच्या समकालीन संतानी कल्याणि (जि. बीदर, कर्नाटक) येथे 'शून्यसिंहासना'ची स्थापना करून आपल्या आध्यात्मिक चर्चेतून कानडीत 'वचनसाहित्य' निर्माण केले. विजापूर जिल्ह्यातील बागेवाडीच्या ब्राह्मण घराण्यात जन्मलेल्या बसवेश्वराबद्दल लिंगायत व जैन पुराणकारांनी इतके परस्परविरुद्ध लिहिले आहे की त्या घटनांची सुसंगती लावण्यापेक्षा खुद्द बसवेश्वरांच्या वचनांतून प्रगट झालेल्या तत्त्वकल्पना लक्षात घेणे बरे. ही वचने वाचतांना मी (मराठी) सकलसंतगाथा तर वाचत नाही ना असे वाटले. इ. स. च्या ११ व्या शतकात भक्ति–संप्रदायाची चळवळ आसेतुहिमाचल पसरत होती. त्यामुळे १२ व्या शतकानंतर भारतीय संत मग ते तामीळी अळवार असोत वा आसामी वैष्णव असोत, कानडी वीरशैव असोत वा मराठी वारकरी असोत, त्यांच्यामध्ये परमेश्वरभेटीची उत्कटता, ईश्वरी नामस्मरणावर भर, कर्मकांडाविषयी तिरस्कार, सर्वभूती समभावाचा प्रचार इ. बावतीत फार मोठे साम्य आढळते. गुरुदेव रा. द. रानडयांनी 'अध्यात्मवाद' (Mysticism) या विषयामध्ये मराठी, कानडी व हिंदी संतांचे एक मत वा प्रभावी साम्य असल्याचे दाखवले आहे. पण ती एकता इतर क्षेत्रातही दिसते. बसववचनावरून तो भक्तिमार्ग प्रचारक संत होता असे दिसते. उदाहरणार्थ, नाममहात्म्याबद्दल तो म्हणतो.

'हत्ती अंकुशाला भितो, पर्वत वज्राला भितो. दिवा येताच अंधार नाहीसा होतो. तशी भक्ताची पंच महापातके कूडलसंगमदेवाच्या नामाने नाहीशी होतात.

---

१३. एम्. आर. साखरे संपादित 'लिंगधारणचंद्रिका', खंड १, बेळगाव.

१४ Hist. of Philosophy Eastern and western-Pp. 395-96 तसेच Hist. and Philosophy of Lingayat Religion, Pp. 426-27.

हे कूडलसंगमदेवा ! (सर्वकामनापूर्ती करणाऱ्या) कामधेनूप्रमाणे तुझे नाम आहे.

**परमेश्वर भेटीची आर्तता :**

नटून थटून पतीची वाट पहाणाऱ्या (पण पती न येणाऱ्या) पतिव्रतेप्रमाणे मी भस्म व रुद्राक्ष धारण करून तुझी प्रतीक्षा करीत आहे. माझ्या घराण्यात कोणी वाममार्गाला गेले नाही. कूडलसंगमदेवा ! तूच कृपा करून मजकडे पाहा.[१५] तुझे आगमन होणार म्हणून जाहीर झाले पण तू आला नाहीस. मी रस्त्यावर डोळे लावून बसलो आहे... कूडलसंगमदेवा[१६] तुझे 'शरण' जर आले नाहीत तर मी प्राणत्याग करीन.'

बसवेश्वरांनी शास्त्रीय पद्धतीने तत्त्वज्ञानपर लिखाण केले नाही पण त्यांच्या वचनातून तत्त्वज्ञानाचे कण वेचता येतात. उदाहरणार्थ :

**लिंगकल्पना :**

'सर्व विश्वापेक्षा अधिक तेजस्वी असलेले व इंद्रासह सर्वप्राणिमात्रांच्या अतीत असलेले लिंग अचिन्त्य– Incomprehensible आहे. ते आनंदरूप आहे आणि हजारो सूर्यांच्या प्रभेपेक्षा ते दीप्तिमान आहे.[१७]'

या तेजाचा साक्षात्कार झाल्यानंतरची स्थिती :

'संगमकूडलदेवाच्या महाप्रकाशात विलीन झालेला प्रकाशरूप मी मूक (शब्दहीन) का झालो कळत नाही.[१८]'

'(जगदात्म्यांत विलीन झाल्यावर) नाद, बिंदु, कला यांच्या अतीत असलेल्या कूडलसंगमदेवाचे रूपाने तो प्रकट होतो आणि ते संगमसौख्य तो जाणतो.[१९]'

**द्वैताद्वैतमताचा उल्लेख :**

'पूज्य आणि पूजक यांच्यातील द्वैत संपण्यापूर्वीच मी कूडलसंगमदेवाची पूजा

---

१५. भक्तस्थल-वचने वचने, १६७, पृ. ११५.

१६. माहेश्वरस्थळ वचने, १८३, पृ. ३९६.

१७. ऐक्यस्थल वचने, वचन ३४. पृ. ५४०.

१८. ऐक्यस्थल वचन ३५, पृ. ५४०.

१९. ऐक्यस्थल वचन, ३७ पृ. ५४२.

करू शकलो ' (प्रथम पूज्य-पूजक हे द्वैत असते आणि नंतर दोहोत अद्वैत निर्माण होते).[२०]

' हे कूडलदेवा ! तुझ्या पादपद्माचे ठिकाणी ध्यान पूजादी करण्यात मग्न तो इतर भक्तगणांचा शिखामणी होय. ' बसवाचे मते स्वर्ग, विष्णुलोक, शिवलोक इ. सर्व याच लोकात आहेत. ' भक्त असेल तोच देवलोक. त्याचे अंगण वाराणसी होय. त्याचे शरीर कैलास होय, संगमकूडलदेवा, हे सत्य आहे.[२१] '

बसवेश्वरांचा वैयक्तिक साधनमार्ग बहुधा पतंजलीप्रणीत योग असावा हे त्यानी सुषुम्नानाडीतून प्रवास करीत सहस्रदल कमलावर शिवमंदीर बांधावे म्हणजे त्यात ' कूडलसंगमदेव ' येतो आणि तेथे आपल्याला त्याचा साक्षात्कार झाला[२२] असे म्हटले आहे, त्यावरून वाटते. पण त्यांनी गुरूभक्तीवर व अन्न खातांना सुद्धा ग्रासोग्रासी नाम घ्यावे[२३] इ. केलेला उपदेश मराठी संतांप्रमाणे आहे.

वैयक्तिक जीवनात बसवेश्वर समाजसुधारक होते. चंद्रभागेच्या वाळवंटात जातिभेद विसरल्याचा देखावा करावयाचा आणि घरी परतल्यावर पदराला पदर लागतो कां ही चिकित्सा करून मुलामुलींची लग्ने ठरवायची असा प्रकार त्यानी केला नाही. त्यांचा विवाह अनुलोम म्हणून धर्म्य असला तरी तत्कालीन रूढीला सोडून असल्यामुळे तो समाजसुधारणेच्या प्रयत्नात जमा होतो. तथापि डॉ. एस. के. दास यांनी ' शक्ति ऑर डिव्हाइन पॉवर ' या ग्रंथात म्हटल्याप्रमाणे जातिभेद तत्कालीन सर्वसामान्य वीर शैवात रूढ असावा. त्यांनी सदर ग्रंथात पृ. २८७ वर दिलेल्या आधारांपैकी आगमातील वर्गीकरण मला जातीय न वाटता आध्यात्मिक वाटते. पण चन्नवृषभेंद्रस्वामिविरचित " वीरशैवसर्वोत्कर्षप्रदीपिका, पृ. २० (सोलापूर आवृत्ती)" मध्ये म्हटले आहे :

' लिंगधारी क्षत्रिय वैश्यादि सामान्य वीरशैव, लिंगधारी प्रगत ब्राह्मणांना माहेश्वर व आराध्य म्हणतात. संसारत्याग करून सर्वबंधनाच्या भारातून मुक्त झालेले (निराभार) यति अथवा जंगम होत.[२४] '

---

२०. शरणस्थळ, पृ. ५२८ वचनाचा आकडा मूळ ग्रंथात नाही.

२१. भक्तस्थळ वचन, ८३ पृ. ५३.

२२. प्राणलिंगिस्थलवचने : वचन १८ पृ. ४४४, वचन १९ पृ. ४४५.

२३. प्रसादिस्थललिंगवचने, वचन २०, पृ. ४२६.

२४. क्षत्रियवैश्यादयो लिङ्गिनः सामान्य–वीरशैव (Sic) भक्त–माहेश्वरा-राध्याभिधब्राह्मणा लिङ्गधारिणो विशेषवीरशैवा लिङ्गाङ्गिब्राह्मणयतिनो निराभार इति निर्म्मीयते। डॉ. एस. के. दास, शक्ति आर्. डिव्हाइन पॉवर, पृ. २८७.

यानंतर डॉ. दास म्हणतात : These Three divisions represent the three orders of laity . . . and also seems to have mueh to do with the distinction of caste. [२५]

भारतीय समाजाची जातीय घडण लक्षात घेता डॉ. दासांच्या विधानात पुष्कळसे तथ्य असावे. कारण जातिभेद हा भारतीय समाजव्यवस्थेचा असा चिवट विशेष आहे की धर्म बदलला तरी तो तुटत नाही. वीरशैवांत आजही जातिभेद आहेत. तेव्हां बसवेश्वरांचे काळी ते कदाचित् अधिक तीव्र असतील. बसवानी ते कमी करण्याचा प्रयत्न केला व त्या मर्यादेपर्यंत त्यांना समाजसुधारकपणाचे श्रेय द्यायला हरकत नसावी.

बसवेश्वराबद्दल आणखी एक समजूत म्हणजे ते बिज्जळ राजाला घाबरत. ' आनन्दं ब्रह्मणो विद्वान् न बिभेति कदाचन ' या अवस्थेतील त्या पुरुषाने बिज्जळाचे बाबतीत त्याचे नाव उल्लेखून म्हटले आहे.

" मी बिज्जळाला भितो काय ? (नाही) हे कूडलसंगमदेवा ! सर्व जीवांवर दया करणारा जो तू त्या (फक्त) तुला भितो. [२६] "

वीरशैवमतस्थापना व प्रसार या दृष्टीनी बसवेश्वरांचे कार्य महत्त्वाचे असले तरी तत्त्वज्ञानाची सुसूत्र मांडणी श्रीपति पंडितांनी ब्रह्मसूत्रावर ' श्रीकरभाष्य लिहून केली. पूर्वीच्या पंडितांना आपले तत्त्वज्ञान ब्रह्मसूत्रात सागितले आहे असे दाखविण्याची आवश्यकता वाटे. सर्व उपनिषदांमधील तत्त्व विचारांचे समन्वय करणारा तो ग्रंथ बादरायणानी लिहला व हे बादरायण म्हणजे भगवान वेदव्यास अशी त्यांची श्रद्धा होती. त्यामुळे शंकराचार्यांचे केवलाद्वैत, रामानुजाचार्यांचे विशिष्टाद्वैत, मध्वाचार्यांचे द्वैत, यामताप्रमाणे श्रीकण्ठप्रणीत शैव विशिष्टाद्वैत व शक्तिविशिष्टाद्वैत (वीरशैवमत) यांची स्थापना ब्रह्मसूत्रांचे आधारे करण्यात

---

२५. उपर्युक्त, प्रकरण ३, पृ. १९४–१९५

२६. मूळ कानडी वचन असे :
**आनी बिज्जळंगंजुवेनो अय्य ? कूडल संगमदेव। नीनु**
**सर्वजीवदयापारियादकारण निम गंजुवेनल्लदे ।**

बसवगीता, वचन १८२, पृ. ३९६

मी इतरत्र बसववचनांचा अनुवाद संक्षिप्त दिला आहे. पण बसवेश्वराचा निर्भयपणा दाखवणारे वचन त्याचा स्वभावविशेष दाखवणारे असल्यामुळे मुळातून दिले आहे.

आली. श्रीपतिपंडित हे खि. श. च्या ११ व्या शतकात होऊन गेले. ते विजयवाटिका (बेझवाडा) येथील रहिवासी. अनंतपाल राजाच्या पदरी ते आस्थान पंडित होते. पुढे ते यति झाले पण त्यानी मंगलाचरणामध्ये रेवण, मरूळ व एकोराम याना वंदन केले आहे. यावरून त्या काळातील ब्राह्मण पंडितांना वीरशैव मताबद्दल आदर होता इतकेच नव्हे तर ब्रह्मसूत्राच्या आधारे सिद्ध होणारे ते वेदान्त मत आहे असे वाटत होते. श्रीपति श्रीकण्ठ व रामानुजांचा उल्लेख करतो व श्रीभाष्यातील अवतरणे घेतो.

ग्रंथाचे प्रारंभी शिव ते एकोराम या गुरुपरंपरेला वंदन करून आपण ' दुर्वादींचा ' गर्व हरण करणारे, सत्यार्थ प्रतिपादक सर्व उपनिषदांचे सार असलेले विशेषाद्वैताचे मंडन करणारे व वेद अन् आगम जाणणाऱ्या मुमुक्षू शैवासाठी (की जे विशुद्ध वैदिक आहेत ? त्यांच्यासाठी) हे श्रीकरभाष्य रचले आहे असे तो म्हणतो.[२७] त्याने आधारार्थ वापरलेली ' अगस्त्यसूत्रवृत्ति ' अद्याप उपलब्ध नाही. रामानुजाने श्रीभाष्यात वैष्णव आगम व उपनिषदे यांचा समन्वय करून जसे विशिष्टाद्वैत मत मांडले तसे श्रीपतीने आपले (शैव) आगम व वेदांत यांचा समन्वय करून ब्रह्मसूत्रे वीरशैव तत्त्वज्ञानपर आहेत हे त्याने श्रुतिवचनांच्या आधारे दाखवले आहे. रामानुज व मध्व यांच्या भाष्याधारे त्याने शांकराद्वैतावर हल्ला केला आहे व त्याचबरोबर रामानुजांनी प्रतिपादन केलेल्या चित्, अचित व ईश्वर यांच्या विशिष्ट संबंधावर, मध्वांनी प्रतिपादलेल्या जीव आणि ईश्वर यातील भेदावर टीका केली आहे. वीरशैवतत्त्वज्ञानाची विस्तृत पण व्यवस्थित मांडणी करणारा ग्रंथ म्हणून मुख्यतः या ग्रंथाचे आधारावर पुढील विवेचन आहे.

---

२७. श्रीवैय्यासिकब्रह्मसूत्रपदमुख्यार्थं शिवानुग्रहात् ।
भाष्यं ' श्रीकर ' नामकं भवहरं दुर्वादिगर्वापहम् ॥
श्रीमच्छ्रीपतिपण्डितेन्द्रयतिना व्याचक्षते सांप्रतम् ।
सर्वानर्थविनाशकं बुधनुतं तत्त्वार्थबोधाकरम् ॥ ११ ॥

अशेषोपनिषत्सारविशेषाद्वैतमण्डनम् ।
शिवज्ञानप्रदं सूत्रभाष्यं जयतु सर्वदा ॥ १२ ॥

वेदागमार्थतत्त्वज्ञशैवानां मोक्षकांक्षिणाम् ।
वैदिकानां विशुद्धानामे एतद् भाष्यं हि कल्पकम् ॥ १३ ॥

श्रीकरभाष्य, मंगलाचरण, पृ. २

श्रीपति स्वतःच्या मताला ‘विशेषाद्वैत’, ‘द्वैताद्वैत’, ‘सेश्वराद्वैत’, ‘शिवाद्वैत’, ‘सर्वश्रुतिसारमत’ व ‘भेदाभेद’ असे पर्यायशब्द आहेत असे सांगतो.[२८]

या मनात अंतिम सत्य जे शिवतत्त्व त्याच्याशी सायुज्यता प्राप्त होण्यासाठी भक्ति हे महत्त्वाचे साधन मानतात. भक्ति म्हटली म्हणजे भक्त व ज्याची भक्ती करावयाची तो शिव, पूजक आणि पुजनीय वस्तु, ध्याता आणि ध्येय, शरण जाणारा शिव व शरण्य (शिव) यांचे स्वतंत्र अस्तित्व (द्वैत) मानावे लागते. पण नदी सागराला मिळाल्यावर सागराशी एकरूप होते-अद्वैत साधते-त्याप्रमाणे भक्त शिवाशी एकरूप होतो-सायुज्य वा अद्वैत साधतो. त्यामुळे द्वैताची अद्वैतात परिणति होते असे मानणाऱ्या या मताला ‘द्वैताद्वैत’ म्हटले आहे.

या मताला ‘सेश्वराद्वैत’ म्हणण्याचे कारण या मतामध्ये ‘ईश्वर’ किंवा पति’ हे आद्य तत्त्व आहे. ते क्रियाशुन्य नसून कर्तुम्-अकर्तुम-अन्यथा-कर्तुम, असे करण्याचे सामर्थ्य त्याच्या अंगी आहे. ज्याप्रमाणे खोड, फांद्या, पानें, फुलें, फळें ही वृक्षाची विविधता त्याच्या बीजात असते त्या प्रमाणे अखिल विश्वाची विविधता ईश्वराच्या शक्तीमध्ये असते. अग्नीमध्ये दाहकतेची शक्ती असते पण अग्नी आणि दाहकता यांच्यात अभेद असतो तसा शक्ति व शक्तिमान् (ईश्वर) यात अभेद आहे. त्यामुळे ईश्वराशी अद्वैत प्रतिपादन करणारे मत म्हणून यास ‘ सेश्वराद्वैत म्हणतात.

आपल्या मताला ‘अद्वैत’ न म्हणता ‘विशेषाद्वैत’ का म्हणतो याचे स्पष्टीकरण करताना श्रीपतिपण्डितानी आपली भूमिका पुढील प्रमाणे मांडली आहे.

“सृष्टीची उत्पत्ती होण्यापूर्वी महेश्वराचे ठिकाणी जगाचे कारण होणारी प्रकृती वा स्वभाव असतो. ज्ञान, बल व क्रिया जिच्यामध्ये आहे अशी विविधरूपी श्रेष्ठ (परा) शक्ती त्याच्या ठिकाणी आहे. शक्ति व शक्तिमान् यांच्यात भेद नसतो. म्हणून सकल प्रपंचाचे मूळ कारणीभूत होणाऱ्या शक्तीचे ईश्वराचे ठिकाणी अधिष्ठान असल्यामुळे व ते त्याच्यापासून अभिन्न आहे असे सिद्ध

---

२८. एतद् द्वैताद्वैतमतमेव । केचिद्विशेषाद्वैतमिति ।
सेश्वराद्वैतमिति । शिवाद्वैतमिति । सर्वश्रुतिसारमतमिति ।
भेदाभेदमिति पर्यायत्वेन वदन्ति । श्रीकरभाष्य २.१.५ १३ पृ. १९५
त्याकाळी ‘अद्वैत’ शब्दाला भाव होता असे दिसते.
उदा. शून्याद्वैत (बौद्ध), शब्दाद्वैत (पाणिनिदर्शन), शाक्ताद्वैत इ.

झाल्यामुळे आणि परमेश्वरच (विश्वाचे) निमित्त व उपादान कारण असल्यामुळे 'भेदाऽभेद' सिद्ध करणारे हे मत 'विशेषाद्वैत' आहे.[२९]

'विशेषाद्वैतमध्ये 'विशेष' हे पूर्वपद केवळ द्वैत किंवा केवळ अद्वैत असिद्ध आहे असे दाखवते. जीव व शिव यांच्यामध्ये चैतन्यगुण समान असल्यामुळे जरी अभेद असला, तरी जीव अणु आहे आणि शिव विभु (सर्वव्यापी) आहे; जीव किंचित्, अल्प जाणणारा आहे तर शिव सर्वज्ञ आहे असे परस्परविरुद्ध धर्म स्पष्ट दिसत असल्यामुळे जीव आणि शिव यात मूलगामी (Fundamental) भेद आहे. त्यांची जाति (genus) एक असली तरी उपजाति (species) भिन्न आहेत. श्रीपतीच्या मते 'विशेष' म्हणजे 'वि' (जीव) आणि 'शेष' (विश्वव्यापक शिव) या वि-शेषांचे अद्वैत म्हणजे विशेषाद्वैत (**विश्च शेषश्च तयोरद्वैतम्**) जीव आणि शिव यांच्यात द्वैत असले तरी 'भ्रमर-कीटकन्यायाने' जीवाने शिवाचे केलेले अखंड चिंतन व निदिध्यास यामुळे जीव शिवातील द्वैत नाहीसे होऊन जीवाला शिवत्व प्राप्त होते.[३०]

शिवाद्वैत : या मताला 'शिवाद्वैत' म्हणण्याचे कारण परमतत्त्व जे शिव ते विश्वव्यापक असून विश्वातील विविधवस्तुजात-स्थावर,जंगम-त्याच्या इच्छेने निर्माण होतात. त्या निर्माण झाल्यातरी त्याच्यामध्येच त्या असतात (त्याच्या बाहेर त्यांना अस्तित्व नसते) व त्याशेवटी त्याच्यातच विलीन होतात. परमशिवात हे विश्वजात सामावलेले आहे. त्यामुळे ते शिवापेक्षा वेगळे नाही.

सर्वश्रुतिसारमतः श्रुतीमध्ये द्वैतपर व अद्वैतपर अशी परस्पर विरुद्ध वचनें आहेत. पण वीर शैव मतात द्वैताद्वैताचा पुरस्कार असल्यामुळे परस्पर विरोधी वचनांची संगती लागते. एका दृष्टिकोनातून द्वैत बरोबर असले तरी दुसऱ्या दृष्टीने अद्वैत सत्य असते. समुद्राला मिळण्यापूर्वी नदी निराळी, समुद्र निराळा हे द्वैत असले तरी समुद्रसंगमानंतर द्वैत संपते. अद्वैत कारणावस्था दाखवते द्वैत

---

२९. ननु महेश्वरे सृष्टेः पूर्वं जगत्कारणप्रकृतिसद्भावात् ' कथमद्वैतत्वम् ' इति चेन्न, 'देवात्मशक्तिं स्वगुणैर्निगूढाम्। 'परास्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकि ज्ञानबलक्रियाचेत्यादिश्रुतिशतेषु तच्छक्तेस्तदभिन्नत्वदर्शनात्। न शक्तिमतोस्स्वाभाविकपृथक्त्वम्। तस्मात्सकल-प्रपञ्च-परमकारणीभूतचिच्छक्त्यधिष्ठानत्वे सति तदपृथक्सिद्धत्वेन परमेश्वरस्य अभिन्न-निमित्तोपादानकारणत्व-व्यवस्थापक-भेदाभेद 'विशेषाद्वैत्त'भेद सर्व-वेदान्त-सिद्धान्त-घण्टा-घोषः।

— श्रीकरभाष्य II १-३-१-७ पृ. १३५–३६

३०. श्रीकरभाष्य II पृ. १३६

कार्यावस्था बीज एकच असते पण त्यातून निर्माण होणारी फांद्या, पाने, फुले, फळे, ही अनेक असतात. त्यामुळे या मताने द्वैताद्वैताचा पुरस्कार केला आहे.

शक्तिविशिष्टाद्वैत: वीरशैवयते आत्मभाव (selfconsciousness) असलेल्या अवस्थेत रूप, आकार वा आकृतिबंध (form) व भूत किंवा जडद्रव्य (matter) हा फरक असेल, पण सत्ता व ज्ञप्ति (Being and Knowing), शिव आणि शक्ति यांच्यामध्ये कायमचे द्वैत नसून शक्ति व शक्तिमान एकच असतात. सत्तेमध्ये ज्ञप्ति सामावलेली असते असे शिवशक्ति समावेशन प्रतिपादन केल्यामुळे या मतास शक्तिविशिष्टाद्वैत म्हटले आहे. [३१]

## पति, पर-शिव, ब्रह्म

वीरशैवमत आगमांवर आधारलेले असले तरी ते औपनिषद तत्त्वज्ञानाशी विसंगत नाही. 'वेद आणि आगम यांचा कर्ता एकच-शिव आहे. या त्यांच्या श्रद्धेला यामुळे आधार मिळतो. या मतात 'पति' किंवा 'पर-शिव' हे औपनिषद ब्रह्माचे पर्यायशब्द आहेत. परशिव हा त्यांच्या मतातील ३६ तत्त्वांपैकी पहिले तत्त्व जे 'शिव' त्याच्या म्हणजे पर्यायाने सर्व तत्त्वांपलिकडील. तो या विश्वाचे उपादान व निमित्तकारण आहे. पति या नात्याने 'पशु' व 'पाश' यांचा नियन्ता आहे. तो 'सविशेष' आहे याचा अर्थ तो मर्यादित आहे असा नव्हे. परब्रह्माविषयी 'नेति नेति' म्हणणे म्हणजे परब्रह्माचा 'विशेष' सांगणेच असते. परमशिव हा सगुणही आहे व निर्गुणही आहे. तो स्वतःच्या शक्तींचा संकोच करतो तेव्हां निर्गुण असतो व आपल्या शक्तींचा विकास करतो तेव्हां तो सगुण होतो. त्यामुळे सगुण-निर्गुण, सावयव-निरवयव, इ. बाह्यतः परस्परविरुद्ध गुणदर्शक विशेष परमशिवाचे ठिकाणी संभवतात. [३२] विश्वाचे सर्जन (सृष्टि) पालन (स्थिति) संहार (लय) तिरोधान व अनुग्रह ही परमशिवाची पंचकृत्ये आहेत. [३३]

---

३१. कुमारस्वामी-Virasaivism : Hist : of Philosophy : eastern & western p. 398.

३२. यतो (ब्र. सू. १.१.२ मधील यतः)- यस्मात् स्वाभाविकानन्त-शक्तिविशिष्टब्रह्मणः संभवति तद् ब्रह्म... सर्वाधिष्ठानस्य ब्रह्मणः निर्गुणत्वान्निरवयवत्वान्नित्यत्वात् ..असत्कारणत्व-सत्कारणत्वं सदसद्व्यतिरिक्तपरशिवकारणत्वं... बहुविप्रतिपत्तिर्हश्यते । - श्री. भा. II. २९ मधील सर्व परिच्छेद.

३३. जन्मादिसृष्टिस्थितिविलयतिरोधानानुग्रहात्मकं कृत्यपञ्चकं अस्य चिदचित्प्रपंच-विलासस्य । श्रीभा. II. पृ. २९.

जग व ईश्वर यातील भेदाचे खंडन करताना श्रीपती म्हणतो : कारण व कार्य यांचे अनन्यत्व असते. मातीपासून केलेली भांडी प्रारंभी व शेवटी मातीच असतात. '**असद्व्यपदेश**' सूत्रावर (ब्र. सू. २.१-६.१७) तो म्हणतो :

'सृष्टीच्या पूर्वी (निर्मीती होण्यापूर्वी) हे जग सूक्ष्मावस्थेत होते म्हणून त्यास '**असत्**' (=सूक्ष्म) म्हटले आहे. सर्जनानंतर — स्थूलरूपांतरात त्याला '**सत्**' म्हटले आहे. जग आणि ईश्वर यामधील अभेदाचे मंडन करणारा श्रीपति-पंडित परमशिव हा 'कारणरूप' आहे व त्याच्यापासून होणारे जग किंवा संसार सत्य असला तरी तो 'कार्यरूप' असल्यामुळे त्याच्यापासून भिन्न आहे असे म्हणतो. "कूर्म जसे बाहेर काढलेले पाय वा अवयव आत आवरून घेतो त्याप्रमाणे परम-शिव सर्जनप्रसंगी प्रकट केलेले नामरूपात्मक जग प्रलयाचे वेळी स्वत:मध्ये लीन करून घेतो.[३४] किंवा योगी समाधी लावताना प्राणायामाने प्राणापानादि वायूंचा संकोच करतो व समाधीतून व्यावहारिक भूमिकेवर येताना पुनः त्याना सोडतो त्याप्रमाणे परमेश्वर सृष्टी उत्पन्न करताना जगाचे प्रसरण व संहार करताना आकुं-चन करतो. त्यामुळे परमकारण असलेला परशिव हा कार्यरूप असलेल्या जगापासून भिन्न आहे असे सिद्ध होते.[३५]

जीव व ईश्वर यांचा संबंध शरीर व शरीरी (आत्मा) असा असला तरी ईश्वर नित्यमुक्त असतो. ज्याप्रमाणे आकाशात (अवकाशात) सर्व जगे असली तरी आकाश सर्व जगताच्या कलंकापासून मुक्त असते. त्याप्रमाणे परमशिव सर्वांचे कारण असला व सर्वान्तर्यामी असला तरी तो सर्व दोषांपासून अलिप्त असतो.[३६]

---

३४. यथा कूर्मः स्वशक्त्या स्वपादाद्यवयवानि स्वेच्छया बहिर्गतानि कृत्वा पुनः स्वात्मनिवेशनं करोति तथा परमशिवस्सृष्टिकाले नामरूपविभागवत्वेन बहिः प्रकटी-कृत्य प्रळ (ल)ये स्वात्मनि प्रपञ्चं गोपायति ।

श्रीभा. (ब्र. सू. २.१ १८) II. पृ. १९८.

३५. यथा शिवयोगी परमशिवध्यानकाले प्राणायामादिना वायुसंकोचनं करोति... व्यवहारकाले प्रसारणादि कार्यं करोति । तद्वत् परमेश्वरस्सृष्टिकाले जगत्प्रसारणं प्रलयकाले तदाकुञ्चनं करोति, तस्मात् परमकारणपरशिवात् कार्यरूपं जगदन्यत् सिद्धम् । एतदधिकरणे जगदीश्वरभेदवादं जगन्मिथ्यावादं च निरस्तत्वेन भेदाऽभेदमतमेव स्वाभिप्रेतम् । श्रीभा. (ब्र. सू २.१ २०) II पृ. १९८.

३६. लोके यथाऽऽकाशस्सर्वगतत्वेऽपि सर्वकारणत्वेऽपि स्वसृष्टजगद्दोषकळं-(लं)क निर्मुक्ततया व्यवस्थितः तथा परमेश्वरः सर्वकारणत्व–सर्वशरीरत्व–सर्वान्त-र्यामित्वेन व्यवस्थितोऽपि सर्वदोषकळं(लं)कविलक्षणः ।

श्रीभा. (ब्र. सू. २.१.१३) II. पृ. १९४.

परशिव स्वतंत्र आहे. त्याचे शरीर कार्मिक ( =कर्म जन्य ) नसल्यामुळे त्याला सुखदुःखादि द्वंद्वें स्पर्श करीत नाहीत. पशू (जीव) अनादि कर्मामुळे सुखदुःखे भोगतात. त्यात परशिवाचे (पतीचे) वैषम्य वा नैर्घृण्य नाही.[३७] तो पशूंना मलापासून मुक्त करून अनुग्रहपूर्वक स्वत त विलीन करून घेतो. अनादिमलामुळे प्रारंभी पशू हे पतीपासून भिन्न असले तरी ज्याप्रमाणे नद्या समुद्रसंगम होण्यापूर्वी भिन्न असल्या तरी संगमानंतर त्या समुद्ररूप होतात त्याप्रमाणे मोक्षावस्थेत प्रारंभी शिवापेक्षा भिन्न असणारे जीव (पशू) शिवाशी एकरूप होतात.

परशिवाच्या वरील वर्णनावरून तो सच्चिदानंद स्वरूप असून 'तटस्थ' आहे. परशिव-प्राप्ती ही अध्यात्मिक अनुभूतीची परिसीमा होय.

श्रीपतीने ब्रह्मसूत्रांचे आधारे वीरशैवांची परशिवविषयक संकल्पना मांडली. पण वीरशैवमत हे मुख्यतः आगमाधिष्ठित आहे. त्यामुळे त्यांच्या आगमामध्ये परब्रह्म किंवा परशिव संकल्पना "लिंग" संज्ञाद्वारा कशी मांडली आहे हे समजणे आवश्यक आहे. कारण वीरशैव हे स्वतःला "लिंगायत" म्हणवून घेतात. व लिंगकल्पनेचे निष्कलिंग, महालिंग, इष्टलिंग असे बारकावे त्यांनी आगमांचे आधारे स्पष्ट केले आहेत. तेव्हां आपण त्याचा मागोवा घेऊ.

## परम-तत्त्व-लिंग

वीरशैव-मत आगमांवर आधारलेले असले तरी त्यांची परमतत्त्वाची संकल्पना 'लिंग' ही औपनिषद ब्रह्माप्रमाणें आहे इतकेच नव्हे ते ब्रह्म व लिंग एकच मानतात.

'ज्या ठिकाणी हे चराचर जग लय पावते व पुनः पुनः उत्पन्न होते ते लिंग शाश्वत ब्रह्म आहे.'[३८] 'हे स्थावरजंगम जगत् ज्याच्या जठरात लय पावते व ज्याच्यापासून पुनः निर्माण केले जाते ते 'लिंग नामक ब्रह्म होय.'[३९] **'यतो वा इमानि भूतानि जायन्ते'** इ. (तै. उप. ३.१.१ मधील) मंत्राप्रमाणे-

---

३७. लोके जीवानां सुखदुःखभोगदर्शनात् परमेश्वरस्य वैषम्य-नैर्घृण्यादिप्रसक्तिर्नोपपद्यते । सापेक्षत्वात् जीवकृत पुण्यपापसापेक्षत्वात् ।

श्रीभा. (ब्र. सू. २.१.३४) II. पृ. २०८

३८.* लयं गच्छति यत्रैव जगदेतच्चराचरम् ।
पुनः पुनः समुत्पत्ति तल्लिंगं ब्रह्मशाश्वतम् ॥
-सिद्धान्तशिखामणि I लिंगाधारण स्थल श्लोक १६

३९.* जठरे लीयते सर्वं जगत् स्थावरजंगमम् ।
पुनरुत्पद्यते यस्मान्तद्ब्रह्म लिंगसंज्ञकम् ॥-चंद्रज्ञानागम-क्रियापाद ३.८

'अशारीतीने विश्वाचे ' लयगमनकारण ' असलेले लिंग होय.' [४०] लिंगा-पासून जगाची उत्पत्ती स्थिती व लय होतो ही कल्पना 'लिंग' शब्दाच्या व्युत्पत्ती-द्वारा ते सिद्ध करतात. 'लिंग' शब्द √ ली – 'लय होणे' व √ गम् – 'जाणे', 'उत्पत्ती होणे' या दोन धातूपासून बनला असून लिंग शब्दाचा अर्थ 'स्थावर जंगम सृष्टीची उत्पत्ती ज्याच्यापासून होते व लय ज्याच्यामध्ये होतो ते' असा मानतात.[४१] लिंगापासून जगाची उत्पत्ति–स्थिति–लय होतो ही संकल्पना छांदो-ग्यातील (३.१४.१) 'सर्वं खल्विदं ब्रह्म, तज्जलानिति शान्त उपासीत' मधील 'तज्जलान्'[४२] सारखी आहे.

---

४०.* यतो वा इमानि भूतानि जायन्ते येन जातानि जीवन्ति ।
यत् प्रयन्त्यभिसंविशन्ति तद् विज्ञासस्व तद् ब्रह्मेति ॥
इत्येवं विश्वस्य प्रपञ्चस्य लयगमनकारणं लिंगमिति ।

– वेदान्तसार वीरशैव चिंतामणि प्रकरण ४

*ही आगमामधील अवतरणे डॉ. मल्लेदेवरुकृत Essentials of Virasaivism मधून उद्धृत.

४१. लीयते गम्यते यत्र येन सर्वं चराचरम् ।
तदेव लिंगमित्युक्तं लिंगतत्त्व परायणैः ॥

– शिवानुभवसूत्र ३.३

यतो जातमिदं सर्वं त्रैलोक्यं सचराचरम् ।
लीयते प्रलये यत्र तदिदं लिंगमुच्यते ॥

हँडबुक ऑफ वीरशैविझम् पृ. २५८ वरून

लीनं प्रपंचरूपं हि सर्वमेतच्चराचरम् ।
सर्गादौ गम्यते यस्मात्तस्माल्लिगमुदीरितम् ॥

– सूक्ष्मागम– क्रियापाद पटल ६.६

४२. 'तज्जलान्' वर टीका लिहिताना शंकरांनी म्हटले आहे :

'तज्ज' म्हणजे त्या ब्रह्मापासून झालेले तेज, आप, अन्न इत्यादि क्रमाने सर्व. त्या जननक्रमाचे उलट त्याच ब्रह्मामध्ये ते (विश्व) लीन होते म्हणून ते 'तल्ल', √ अन् म्हणजे श्वासोच्छ्वास करणे ते (विश्व) स्थितिकालात श्वासो-च्छ्वास करते म्हणजे जिवंत असते (प्राणिति = चेष्टते 'हालचाल करते'). म्हणून सर्व विश्व ब्रह्म आहे.

लिंग हे नेहमी पीठ (योनी, शाळुंका) यावर अधिष्ठित असते. लिंग व पीठ हे अनुक्रमे शिव व शक्ति, [४३] प्रकाश व विमर्श [४४] नाद व बिंदु [४५] मानले जातात. शिवलिंग हे चंद्र व चांदण्याप्रमाणें लिंग व पीठ यांचे साहचर्य. [४६] पीठ नसेल तर नुसत्या लांबट वाटोळ्या दगडाला 'शिवलिंगत्व' मानत नाहीत. म्हणूनच डॉ. पुसाळकरांनी सिंधुसंस्कृतीत लिंगपूजा होती का याबद्दल शंका प्रकट केली. [४७] लिंग हे शिस्न किंवा स्तूप यांचे प्रतीक नाही हे ए. सी. नंदीमठानी 'हँडबुक ऑफ वीरशैविझम' मध्ये [४८] दाखवले आहे. लिंग हे अथर्ववेदातील 'स्कम्भ' किंवा लिंगपुराण किंवा कूर्म I. २६.६६–९९ पुराणात ब्रह्मदेव व विष्णु यांना ज्याचा आदी व अंत सापडला नाही असा त्यांचे गर्व हरण करणाऱ्या अग्निस्तंभाचे प्रतीक मानतात व त्याच्याच तेजाने चंद्रादि ग्रहतारकांना प्रकाश मिळतो[४९] असे सूक्ष्मागमात म्हटले आहे. ते परब्रह्म प्रकाश देणाराला प्रकाश देणारे आहे ही उपनिषदातील [५०] कल्पना लिंग–संकल्पनेला लागू पडते. लिंगाच्या वरील भागास

---

४३. पीठिका परमा शक्तिर्लिंगं साक्षात् परः शिवः ।
शिवशक्तिसमायोगं विश्वं लिंगं तदुच्यते ॥
–सिद्धान्त शिखामणि (अळ्ळी संपादन) पृ. १७१.

४४. विमर्शाख्या पराशक्तिः । सिद्धान्त शिखामणि २०.३१.

४५. बिन्दुः शक्तिः शिवो नादः शिवशक्त्यात्मकं जगत् ।
चंद्रज्ञानागम, क्रियापाद, पटल ३.१३.

४६. यथाच द्रे स्थिरा ज्योत्स्ना…
तथा शक्तिर्विमर्शाख्या प्रकाशे ब्रह्मणि स्थिता ॥
– सिद्धान्त शिखामणि २०.३२.

४७. द वेदिक एज, पृ. १९१.

४८. पृ. ११३–११४ इ.

४९. तस्यैव तेजसा देविचंद्रादिग्रहतारकाः ।
प्रकाशन्ते नियमिताः कालक्लृप्त्या दिवानिशम् ॥
–सूक्ष्मागम–क्रियापाद, पटल ६.९.

५०. तमेव भान्तमनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥
–कठ २.५.१५.

तसेचः ज्योतिषामपि तज्ज्योतिः । –मुडक २.२.९.
भगवद्गीता १३.१७, तसेच योगशिख ३.२२, ब्रह्मविद्या उप. ९५.

'शिव' व खालच्या पीठास (योनी, शाळुंका) शक्ती मानतात. लिंगाला 'स्थल' अशी संज्ञा आहे :

'सच्चिदानंद लक्षण असलेले जे एकमेवाद्वितीय परब्रह्म आहे त्या शिव-तत्त्वाला शैव आचार्य 'स्थल' असे आदरपूर्वक म्हणतात. सर्वभूतांचे व लोकांचे आलय असणाऱ्या त्या अक्षर परब्रह्माला 'स्थल' अशी संज्ञा आहे.'[५१] ते 'सर्व-शून्यनिरालम्ब', एकमेवाद्वितीय पर ब्रह्म आहे. हे 'सर्वशून्यनिरालम्ब' आहे. यातील 'शून्य' ही संज्ञा बौद्ध नागार्जुन वापरतो त्या अर्थी नाही. छांदोग्यात (६.२.१) वर्णन केलेले 'एकमेवाद्वितीय असणारे असत्'– परब्रह्म – आहे, ते निराकार व शब्द व मन (विचार) यांचे पलिकडे असल्यामुळे त्याला 'निष्कललिंग' म्हटले आहे. ही लिंगसंकल्पनेतील पुढची पायरी आहे असे काही मानतात.

श्वेताश्वतर उपनिषदात (६.१९) 'निष्कल' संज्ञा आली असून 'हे निष्क्रिय, शान्त, निरवद्य, निरंज्जन आहे असे म्हटले आहे.

निष्कललिंगाला 'मूललिंग' असेही म्हणतात. यापुढील अवस्था 'महालिंग'. मूललिंगामध्येही चिच्छक्ती असतेच पण महालिंग-स्थलामध्ये ती प्रकर्षाने प्रादुर्भूत होते. शिवतत्त्व हे आद्यन्तशून्य, अमल, परिपूर्ण, भावैकगम्य... असले तरी चिच्छक्तीच्या विशेष स्फुरणाने युक्त असे महा(त्म) लिंग असते.[५२] शिव हा स्वतःच्या चिच्छक्तीने महालिंग-स्थल होतो[५३] असे उत्तरवातुलागमात म्हटले

---

५१. एकमेव परं ब्रह्म सच्चिदानन्दलक्षणम् ।
शिवतत्त्वं शिवाचार्याः 'स्थल' मित्याहुरादरात् ।
आलयं सर्वभूतानां लोकानां सर्वसम्पदाम् ।
यद् भवेत्परमं ब्रह्म 'स्थलं' तत्प्राहुरक्षरम् ।।

–शिवानुभवसूत्र २.८.

अरूपं निष्कलं ब्रह्म भावातीतं निरञ्जनम् ।
शब्दादिविषयातीतं मूलंलिगमिहोच्यते ।।

–गणभाषितरत्नमाला (EV)

५२. चिच्छक्तिसंस्फुरणरूढमहात्मलिंगम्...

५३. शिव एव स्वचिच्छक्त्या महालिंगस्थलं भवेत् ।
अनादिवीरशैवशंग्रहात उद्धृत (EV. पृ. १९)

आहे. महादेवीयक्का (अक्क महादेवी), सिद्धवीर शिवयोगी हे चित्तु, चिन्नाद, चिद्बिंदु, चित्कळे (चित्कला) यांच्या प्राकट्यामुळे महालिंगत्वाचा विकास होतो असे म्हणतात.[५४] शिवलिंग हे लिंगपीठ (अ), जलधारी (उ), ज्याचे टोक गोलाकृती आहे असे उभे असे लिंग (म्) नाद (=अ), बिंदु (=उ), कला (म्) यानी बनलेले प्रणवरूप आहे. महालिंगापासून जगाची उत्पत्ती होते. ते भावलिंग, प्राणलिंग व इष्टलिंग असे त्रिविध आहे. यातील "भावलिंगाचा संबंध आत्म्याशी असून त्याची कल्पना भक्तीने करता येते. चिच्छक्तीचा परिणाम शिवतत्त्वावर झाल्यास ते महालिंग होते असे भक्तिमार्गाने साक्षात्कार देणारे चैतन्यस्वरूप होय. प्राणलिंगाचा संबंध जीवाशी असून ते अवयवरहित असल्याने त्याची मनाने कल्पना करावी लागते. इष्टलिंग प्रतीकरूप ते दिसणारे असून त्याचा संबंध शरीराशी आहे." [५५] इष्टलिंग हे दीक्षा देणाऱ्या गुरूनी द्यावयाचे असते[५६] ते आत्मरूप व परशिवाचे प्रतीक असून त्याची नित्यपूजा करावयाची असते. हे लिंग नेहमी शरीरावर धारण करावयाचे असते.[५७] लिंगधारणामुळे सर्व पापाचा नाश होतो व ते पुण्यप्रद आहे इतकेच नव्हे तर ते भवसागरातून जीवाला तारून नेते असे सर्व आगमार्थ विशारदांचे मत आहे.[५८]

## पशु, आत्मा, पिंड

'जीव' या अर्थी, 'अणु', 'आत्मा', 'जीव', 'पशु', 'पुद्गल', 'क्षेत्रज्ञ' व 'पुरुष' या संज्ञा वीरशैव योजतात.[५९] यापैकी बहुतेक (उदा. आत्मा, जीव, क्षेत्रज्ञ, पुरुष) उपनिषत्कालापासून चालत आल्या असून 'पशु' व 'अणु' इतर शैव संप्रदायांतील आहेत. वीरशैव मतात विशिष्ट आध्यात्मिक प्रगती झालेला जीव या अर्थी 'पिंड' व 'अंग' या संज्ञा येतात. 'अनेक पूर्वजन्मात

---

५४. EV. पृ १०

५५. सू. मोगलेवार – वीरशैवधर्मपंथ पृ. १८७

५६. एम. आर. साखरे संपादित नंदिकेश्वरकृत 'लिंगधारणचंद्रिकेत' दीक्षामाहात्म्य, दीक्षाविधि इ. दिले आहेत.

५७. 'शून्यसंपादने' अ. १२ मध्ये इष्टलिंगधारण, त्याची पूजा इ. चे महत्त्व दिले आहे–EV. पृ. २२.

५८. सिद्धान्त शिखामणि १. ६. ८

५९. वीरशैवधर्मशिरोमणि परिच्छेद १. पृ. १७

केलेल्या पुण्यामुळे ज्याचा पापपंजर क्षीण झाला आहे व ज्याचे अंतःकरण शुद्ध आहे अशा देहधारीला पिण्ड म्हणतात' असे सिद्धान्तशिखामणीत[६०] स्पष्टीकरण दिले आहे. येथे 'पुण्यकर्माने जीव पुण्यवान् होतो इ' बृहदारण्यक वचनाची (४. ४. ५) आठवण होते. वेदान्तसारवीरशैवचिन्तामणीत (उत्तरकाण्ड ५.२२-२३) 'पिण्ड' संकल्पनेचे लक्षण पुढीलप्रमाणे दिलेले आहे :

स्वतःच्या कर्माच्या परिपाकाने ज्याचे मल व वासना क्षीण झाल्या आहेत; शिवाच्या प्रसादामुळे ज्याजीवाचे मन शुद्ध झाले आहे.... अशा जीवाचे ठिकाणी शिवाच्या कारुण्याने शिवभक्ति (**भक्तिरैश्वरी**) जर निर्माण झाली (**प्रस्फुटा**) व हाच ज्याचा शेवटचा जन्म आहे (**जन्त्युरन्त्यशरीरोऽसौ**) त्याला पिंड म्हणतात.[६१]

पिंडाचे (१) आदिपिंड, (२) मध्यपिंड व (३) अनादिपिंड किंवा (१) जीवपिंड (२) सज्ञानपिंड व (३) चित्पिंड असे वर्गीकरण केले असून आदिपिण्डाच्या शरीरानुसार (१) स्थूलपिंड, (२) सूक्ष्मपिंड व (३) कारणपिंड असे भेद दर्शवले आहेत.

मध्ययुगीन 'व्युत्पत्तिशास्त्रा' प्रमाणे 'अंग' संज्ञेची व्युत्पत्ती अं (ब्रह्म)+ ग (गच्छती इति) अशी फोड करून ब्रह्माप्रत (लिंगाप्रत) जाण्याची धडपड करणाऱ्या जीवाला 'अंग' ही संज्ञा आहे. [६२]वीरशैवलेखकांवर उपनिषदांचे किती खोल संस्कार आहेत ते 'अंग' संकल्पनेवरून दिसेल. त्यांच्या मते 'तत्त्वमसि' या औपनिषद महावाक्यातील 'तत्' म्हणजे 'परमात्मा', 'लिंग',

---

६०. बहुजन्मकृतैः पुण्यैः प्रक्षीणे पापपञ्जरे ।
शुद्धान्तःकरणो देही पिण्डशब्देन गीयते ॥

— सिद्धान्त शिखामणि (K) ५.३२.

६१. स्वकर्मपरिपाकेन प्रक्षीण-मल वासनः ।
शिवप्रसादाज्जीवोऽयं संजातशुद्धमानसः ॥
जायते शिवकारुण्यात् प्रस्फुटा भक्तिरैश्वरी ।
जन्तुरन्त्यशरीरोऽसौ पिण्डशब्दाभिधेयकः ॥

— वेदान्तसारवीरशैवचिन्तामणि उत्तरकाण्ड ५.२२.

६२. अमिति ब्रह्म सन्मात्रं गच्छतीति गमुच्यते ।
रूप्यतेऽङ्गमितिप्राज्ञैरङ्गतत्त्वविचिन्तकैः ॥

शिवानुभवसूत्र ४.४.

'त्वम्' म्हणजे वर उल्लेखलेले 'अङ्ग' आणि 'असि' म्हणजे तादात्म्य. तेव्हां 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अर्थ 'लिंगांगसंयोग' किंवा 'लिंगांगसामरस्य' (लिंग = परमात्मा व अंग = परमात्म्याशी तादात्म्य मिळवण्यासाठी तळमळणारा जीव. आणि परमात्मा व असा जीव यांचा संयोग वा सामरस्य). ही वीरशैव मते सर्वश्रेष्ठ अशी अवस्था.

## श्रीपति पंडितांची भूमिका

पशु किंवा जीव याविषयी श्रीपतिपंडित म्हणतात: जीव अनादि आहे. पण तो अनादि पण सांत असलेल्या (आणव) मल, कर्म व माया या पाशांनी बद्ध होऊन, शरीराभिमानी (आत्मा व शरीर एक मानणारा) होतो व निरनिराळ्या योनीत सुखदुःखे भोगत भ्रमण करतो.[६३] जीव व शिव यामध्ये चिच्छक्ति हा जरी समान धर्म असला तरी जीव अणु आहे व शिव विभु (सर्वव्यापी) आहे. जीवाचे ज्ञान अल्प असते, शिव सर्वज्ञ असतो. जीवाला संसारात सुखदुःखे भोगावी लागतात, शिव नित्य तृप्त असतो. असा जीव-शिवातील परस्परविरुद्ध धर्म स्वाभाविक असल्यामुळे ते भिन्न आहेत.[६४]

जीव किंवा आत्मा अणुप्रमाण[६५] असला (विभु नसला तरी) दिवा ज्याप्रमाणे लहान-मोठी खोली प्रकाशाने भरून टाकतो.[६६] किंवा कपाळावर चंदनाचा लेप लावल्यावर सर्वांगाचा दाह कमी होतो[६७] त्याप्रमाणे ज्ञानाने तो ते (लहान-मोठे) शरीर व्यापतो. गंध ज्याप्रमाणे पृथ्वीचा गुण आहे त्याप्रमाणे

---

६३. अनादिस्वाभाविकमायापाशबद्ध... नानाशरीरप्रवेशनिर्गमन.. सुखदुःखाश्रयत्वं 'जीवत्वम्'। श्री. भा. २.४.

६४. तस्माद्विशेषातिशयद्योनताज्जीवपरमात्मनोश्चित्तैकत्वेऽपि विभुत्वाऽणुत्वसर्वज्ञत्वकिञ्चिज्ज्ञत्व-नित्यतृप्तत्वसंसारभोक्तृत्वादिपरस्परविरुद्धधर्मस्वभावत्त्वात्तयोः स्वाभाविकंभिन्नत्त्वम्। श्रीभा २.११४.

६५. 'एषोऽणुरात्मा चेतसा वेदितव्यः'... अतोऽणुरेवायमात्मा।

श्रीभा. २.२६४.

६६. आत्मा स्वगुणेन ज्ञानेन सकलदेहं व्याप्यावस्थितः। यथा मणिद्युमणिप्रभृतीनामेकदेशवर्तीनामालोकोऽनेकदेशव्यापी दृश्यते। तद्वद्हृदयस्थस्यात्मनो ज्ञानं सकलदेहं व्याप्य प्रवर्तते। – श्रीभा. २.२६५.

६७. यथा चन्दनस्यैकप्रदेशस्थितस्य सकलशरीरशैत्यजनकत्वमेवं क्षेत्रज्ञस्यैकस्मिन् प्रदेशे स्थितस्यापि सर्वाङ्गसुखदुःखभोक्तृत्वमुपपन्नम्। – श्रीभा. २.२६४.

ज्ञान आत्म्याचा गुण आहे [६८] पण जीव हा शिवाचे प्रतिबिंब नाही. कारण प्रतिबिंबात स्वतःचे अंगभूत चैतन्य नसते पण जीव आणि ईश्वर यांच्यात ' चित्त्व '–चैतन्यगुण–हा समान आहे असे श्रुती व युक्ती या दोहोंनी सिद्ध होते. तथापि लोखंड, तांबे, सोने यांची ' धातू ' ही एकच जाति (genus) असली तरी प्रकार (species किंवा category) भिन्न असतात त्याप्रमाणे जीव व ब्रह्म अथवा शिव यांच्यामध्ये स्वाभाविक भेद आहे [६९] आणि हा असा भेद आहे म्हणूनच सलोकता, समीपता, सरूपता व सायुज्यता या मुक्तिप्रकारांची उपपत्ती लागते. [७०] सारांश अग्नी आणि स्फुल्लिंग या प्रमाणे जीव व ब्रह्म सर्वस्वी भिन्नही नाहीत व एकरूपही नाहीत. [७१]

वीरशैव लेखक ' लिंग ' व ' स्थल ' असे पारभाषिक शब्द वापरत असले तरी ते जीव-विषयक औपनिषद कल्पनाच व्यक्त करतात. उदाहरणार्थ, आत्मा स्त्री, पुरुष वा नपुंसक नसून जे शरीर तो धारण करतो त्यासारखा तो असतो हे श्वेता. उप. ५. १० मधील वचन ' सर्वेषां देहभेदोऽस्ति आत्मभेदो न विद्यते ' या शब्दांत वातुलागमात आढळते. [७२] माण्डुक्योपनिषदात (३, ४, ५) आत्म्याचे जे चार पाय (अवस्था) सांगितल्यात त्या विश्व, तैजस प्राज्ञ या अवस्था ते मानतात व त्या स्थूल, सूक्ष्मवकारण देहांत असणाऱ्या आत्म्यास लावतात व या अवस्थेतील आत्मा (जीव) इष्ट, प्राण व भावलिंगाची उपासना करतो असे मायिदेवाचे मत आहे. [७३]

सारांश शैवसिद्धांताप्रमाणे वीरशैव आत्मे अनेक व नित्य मानत असले तरी परमशिव आत्मतत्त्वात ते नित्य द्वैत मानत नाहीत. सिद्धांतशैव मताप्रमाणे

---

६८. श्रीभा. २.३.१२.२५ ' **व्यतिरेको गन्धवत्तथा** ' वरील भाष्य.

६९. श्रीभा. २.१.७.२२ ' **अधिकन्तु भेदनिर्देशात्** ' वरील भाष्य पृ. १९९.

७०. " **यथा नद्यः स्यन्दमानाः... पुरुषमुपैति दिव्यम्** ' इत्यादि **बहुश्रुतिषु परमशिवत्रिपाद्विभूत्यात्मकसालोक्य सामीप्यसामीप्यसारूप्यसिद्धकल्याणविभूति चतुर्विधमुक्तिप्रतिपादकं सर्वं शास्त्रं प्रामाण्यमेव** । श्री. भा. २.२०१.

७१. श्रीभा पृ. २७६ **प्रकाशादिवत्तु नैवंपर** : (२.३.१५.४३) वरील भाष्य.

७२. EV. पृष्ठ ३८.

७३. **एकोऽयं पुरुषो विश्व-तैजस-प्राज्ञरूपतः ।**
**सदा स्वाङगेषु संयुक्तमुपास्ते लिङगमद्वयम् ॥**
शिवानुभवसूत्र ५.६१ (EV. पृ. ४० वरून उद्धृत)

ते मलत्रय मानतात पण वीरशैवमते परमशिव किंवा महालिंग लीला म्हणून हे उपाधि (मल) युक्त अणुस्वरूप स्वीकारतो व त्या जीव वा पशु अवस्थेत तो परमशिवापासून भिन्न भासला तरी मलत्रय नाहीसे झाल्यावर त्याचे परमशिवत्व स्पष्ट होते. 'अंग' हे व्यावहारिक पातळीवर 'लिंगा' पेक्षा भिन्न असले तरी नद्या समुद्राला मिळाल्यावर त्या समुद्ररूप होतात त्याप्रमाणे किंवा कामिकागमात म्हटल्याप्रमाणे 'तुपात तूप, दुधात दूध किंवा पाण्यात पाणी मिसळले तर एकरूप होते त्याप्रमाणे जीव व शिव एकरूप होतात.[७४]

## विश्व–विकास व तत्त्वे

वीरशैवमते प्रारंभी निष्कललिंग (किंवा शिव) एकमेवाद्वितीय असे अस्तित्वात होते. ते निरामय, निष्कलंक, निर्गुण, निर्मल, ज्योतिर्मय, निरालंब, शुद्ध किंवा शिव होते.[७५] त्या शिवनामक परब्रह्माला जग निर्माण करण्याची इच्छा झाली.[७६] व त्याने पशूंना पाशातून सोडविण्यासाठी व योगीजनावर उपकार करण्यासाठी जगदुत्पत्तीला उपकारक अशी तत्त्वे लीलेने निर्माण केली.[७७]

---

७४. **यथा घृते घृतं न्यस्तं क्षीरे क्षीरं जले जलम् ।**
**केवलत्वं यथा प्राप्तं न किञ्चिदपि तद्भवेत् ।।**

EV. पृ. ४० **वरील अवतरण.**

तुलनार्थ आत्मोपनिषदातील पुढील मंत्र पाहा :
**घटे नष्टे यथा व्योम व्योमैव भवतिस्वयम् ।।** २२ ।।
**तथैवोपाधिविलये ब्रह्मैव ब्रह्मवित्स्वयम् ।**
**क्षीरं क्षीरे यथा क्षिप्तं, तैलं तैले, जलं जले ।।** २३ ।।
**संयुक्तमेकतां याति तथाऽऽत्मन्यात्मविन्मुनिः ।।**

७५. **निरामयं निराकारं निर्गुणं निर्मलं शिवम् ।**
**ज्योतिर्मयं निरालम्बं सर्वाधारमनूपमम् ।।**

सूक्ष्मागम, क्रियापाद, पटल ६.८.

७६. **शिवाभिद्यं परंब्रह्म जगन्निर्मातुमिच्छया ।** सिद्धान्तशिखामणि १.२.८.
तु. (=तुलनार्थ) **सोऽकामयत बहुस्यां प्रजायेयेति** । तै. उप. २.६.

७७. **एवंरूपः परात्मा हि पशुपाशविमोचकः ।**
**शम्भुः कदाचिन्निजया प्रकृत्या लीलया स्वयम् ।**
**सृष्टयर्थं सर्वतत्त्वानां जगदुत्पत्तिकारणम् ।**
**योगिनामुपकाराय स्वेच्छयाऽचिन्तयच्छिवः ।।**

—सूक्ष्मागम, क्रियापाद, १.१८.१९.

तु. ब्र. सू. **लोकवत्तु लीलाकैवल्यम्** । ब्र. सू. २.१.३३

विश्वनिर्मितीची इच्छा होताच त्याच्या एका अंशापासून पराशक्ती निर्माण झाली. पराशक्तीपासून अनुक्रमे एका अंशापासून (वातुलागमाचे मते एकसहस्रांशापासून) आदिशक्ती निर्माण झाली असे पूर्वीच्या शक्तीच्या अंशापासून वा सहस्रांशापासून पुढील शक्ती निर्माण होत होत अनुक्रमे :

पराशक्ति → आदिशक्ति → इच्छाशक्ति → ज्ञानशक्ति → क्रियाशक्ति निर्माण झाल्या. या सर्व शक्ती निष्कल, निराकार असून या पाच शक्तींची मिळून शिवसृष्टी होते.

ज्यावेळी निष्कल (निराकार) असलेल्या शिवतत्त्वाचा वरील शक्तींशी संबंध येतो तेव्हां ते तत्त्व निष्कल–सकल (निराकार–साकार) होऊन योगी व भक्तजनांना गोचर होते. शिवाच्या या निष्कल–सकल रूपाला ' सादाख्य ' व ' सदाशिव ' ही संज्ञा आहे. हे ' सादाख्य ' किंवा ' सदाशिव ' हे तत्त्व वरील पाच शक्तींच्या एकदशांश ($\frac{1}{10}$) त्यापासून अनुक्रमे :

१. शिवसादाख्य = निष्कल–सकल शिवरूप किंवा ' सादाख्य ' अथवा ' सदाशिव' व पराशक्तीचा $\frac{1}{10}$ भाग असे संबंध असलेले तत्त्व.

२. अमूर्त–सादाख्य = ' सदाशिव ' व आदिशक्तीचा $\frac{1}{10}$ यांचा संबंध असलेले तत्त्व.

३. मूर्तसादाख्य = ' सदाशिव ' आणि $\frac{1}{10}$ इच्छाशक्ती यानी संबंधित तत्त्व.

४. कर्तृसादाख्य = ' सदाशिव ' व ज्ञानशक्तीचा $\frac{1}{10}$ यांचा संबंध असलेले तत्त्व.

५. कर्मसादाख्य = ' सदाशिव ' व $\frac{1}{10}$ क्रियाशक्ति यांचा संबंध असलेले तत्त्व.

ही तत्त्वे व त्यांच्या घटकांचे प्रमाण हे श्रद्धेय आहे यापेक्षा अधिक बुद्धिप्रामाण्यादि कस या ठिकाणी लावू नयेत, कारण अशी श्रद्धेय मते सर्व संप्रदायात आढळतात.

शिव पंचमुखी आहे. निष्कल–सकल (साकार–निराकार असणारा) शिव अथवा सदाशिव याचे ' कर्मसादाख्य ' हे पूर्वेकडील मुख आहे, ' कर्तृसादाख्य ' दक्षिणेकडील, ' मूर्तसादाख्य ' पश्चिमेकडील, ' अमूर्तसादाख्य' हे उत्तरेकडील व ' शिवसादाख्य ' हे किंचित् ऊर्ध्वमुख आहे. ' न '–' मः '–' शि '–' वा '–' य '–ही मंत्रबीजे (मंत्राक्षरे) या मुखातून (एकेक) अशी येतात. शैवसिद्धान्तात सुद्धा शिवाचे शरीर मंत्रमय मानले आहे.

' महेशतत्त्व ' ' कर्मसादाख्या'च्या सहस्रांशापासून निर्माण होते. त्याने साकार (सकल) रूप धारण केल्यानंतर विश्वाची उत्पत्ती, स्थिती व संहार त्याच्यापासून होतो. ' फार काय सांगावे महेश हाच परमेश्वर आहे ' असे सूक्ष्मागमात म्हटले

आहे.[७८] योगी, भक्तजन व मुमुक्षू यानी महेशाचे ध्यान केल्यास मोक्ष मिळतो.

वीरशैव संतांच्या वचनांतून– वचनशास्त्रामध्ये – याच संकल्पना मानल्या आहेत.

काश्मीर व सिद्धान्त शैवमताप्रमाणे वीरशैव छत्तीस तत्त्वे मानतात व त्या सर्वांची उत्पत्ती शक्तियुक्त (शक्तिमान्) शिवापासून झालेली असली तरी त्यांच्या चित् (शुद्धाध्व), चित्–अचित् (मिश्राध्व) व अचित् (अशुद्धाध्व) तत्त्वानुसार त्यांचे पुढीलप्रमाणे वर्गीकरण केलेले आढळते :

१. शुद्धाध्व :

१. शिव, २. शक्ति, ३. सदाशिव, ४. ईश्वर, ५. शुद्धविद्या.

या तत्त्वांचा 'षट्स्थल' ज्ञानातील अनुक्रमे प्रसादलिंग, चरलिंग, शिवलिंग, गुरुलिंग, व आचारलिंग यांच्याशी संबंध आहे.

२. मिश्राध्व : [७९]

१. माया, २. काल, ३. कला, ४. विद्या, ५. नियति, ६. राग, ७. पुरुष

३. अशुद्धाध्वा :

१. प्रकृति, २. बुद्धि, ३. अहंकार, ४. मन,

५–९ ज्ञानेंद्रिये–श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा, नासिका

१०–१४. कर्मेंद्रिये– वाक्, पाणि (हात), पाद (पाय) पायु, उपस्थ

१५–१९. तन्मात्रे– शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध

२०–२४. महाभूते– आकाश, वायू, तेजस्, जल व पृथ्वी.

वीरशैव शक्तिविशिष्ट शिवतत्त्व मानतात त्यामुळे त्याना शक्तिविशिष्टाद्वैती म्हणतात पण ते शाक्ताप्रमाणे शक्तीला अंतिम तत्त्व मानत नाहीत. ते सांख्याप्रमाणे परिणामवाद मानतात कारण त्यांचे मते वटबीजात विशालवृक्ष सामावलेला असतो त्याप्रमाणे ही चराचरसृष्टी शिवाची परिणामरूप आहे.

---

७८. पञ्चविंशतिलीलाभिर्देवदेवो महेश्वरः ।
सृष्टि–स्थिति–लयाद्यैश्च विहारैः क्रीडतेऽनिशम् ।
किमत्र बहुनोक्तेन स एव परमेश्वरः ॥

सूक्ष्मागम, क्रियापाद, पटल १.५८.६०

महेशाला परमेश्वर म्हटल्याबरोबर ब्रह्मा, विष्णु, रुद्र, देव–देवता, शक्ती त्याच्यापासून उत्पन्न होतात असे वातुलागमात म्हटले आहे.

७९. ह्या पारिभाषिक संज्ञांचे इतरत्र विवेचन झाले आहे. इतर शैवतत्त्वज्ञानाच्या शाखा याच संज्ञा वापरतात.

इतर शैव सांप्रदायाप्रमाणे वीरशैवानी ३६ तत्त्वे मानली असली तरी त्यांच्या वर्गीकरणाच्या संज्ञा भिन्न आहेत. सिद्धान्त शैव मतात यांचे वर्गीकरण (१) शिवतत्त्व, शुद्धतत्त्व अथवा चित्तत्व, (२) शुद्धाशुद्ध किंवा चिदचित्तत्व (३) अशुद्ध अथवा अचित्तत्व असे आहे. वीरशैव (१) शिवतत्त्व, (२) विद्या-तत्त्व व (३) आत्मतत्त्व असे वर्गीकरण मानतात पण ते लिंग-परिभाषेत (१) अंगतत्त्व व (२) लिंगतत्त्व असेही द्विविध वर्गीकरण करतात. त्यांच्या मते (१) (१) शिवतत्त्व किंवा महालिंग हे निष्कललिंगापासून निर्माण होते. (२) विद्या-तत्त्वामध्ये पराशक्ति, आदिशक्ति, इच्छाशक्ति, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति या पाच शक्तींचा वा कलांचा आणि कर्मसादाख्य, कर्तृसादाख्य, मूर्तिसादाख्य, अमूर्तिसाराख्य व शिवसादाख्य या पाच सादाख्ये मिळून दहा तत्त्वांचा समावेश आहे. आणि आत्मतत्त्वामध्ये पाच महाभूते + पंच तन्मात्रे (पंचप्राण ?) + पाचकर्मेन्द्रिये + पाच ज्ञानेन्द्रिये + मन, बुद्धि इ. ४ मिळून होणारे अंतःकरण म्हणजे चार अन्तरिंद्रिय + आत्मा वा जीव अशी एकूण २५ तत्त्वे येतात. या आत्मतत्त्वाना 'अंगतत्त्वे' म्हणतात. 'लिंगतत्त्वा' मध्ये पाच शक्ति किंवा कला, पाच सादाख्य व शिवतत्त्व अथवा महालिंग यांचा समावेश होतो सारांश पारि-भाषिक संज्ञात थोडाफार बदल असला तरी काश्मीरी (त्रिक) शैवमत, शैवसिद्धान्त व वीरशैव मत (आणि शाक्त आगम सुद्धा) ३६ तत्त्वे मानतात. कारण त्यांचा आधारभूत 'परमेश्वर' आगमात तसे म्हटले आहे.[८०]

आतापर्यंत आपण परशिव (पति), आत्मा किंवा जीव (पशु) व विश्व-विकासाची तत्त्वे यांचा विचार केला. आता वीरशैवांची मोक्षसंकल्पना (शिवैक्य) ते शिवैक्य साधण्याचे सहामार्ग (षडध्वा), मोक्षासाठी शिवकृपेची आवश्यकता असल्यामुळे शिवानुग्रहाचे (शक्तिपाताचे) प्रकार याचा विचार करू.

---

८० अथ वक्ष्यामि गिरिजे शैव तत्त्वानि वै श्रुणु ।
पञ्चभूतानि, तन्मात्राः पञ्च कर्मेन्द्रियाणिच ॥
ज्ञान-कर्म विभागेन पञ्च पञ्च विभागशः ।
त्वगादिधातवः सप्त पञ्चप्राणादि वायवः ॥
मनश्चाहंकृतिः ख्यातिर्गुणाः प्रकृतिपुरुषाः ।
रागोऽविद्याकला चैव नियतिः काल एवच ॥
माया च शुद्ध विद्या च महेश्वरसदाशिवौ ।
शक्तिश्च शिव तत्त्वानि प्रोक्तानि क्रमशः शिवे ॥

— परमेश्वरागम २.१७.२९-३३ (पटल) श्लोक.

## साधनमार्ग

जीव व शिव या द्वैतातून शिवाशी अद्वैत कसे साधले जाते हे "षटस्थल" या वीरशैवांच्या साधनमार्गावरून दिसते.

## मोक्ष

'पशु, आत्मा-पिंड' या विषयावर लिहितांना 'मोक्ष' संकल्पनेचा उल्लेख केला होता. जीव किंवा पशु व पर शिव अथवा पति प्रारंभी स्वभावतः भेदयुक्त असतात. पण हा भेद जीवाचे ठिकाणी जो अनादि (पण सान्त आणव) मल कर्म आणि माया या मलत्रयांचा माशापाश आहे त्यामुळे आढळतो. 'अद्वितीय अशा परशिव-ब्रह्मांचे ज्ञान झाल्यावर या मायापाशाच्या दुःखातून निवृत्ति होते व परम-पुरुषार्थ (मोक्ष) असलेली परशिवाची प्राप्ती होते.[८१] हे शिवैक्य अथवा सलोकता, समीपता इ. मुक्ती, भक्तीमुळे मिळतात.[८२] सायुज्य अथवा परशिवैक्य ज्ञानमार्गानेही प्राप्त होते.[८३] प्रथम भेद असलेले जीव व शिव, नद्या समुद्राला मिळाल्यावर एकरूप होऊन जातात त्याप्रमाणे, जीवशिवात अभेद अथवा ऐक्य होते पण ही मुक्ति देहापातापूर्वी (जीवनमुक्ति) होते का देह पातानंतर? अन् जीवन्मुक्ति मानल्यास देहपातानंतरच्या व या मुक्तीत काय फरक आहे. '**धर्मोपपत्तेश्च**' (ब्र. सू. १. ३. २. ९) याचे विवेचन करताना श्रीपति म्हणतो की ब्रह्मज्ञान झाल्यावर 'अहंब्रह्मास्मि' हा अनुभव आला की, ब्रह्म व प्रपंच यांची निमित्त व उपादान कारणे एक असल्यामुळे, ब्रह्मवेत्त्याचे ठिकाणी अभेद दृष्टी येते. जीवन्मुक्तांचा अन्तःकरणाशी संबंध आहे त्या पुरता थोडा फरक असला तरी, ज्याप्रमाणे उन्हाळ्यात भर दुपारी प्रखर प्रकाशांत लावलेल्या कर्पूरदीपाप्रमाणे तो फरक आहे.[८४] परंतु या जीवनन्मुक्तांच्या अन्तःकरणात अखण्ड ब्रह्मा-

---

८१. '**ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः**' रित्यादिष्वद्वितीयपरशिवब्रह्मज्ञानेन स्वाभाविकमलत्रयात्मकमायापाशदुःखनिवृत्तिपूर्वक-परम-पुरुषार्थ परशिवतत्त्व प्राप्ति दर्शनात्–श्रीभा २. पृ. ५.

८२. अतः मुमुक्षूणां — बहुजन्मतपःसिद्धाव्यभिचारभक्तिरेव सालोक्यादि चतुर्विधमुक्तिहेतुः–श्रीभा. २ पृ. २०१.

८३. श्रीपतीचे पुनरुक्त अवतरण (हे मुण्डक उप. ३. २. ८ आहे) '**यथा नद्यः स्यन्दमानास्समुद्रे अस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय तथा विद्वान् नामरूपाद् विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम्।**

८४. **शिवोपासकजीवन्मुक्तानां प्रचण्डातपमध्यनिक्षिप्त कर्पूरदीपवदन्तःकरणसद्भावेऽपि सर्वशिवात्मकज्ञानसद्भावात्।** श्रीभा २.१३८.

नुभव असल्यामुळे त्यांना प्रपंचाचा स्पर्शसुद्धा होत नाही. देहपातानंतर तर तोही संपर्क संपून शिवकृपेने शिवैक्य होते अन् जर भुंग्यासारखा कीटक (भीतीने त्याची धास्ती घेतलेल्या) आळीला आत्मरूप–भृंगत्व–देऊ शकतो, तर सर्वशक्तिसंपन्न, भक्तवत्सल, भक्ताला अभीष्ट फल देणारा सत्यसंकल्प असा शिव अथवा ब्रह्म, भक्ताचे ठिकाणी असणारे जे जीवत्व त्याची निवृत्ती करून, ज्याची प्राप्ती झाली असता पुनर्जन्म नाही अशा स्वरूपाचे दान करण्यास तो समर्थ नाही का?[८५]

वर वर्णन केलेल्या शिवैक्यासाठी सहा मार्ग (षडध्वा) म्हणून (१) वर्ण → (२) पद → (३) मंत्र → (४) कला → (५) भुवन व → (६) तत्त्व असे सांगितले असले तरी हे एकातून दुसऱ्यात विलीन होतात.[८६] शिवकृपा अथवा 'शक्तिपात' होण्याचे सुद्धा सहा प्रकार मानले आहेत ते असे.[८७]

१. **महेश्वरतत्त्वाविर्भाव** : पति, पशु, पाश इ. विषयीचे जे परम रहस्य ते प्रकाशित करणारे निगम, आगम व वेदान्तशास्त्र यांचे श्रवण, मनन, निदिध्यासन यांच्यामुळे परमशिव हा नित्य, निरतिशय आनंदात्मक आहे ही बुद्धीत (व वृत्तीत) जाणीव होणे. हा पहिला शक्तिपात 'भक्तिस्थलात' निर्दिष्ट केला गेला आहे.

२. **सदाशिवतत्त्वसाक्षात्कार** : वीरशैव तत्त्वपरंपरेचा काटेकोर विचार करता 'सदाशिव' हे तिसरे तत्त्व आहे. ही एक आध्यात्मिक पातळी आहे. या अवस्थेत 'अहम्' (Subjectivity) आणि 'इदम्' (objectivity) समान तऱ्हेने प्रकाशमान होतात. पण मला वाटते श्रीपतीने 'परशिव' या अर्थी 'सदाशिव' शब्द वापरला असावा कारण ब्र. सू. १. १. २१ (२ पृ. ७३) 'सूर्यमंडलात दिसणारा हिरण्मय' पुरुषाला 'सदाशिव' म्हटले असून त्यावरील

---

८५. **कीटकजात्युत्पन्नभृङ्गस्य स्वजात्यतिरिक्तक्रिमिजन्तोस्स्वभावक्रमित्व-निवृत्तिपूर्वकस्वसमानरूपप्राप्तिप्रदायकत्वशक्तिदर्शनाच्च। तथा ... सर्वशक्ति-विशिष्टस्य भक्तवात्सल्यस्य भक्ताभीष्टफलप्रदायकस्य ... सत्यसंकल्पस्य परब्रह्मणश्शिवस्य स्वभक्तस्वाभाविकजीवत्वनिवृत्तिपूर्वक-पुनरावर्तिरहितस्वस्वरूपप्राप्ति-प्रदायकत्वशक्तित्वे किं वक्तव्यम्।** श्रीभा. २.२०२.

८६. श्रीपतिपण्डितमते 'श्रुति व आगम यांचा अर्थ समान असल्यामुळे आगमांचे वैदिकत्व सिद्ध होते असे' आगम व वेद यांचे ऐक्य प्रतिपादन करताना '**श्रुतिसिद्ध-वर्ण-पद-मन्त्र-कला-भुवन-तत्त्वात्मकषडध्वप्रतिपादकत्वेन**' (श्रीभा. २.९५) एवढाच 'षडध्वाचा' उल्लेख केला आहे. शाक्त (तंत्रा) वरील प्रसिद्ध लेखक सर जॉन वुड्रॉफ यांनी 'द गार्लंड ऑफ लेटर्स' मध्ये (Ch. XXVII P 250) वर याची चर्चा केली आहे.

८७. श्रीभा २. ३१६ चे आधारे.

भाष्यांत अनेकदा व भाष्याच्या समारोपात हा पुरुष 'परशिव' आहे असे म्हटले आहे या सदाशिवतत्त्वाचा साक्षात्कार हे दुसरे माहेश्वर स्थल आहे

**(३) शिव-शक्तिसंयोग** : सुषुम्णामार्गाने कुंडलिनीने षट्चक्रभेदन करून शिवयोगाभ्यासाचे सामर्थ्याने ब्रह्मरन्ध्राचे ठिकाणी शिवशक्ति संयोग होणे हा तिसऱ्या (=प्रसादी) स्थलात होते.

**(४) सर्वभुवनगमनपरोक्षदर्शन** : हा शक्तिपात 'प्राणलिंगस्थलात' सांगितला आहे.

ज्यावेळी गुरूला शिष्यावर अतिशय मोठा अनुग्रह करावयाचा असतो त्यावेळी गुरू स्वतःच्या देहाचा त्याग करून शिष्याच्या शरीरात प्रवेश करतात. त्या शिष्याच्या शरीरात नाडीशोधन (नाडीशुद्ध करणे) करून कुण्डलिनीद्वारा सर्व चक्रातून संचार करून, शिवाप्रमाणे सर्व भुवनात गमन करून साक्षात् परिचय (दर्शन) घडवतो. म्हणून याला सर्व-भुवन गमन-परोक्ष दर्शन म्हणतात.

**(५) अणिमादिऐश्वर्यसंपन्नता** : हा अनुग्रह शरणस्थलात होतो. यात प्राण व अपान यांच्या संयोगाने सुषुम्णानाडीमधील प्रकाशक चित्कलामय, कल्याणकारी सामर्थ्य (विभूति) मिळवून पुरुष (जीव) अणिमा, लघिमा इ. आठ सिद्धीनी संपन्न होतो.

**६. उन्मन्यवस्थाप्राप्ती** : हा सर्वश्रेष्ठ अनुग्रह सहाव्या ऐक्यस्थलात होतो. हा अनुग्रह म्हणजे जीवन्मुक्ताची अवस्था असते : टळटळीत दुपारी प्रखर सूर्याच्या उन्हात लावलेल्या कापराच्या प्रकाशाप्रमाणे पुरुष असतो म्हणजे शरीर, इंद्रिय, मन, प्राण इ. बाह्य व अभ्यंतर वस्तूंचे परिज्ञान न होणे या मनाला म्हणजे 'उन्मनी' अवस्था प्राप्त झालेल्या स्थितीत तो असतो.

षट्स्थल व शक्तिपात किंवा शिवानुग्रह यांचे संबंध पुढील प्रमाणे

| स्थल | अनुग्रह-प्रकार |
|---|---|
| १. भक्त | महेश्वरतत्त्वाविर्भाव |
| २. माहेश्वर | सदाशिवतत्त्वसाक्षात्कार |
| ३. प्रसादी | शिवशक्तिसंयोग |
| ४. प्राणलिंगी | सर्वभुवनगमन–दर्शन |
| ५. शरण | अणिमादि ऐश्वर्य संपन्नता |
| ६. ऐक्य | उन्मनी अवस्था प्राप्ति |

षट्स्थलविचार परिशिष्टांत केला आहे

### काही तुलना

आतापर्यंत आपण वीरशैव मताचा विचार केला. आता इतर काही विचार प्रणालीशी त्यामताची तुलना करून त्याचे भारतीय तत्त्वविचारातील स्थान निश्चित करू.

### वीरशैवमत व कैवलाद्वैत

श्रीपतिपण्डिताचा शंकराचार्यांच्या तीन वादाबद्दल आक्षेप आहे : ते म्हणजे (१) अध्यासवाद (२) व्यावहारिक–सत्य-कल्पना व (३) जगन्मिथ्यात्व. श्रीपतीने या वादांचे खंडन कसे केले हे थोडक्यात पाहू :

### (१) अध्यासवाद

अध्यास म्हणजे एका पदार्थावर दुसऱ्या पदार्थाच्या धर्मांचे आरोपण करणे (**अन्यत्रान्यधर्माध्यासः।**) किंवा पूर्वी पाहिलेल्या पदार्थाचा दुसत्या वस्तूच्या ठिकाणी येणारा स्मृतिरूप प्रत्यय (**स्मृतिरूपः। परत्र पूर्वदृष्टावभासः**) किंवा जे ज्या ठिकाणी नाही ते त्या ठिकाणी असलेसे वाटणे (**अतस्मिंस्तद्बुद्धिः**)[८८]

वरील व्याख्यांत ज्या पदार्थांच्या जोडचा घेतल्या आहेत त्यापैकी ज्या पदार्थावर दुसऱ्या पदार्थाच्या धर्मांचा आरोप होतो ते अधिष्ठान व त्या अधिष्ठानावर वस्तुत: प्रत्यक्षात नसलेल्या ज्या धर्मांचा प्रत्यय येतो वा येत आहे असे वाटते तो (ते) धर्म म्हणजे ' अध्यास ' होत. रज्जु-सर्प, शुक्ति-रजत या उदाहरणांत जिच्यावर सर्पाचा अभास होतो ती रज्जु (दोरी), किंवा जिच्यावर रुप्याचा भास होतो ती शुक्ति (शिपला) हे ' अधिष्ठान ' होय. व दोरीवर भासमान होणारा सर्प किंवा शिपल्यावर भासमान होणारे रजत (रुपे) हे अध्यस्त होत. केवलाद्वैतमते ब्रह्मरूपी सद्वस्तु हे अधिष्ठान आहे व दृश्य जगत् हे अध्यस्त म्हणजे ब्रह्मावरील अध्यास किंवा आभास आहे. या अध्यासाचे मूळ अविद्या आहे.

श्रीपती पंडित म्हणतो : अध्यासामध्ये, अध्यस्त वस्तूच्या ज्ञानाचे स्मृतिशेष असतात. (म्हणजे अध्यस्त वस्तु सत्य असली पाहिजे) पण शांकर वेदान्तात ब्रह्माशिवाय दुसरी सत्यवस्तु अस्तित्वात नाही.

दुसरा आक्षेप असा : सर्पाचा रज्जूवर अध्यास होण्यासाठी कुठल्या तरी भिन्न स्थळी खराखुरा सर्प अस्तित्वात असला पाहिजे. याचा अर्थ असा की अध्यस्त व अधिष्ठान स्थलदृष्टचा भिन्न असले पाहिजेत. पण ब्रह्मव्यतिरिक्त रिते स्थळ

---

८८. ही अवतरणे ब्रह्मसूत्रशांकरभाष्य १ ल्या अध्यायाच्या प्रास्ताविकामधील आहेत.

नसल्यामुळे अध्यस्ताला जागाच राहात नाही सारांश आत्म्यावर (ब्रह्मावर) प्रपंचारोप होतो म्हणणे बरोबर नाही[८९]

जर अनात्म्यावर आत्म्याचा आरोप म्हणजे जर अध्यास असेल तर ब्रह्मच मिथ्या व जड ठरेल. पूर्वाध्यासामुळे बीजांकुरन्यायाने असा अध्यास होतो म्हटले तर अनवस्था (regressus ad infinitum) ओढवेल. शिवाय जे ज्या ठिकाणी दिसते (उदा. सर्पावर सर्पत्वाचा आरोप होतो म्हणणे) त्याच्यावर तो आरोप होऊ शकत नाही.[९०]

शिवाय ब्रह्म व जगत् यांचा कार्यकारणभाव दाखविणारी श्रुतिवचने आढळतात. उदा. **यतो वा इमानि भूतानि जायन्ते (तै. उ ३. १. १.)** त्यांची संगती कशी लावावयाची.[९१]

शांकरमते ब्रह्म हा ज्ञानाचा वा अनुभूतीचा विषय होऊ शकत नाही. पण अध्यास वास्तव असलेल्या अधिष्ठानावरच होऊ शकतो. ब्रह्म जर व्यावहारिक दृष्टद्या वास्तव (Objective reference) असणारे नसेल तर अध्यास भ्रम ठरेल.[९२] **(निरधिष्ठान–भ्रम–प्रसंगः।)**

## बिंब-प्रतिबिंबवाद

केवलाद्वैत्यांच्या मते परब्रह्माचे मायेतील प्रतिबिंब म्हणजे ईश्वर चैतन्य आणि ते जेव्हां अंतःकरणात पडते तो जीव. सारांश ईश्वर व जीव हे दोन्ही परब्रह्म नामक बिंबाचे प्रतिबिंब आहेत. माया विश्वव्यापी असल्यामुळे ईश्वर चैतन्य मोठे आहे इतकेच. यावर श्रीपतिपंडित विचारतो की जे दृश्य असेल त्याचेच प्रतिबिंब पडणार. तसेच ज्याच्यामध्ये प्रतिबिंब पडावयाचे ती वस्तू वा माध्यम बिंबाहून भिन्नपणे अस्तित्वात असली पाहिजे. पण अद्वैत्यांचे मते परब्रह्म इंद्रियातीत आहे, दृश्य नाही व जिच्यामध्ये प्रतिबिंब पडावयाचे ती अविद्या किंवा माया मिथ्या आहे.

---

८९. तथाहि–अन्यत्र अन्यधर्मारोपोऽध्यासः खलु ।
तत्रात्मन्यनात्मप्रपंचारोपो वा ह्यनात्मनि आत्मारोपो वा । नाद्यः ।
पूर्वदृष्टसत्यसर्पसंस्कारेण रज्जु-सर्प भ्रान्तिरुपपद्यते ।
तद्वदात्मव्यतिरिक्तसत्यप्रपञ्चानङ्गीकारात् ।
तदतिरिक्तप्रदेशाभावाच्च ।
—श्रीकरभाष्य II पृ. ३१

९०. तद्दृष्टप्रपञ्चस्य तस्मिन्नारोपः कथमुपपद्यते । उपर्युक्त, पृ. ३१.

९१. कार्य-कारणत्वप्रयुक्त-पौर्वापर्यनियमप्रतिपादकयुक्तभङ्गप्रसङ्गश्च दृश्यत्वेन प्रपञ्चस्य मिथ्यत्वाङ्गीकारे ब्रह्मणोऽपि मिथ्यात्वापत्तिः । उपर्युक्त, पृ. ३१.

९२. ब्रह्मणः व्यावहारिक-दृश्यत्वानङ्गीकारे निरधिष्ठान-प्रसङ्गः ।
श्रीभा II पृ. ३१.

तेव्हा कशाचे कशात 'प्रतिबिंब' पडणार आहे की एकाला ईश्वरचैतन्य व एकाला जीव चैतन्य म्हणावयाचे ? शिवाय ईश्वर व जीव हे मायेतील प्रतिबिंब असतील व मायेचा नाश झाल्यानंतरच जर मोक्षप्राप्ती असेल तर मायेच्या बरोबर जीवाचाही नाश होईल. मग मोक्ष कोणाला मिळणार ?

सारांश, बिंब प्रतिबिंबवाद–जीव ब्रह्माचे प्रतिबिंब आहे हे खरे नाही.

## जगन्मिथ्यात्व

बौद्धविज्ञानवादाचे खंडन करताना शंकराचार्यांनी (ब्र. सू. २.२.२८–३० मध्ये) जी भूमिका मांडली त्याला श्रीपती 'निर्विशेषाद्वैत' म्हणतो. त्यांचे म्हणणे असे: "स्वप्न किंवा शुक्ति–रजत (शिंपल्यावरील रुप्याचा अध्यास) इ. दृष्टांतावरून जर प्रपंच मिथ्या ठरत असेल तर निर्विशेष ब्रह्मही मिथ्या ठरेल. ते वेदवेदांताच्या आधारे 'ब्रह्म सत्य आहे' असे म्हणू शकत नाहीत. कारण त्यांच्या मते वेदवेदांताला प्रामाण्य नाही. वेदवेदांत ही प्रमाणे (means of knowledge) आहेत. व पारमार्थिक सत्य हे प्रमाणातीत आहे. त्यामुळे श्रुतींच्या आधारे सिद्ध होणारे ब्रह्म मिथ्या आहे. आणि ब्रह्माशिवाय इतर सर्व मिथ्या असल्यामुळे श्रुतीही मिथ्या ठरतात व मिथ्या असणाऱ्या श्रुती ब्रह्म सत्य आहे हे सिद्ध करू शकत नाहीत.[९३]

श्रीपती विचारतो : 'तुम्ही ईश्वर, जीव व जगत् यांचा अभाव आहे असे जेव्हां म्हणता तेव्हा तो अभाव शशशृंग (सश्याचे शिंग) किंवा वन्ध्यासुत (वांझ

---

९३. **न भावोऽनुपलब्धेः** (२.२.५.२९) या वरील श्री. भा. पृ. २२७ पहिल्या परिच्छेदाचा सारांश. तो परिच्छेद असाः
सूत्र : न भावोऽनुपलब्धेः ।
निर्विशेषाद्वैतशास्त्रे स्वप्न-शुक्तिरजतादिदृष्टान्तत्वेन प्रपञ्चस्य मिथ्यात्वाङ्गीकारे निर्विशेष-ब्रह्मणः भावः विद्यमानत्वं नास्ति । कुतः । अनुपलब्धेः । तन्मते पारमार्थिकत्वे न वेदवेदान्तानां प्रमाणकत्वाभावात् । ...... नह्यकर्तृकस्याकर्मकस्य ज्ञानात्मकस्य ब्रह्मणः वेदवेदान्तामनुपलब्धेः : " मिथ्यात्ववादिवाक्यानि मिथ्येति परिगीयते " इति न्यायेन तन्मते वेदवेदान्तानां मिथ्याभूतत्वाङ्गीकारात् । तन्मिथ्याभूतवेदान्त-प्रतिपाद्यब्रह्मण : सत्यत्वं कथमुपपद्यते । निर्विशेषे वेदवेदान्तानां प्रतिपाद्यत्वायोगात् । ब्रह्मसत्वे तदतिरिक्तप्रमाणाभावाच्च । तस्मात्तच्छास्त्रोक्तजगज्जीवेश्वरादिप्रपञ्चवत् । तन्निर्विशेषब्रह्मणः मिथ्यात्वं दुर्निवारम् । तस्माद्विज्ञानात्मकबुद्धमत–वदद्वैतमतमप्यविचारितरमणीयम् । तदुभयोरपि जगज्जीवेश्वर – प्रपञ्च मिथ्यात्वमद्वयवादश्चाङ्गाकारात् । तदुभयं तुल्यमिति निश्चितम् ।

बाईचा मुलगा) यांच्याप्रमाणे आहे का स्वप्नात येणाऱ्या विविध विषयांप्रमाणे आहे ? या पैकी पहिला उल्लेखलेला अभाव हा अनुभवाला न येणारा आहे. कारण इतर अनेक पदार्थ आपल्या दृष्टिपथात वा अनुभवास येतात पण सशाचे शिंग किंवा वंध्यापुत्र आपल्या पहाण्यामध्ये कधी येत नाही.

तो अभाव जर स्वप्नसृष्टीप्रमाणे असेल तर स्वप्नाचे सत्यत्व बिनतोड आहे. (**उत स्वप्नस्यापि सत्यत्वमनिवार्यम्**) कारण स्वप्नातील प्रपंच स्वप्नावस्थेत खराच असतो. 'जागृतीतील वासनांप्रमाणेच स्वप्न असते' (**जाग्रद्वासनानुयुक्तो स्वप्नः**) शिवाय स्वप्न हे परमेश्वरी हेतूनेही पडते. या जन्मात न पाहिलेले पदार्थ कित्येकदा ते पूर्वजन्मातील वासनांमुळे दिसतात. शिवाय श्रुति, पुराण व आगमग्रंथात 'स्वप्नात कृष्ण पुरुष, रक्तवस्त्रधारी कालपुरुष आला तर सहा महिन्यात मृत्यू येतो' अशी वचने आढळतात. स्वप्नाध्यायाप्रमाणे व स्वानुभवाने सुद्धा स्वप्नांचे सत्यत्व सिद्ध होते.[९४]

जागृत अवस्थेतील प्रपंच 'स्वप्न' किंवा 'इंद्रजाल' याप्रमाणे मिथ्या म्हणता येणार नाही. जागृती आल्यावर स्वप्नसृष्टी नाहीशी होईल. पण जागृतीतील पदार्थ प्रत्यक्ष असतात. म्हणून एक वेळ स्वप्न किंवा इंद्रजाल मिथ्या म्हटले तरी जागृतीतील प्रपंचाला कोणतीही बाधा नसते. जागृतीतील कर्माचे पुण्यपाप असे परिणाम होतात. स्वप्नातील यज्ञयागांनी स्वर्ग मिळत नाही. ज्याप्रमाणे गाढ झोप लागलेल्या माणसाला बाह्य सृष्टीचे भान नसते, तसे ब्रह्मविलीन किंवा जीवन्मुक्त माणसाला प्रपंचाचे भान नसते. याचा अर्थ प्रपंच अस्तित्वात नाही किंवा मिथ्या असे नव्हे.

आता ज्ञानच जर अर्थशून्य (Without objective reference) असेल म्हणजे 'मी घट जाणतो' यातील कर्ता (मी), कर्म (घट) व जाणण्याची क्रिया (ज्ञान) या तीन गोष्टी स्पष्ट (सर्वलोकसाक्षिक, अपरोक्ष, अवभासमान) असताना केवळ 'ज्ञान'च खरे म्हणाल तर ते उपहासास्पद ठरेल. शिवाय अद्वैतवेदांती ब्रह्माचे अस्तित्व अनुमानाने ठरवतात. पण अनुमान हे एक प्रकारचे ज्ञान आहे. आणि ते अर्थशून्य असेल तर ब्रह्म असिद्ध होईल.[९५]

---

९४. उत स्वप्नस्यापि सत्यत्वमनिवार्यम् । स्वप्ने स्वप्नप्रपञ्चस्य सत्यत्वात्... परमेश्वरहेतुत्वात् ।...' जाग्रद्वासना (नु) युक्तो स्वप्न ' इतिन्यायेन स्वप्नस्यापि जाग्रद्वासनाहेतुत्वोपदेशात् जाग्रदृष्टपदार्थदर्शनेऽपि पूर्वभववासनासिद्धत्वाद् । किञ्च । ' यस्स्वप्ने पुरुषं कृष्णं पश्यति '–इत्यादि बहुश्रुतिपुराणागमदर्शनात् । स्वप्नाध्यायप्रकारेण सर्वेषामनुभवद्योतनाच्च । तत्सत्यत्वं सिद्धम् ।
–श्री. भा. II पृ. २२७.

९५. श्री. भा. २. पृ. २२६, २२७.

यावरून केवलाद्वैत्यांची जगन्मिथ्यात्व कल्पनाच मिथ्या आहे. जग हे सत्य आहे.

## श्रीपती आणि विशिष्टाद्वैत.

श्रीपतिपंडिताच्या विशिष्टाद्वैताबद्दल प्रतिक्रिया तीव्र आहेत. ते मत अवैदिक असल्यामुळे मुमुक्षूंनी ग्राह्य मानू नये, कारण भट्टभास्करादी ब्रह्मसूत्रावरील भाष्यकारांनी (वैदिकमीमांसाकर्तृभिः) स्वमतमंडनाचे प्रसंगी त्या मताला 'पूर्वपक्ष' होण्याची सुद्धा किमत दिली नाही. श्रीपतीच्या मते 'विशिष्ट असलेले 'अद्वैत' हे 'वदतो व्याघातः' प्रमाणे असल्यामुळे 'विशिष्टाद्वैत' ही संज्ञाच विसंगत आहे कारण तथाकथित 'विशिष्ट' हे आढळत नसल्यामुळे (दुर्निरूप्यत्वेन) मिथ्या आहे कारण असे पाहा : 'विशिष्ट' म्हणजे विशेषण–विशेष्य संबंध तरी असला पाहिजे किंवा त्या व्यतिरिक्त (अतिरिक्त) काही तरी असले पाहिजे. त्यापैकी पहिले. (विशेषण–विशेष्य संबंध) होऊ शकत नाही. कारण अद्वयत्व दोघात असते (विशेषण–विशेष्य व संबंध अशा) दोन्हीहून अधिकात असू शकत नाही. 'दण्ड + पुरुष' हा समूह 'दण्डधारी' असा विशिष्ट पुरुष दाखवत नाही.[९६]

दुसऱ्या पर्यायात म्हणजे विशेषण, विशेष्य व त्यांचा संबंध यांच्या बाहेर (यापेक्षा भिन्न) 'विशिष्ट' असेल तर खुद्द परमात्मा विशिष्टाद्वैत आहे हे सिद्ध करणे दुष्कर आहे.[९७]

कारण आपण 'दण्डी' (दण्डधारक) म्हणताना दण्ड, पुरुष व त्यांचा संबंध असे तीन विभक्त, वेगवेगळे मानत नाही. त्यामुळे 'विशिष्टत्व' ही संकल्पना स्पष्ट होत नाही. आणि ज्याच्यामुळे 'व्यावृत्तिबुद्धी' निर्माण होते ते विशिष्टत्व असू शकत नाही.

एक तत्त्वप्रणाली या दृष्टीनेही विशिष्टाद्वैत अशक्य आहे. या प्रणालीत विशेषण कोणते, विशेष्य कोण आणि त्यांच्यामधील संबंधाचे स्वरूप काय यावर

---

९६. विशिष्टं नाम विशेषणविशेष्यसंबन्ध एव वा तदतिरिक्तं वा। नाद्यः। त्रयाणामनेकत्वेन अद्वयत्वासंभवात्, एते 'दण्डपुरुषसम्बन्धा' इतिसमूहावलम्बनस्य दण्डीति विशिष्टप्रत्ययात्मप्रसंगः। विशिष्टप्रत्ययस्य अनतिरिक्त विषयत्वात्। —श्रीकरभाष्य पृ. ७१–७२.

९७. विशेषरूपपरमात्मनोऽप्यन्यत्वेन विशिष्टाभिहितपरमात्मनो विशिष्टाद्वैतसिद्धेः। —श्रीकरभाष्य, २.७२

त्याने आक्षेप घेतले आहे. त्याचा ब्रह्ममीमांसाभाष्यकार श्रीकण्ठ याच्यावर फार रोष दिसतो.[९८]

विशिष्टाद्वैत तत्त्वप्रणालीबद्दल तो म्हणतो: " यात जीव, परमात्मा इ. मध्ये विशेषण कोणते, विशेष्य कोण व त्यांचा संबंध काय हे विचार करण्यासारखे आहे. जीव हा अर्थातच विशेषण होऊ शकत नाही तथापि जीव हा विशेषण व परमात्मा विशेष्य आहे असे मानल्यास फक्त एकच अणुप्रमाण जीव आहे असे मानावे लागेल. कारण जीव अणुप्रमाण आहे असे ते मानतात. पण त्यांच्या मते अणुप्रमाण जीव अनेक आहेत व परमात्मा एकच आहे. एकाच परमात्म्याला अनेक परस्परभिन्न जीव विशेषण कसे होऊ शकतील ? एकाच पुरुषाला हातात दंड असणारा म्हणून ' दंडी ', कानात कुण्डले आहेत म्हणून ' कुंडली ' असे म्हणू. पण ' दंडी विशेषणाने ' दंडधारी पुरुष ' असाच अर्थ होतो, मग त्याच्या कानात कुंडले असोत वा नसोत. सारांश, विशेषणाने वैशिष्टच दाखवलेला पदार्थ म्हणजे विशेष्य. भिन्न विशेषण म्हणजे भिन्न वैशिष्टययुक्त भिन्न विशेष्य. म्हणून दंडी (दंडधारी पुरुष) म्हणजे ' कुंडली ' (कुंडलधारी) असा अर्थ होत नाही. एका परमात्म्याची अनेक जीव ही अनेक विशेषणे मानली तर एकाचा उल्लेख म्हणजे त्या सर्व अनेक जीवांचा उल्लेख मानावा लागेल (दंडी = कुंडली होईल). पण दंडी म्हणजे दंडधारी असणे व कुंडली म्हणजे कुंडले घालणारा असा अर्थ असेल तर विशेषणभेदाप्रमाणे विशेष्यभेदाचा स्वीकार केला पाहिजे. आणि तसे असल्यामुळे अनंतजीव विशिष्ट असलेल्या परमात्म्याचे " विशिष्ट–अद्वैत " कसे शक्य आहे.[९९]

आता विशेषण कोणते आणि विशेष्य कोण हे ठरविण्यापूर्वी परमात्मा व अनेक असणारे जीव यांच्या संबंधांचे स्वरूपाचा विचार करू. ते परस्परापासून भिन्न असल्यामुळे तो ' समवाय ' नाही.

तंतूशिवाय पट असू शकत नाही. अशा तंतू व पट यामधील अभिन्नत्वदर्शक संबंधास समवाय म्हणतात. पण विशिष्टाद्वैतमते जीव व परमात्मा यांचा संबंध तसा नाही. बरे तर त्यांच्यातील संबंध ' संयोग ' स्वरूपाचा आहे म्हणावे तर संयोगाचे ' व्याप्यवृत्ति ' व ' अव्याप्यवृत्ति ' हे दोन्ही प्रकार येथे लागू पडत नाहीत.

---

९८. उदाहरणार्थ विशिष्टाद्वैती मोक्षकल्पनेवर टीका करताना तो त्याचा नाव घेऊन पुढील शब्दात उद्धार करतो:
अत्र शैवाग्रण्य–श्रीकण्ठशिवाराध्यकृतब्रह्ममीमांसाभाष्ये विशिष्टाद्वैतं स्वाभिप्रेतत्वेन प्रसाधितम् । —श्रीकरभाष्य २.२०●

९९. विशेषणभेदाद्विशिष्टभेदाङ्गीकारे च अनन्तजीवविशिष्टस्य परमात्मन : कथं विशिष्टाद्वैतत्वम् । —श्रीकरभाष्य २.७२.
या पृष्ठावरील विवेचनाचा सारांश व निष्कर्ष.

कारण व्याप्यवृत्ति म्हणजे तादात्म्य व त्यामुळे जीव व परमात्मा यांच्यात अभेद मानावा लागेल. तसे जीव व परमात्मा हे दोन्ही स्वयंपूर्ण–भाग किंवा 'प्रदेश' नसलेले असल्यामुळे काही भागापुरती व्याप्ती असणारे ते पदार्थ आहेत असे मानावे लागेल. जीव व परमात्मा यांना 'उपाधी' मुळे हे प्रदेश निर्माण झाले असे मानल्यास, त्या उपाधीचा संबंध दुसऱ्या एका उपाधीमुळे निर्माण झाला असे मानावे लागून 'अनवस्था' निर्माण होईल. त्यामुळे जीव व परमात्मा यांचे संबंध म्हणजे 'संयोग' असू शकत नाही.

स्वरूपसंबंध हा तर्कशास्त्रास असंमत असल्यामुळे तो संबंधही कसा सिद्ध होऊ शकत नाही, ही चर्चा अप्रस्तुत ठरेल. श्रीपतीचा मुख्य मुद्दा असा की, 'विशिष्टाद्वैत' ही संज्ञा '**वदतो व्याघात:**' सारखी आहे. पण जुन्या खंडनपद्धतीचा नमुना म्हणून त्याचा सारांश वर दिला आहे.

शक्तिविशिष्टाद्वैत मानणाऱ्या वीरशैवाने 'शैवविशिष्टाद्वैतावर' केलेली टीका वाचून करमणूक होते.

❁ ❁

प्रकरण ६ वे

# काही शैव संप्रदाय

## ग्रंथसंक्षेप

१. कापालिक– पर्यायी संज्ञा – आगम प्रामाण्य, हठयोग–प्राधान्य याबरोबर शिष्ट, लोक विरुद्ध उपासना पद्धती व वामतंत्राचार यामुळे वेदबाह्य व असेव्य– संस्कृत नाटयवाङ्मयातील चित्रण उग्र तिरस्करणीय– गाथासप्तशती-मधील चित्र करुण पण हृद्य– स्मशानवासीचर्या पाळणारे बुद्धकालीन व मध्ययुगीन संप्रदाय भिन्न कापालिकतत्त्वज्ञान– पाशुपततत्त्वज्ञान– पति, पशु, पाश – 'महासुख' अशी भावात्मक मोक्षकल्पना– शिवाशी सारूप्य (homologisation) साधण्या-साठी ब्रह्महत्यानिवारणार्थ त्याने केलेल्या महाव्रताचे अनुकरण– रामानुजमते कापालिक पशुपतीला निमित्तकारण मानतात. मोक्षासाठी सहा मुद्रांचे ज्ञान व भगासनस्थ आत्म्याचे ध्यान आवश्यक– कापालिक दीक्षाधारी ते 'ब्राह्मण' व कापालिक व्रतधारी ते 'यति'– रामानुजाची कालामुखांबद्दलची माहिती अविश्व-सनीय– शंकरविजयातील माहिती–नैष्कर्म्यावर भर – उपास्यदैवत भैरव एकमेवा-द्वितीय, जगदुत्पत्ती, स्थिति व प्रलय कर्ता– इतर देवता तदंशभूत उत्तरकालीन कापालकात वामाचार

## २. कालामुख

पाशुपत संप्रदायाची लुप्तप्राय (वा रूपांतरित) शाखा–

दोन उपपंथ (१) शक्तिपरिषद् धारवाड व शिमोगा भागात विशेष प्रभावी– इ. स. च्या ११,१२ व १३ पूर्वार्ध या काळात देवालये व मठ इ. ना विपुल देणग्या– (२) सिंहपरिषद् कर्नाटक व आंध्र– प्रचारक काश्मीरी ब्राह्मण– लकुलागम, वेद,

शास्त्र, पुराणे, इतिहास इ. पारंगत, योगविद्येवर भर– देवालये शिवलिंगांची– रामानुजाचे वर्णन गैरलागू– कालामुख वीरशैवांचे पूर्वरूप– कालामुखांची देवालये व मठ वीरशैवांची पुण्यक्षेत्रे– लिंगपूजेवर भर– मठसंस्था व विद्यादान– 'जंगम' ही संज्ञा– कालामुख व वीरशैव दोन्ही वैदिकधर्मानुयायी – तत्त्वज्ञानांत शिव = ब्रह्म साम्य-वीरशैवांची पार्श्वभूमी.

## ३. हरिहर–संप्रदाय

शिव व विष्णु यांच्या उपासकात समन्वय करण्याचा प्रयत्न पुराणकारांचा (उदा. कूर्म, नारद)– हरि व हर यांचे ऐक्य मूर्तिद्वारा व्यक्त कसे करावे या-विषयी सूचना (उदा. मत्स्य) – सुप्रभेदादि आगम, हेमाद्रिकृत चतुर्वर्ग-चिन्तामणीत–अशा मूर्तींचा आढळ भारतभर (बदामी, पंढरपूर, सोपारा, वीस-नगर, तामिळी शैवसंतमते तिरुपती, हरिहर) – भारताबाहेर कांबोज – स्वतंत्र तत्त्वज्ञानपर ग्रंथ अनुपलब्ध.

## ४. मार्तण्ड–भैरव

सौरउपासना व शैवउपासना यांचा समन्वय– मूर्ती मुख्यत: पूर्वभारतात– लिंगपुराण २.१९.३९ स्तुतीं शिव व सूर्य यांची–स्वतंत्र तत्त्वज्ञानविषयक ग्रंथ अनुपलब्ध–

## ५. अर्धनारीश्वर

उजवा अर्ध शिवस्वरूप व डावा अर्ध उमास्वरूप अशा मूर्ती शक-- पार्थियन काळापासून उपलब्ध– ग्रीक उल्लेख (इ. स. चे ३ रे शतक)– मूर्तीचे वर्णन मत्स्य पुराण कामिकागम, सुप्रभेदागम इ. आगम ग्रंथात–मूर्ती राजस्तान, बंगाल, ओरिसा, दक्षिण भारत (बदामी, कांची, मदुरा इ.) प्रकृति–पुरुष ऐक्य ?–युगनद्ध कल्पनेकडे कललेल्या, ' उमा आलिंगन ', ' सोमास्कंद ' तंत्रोपासना पद्धतीत अधिक–शिव-पार्वतीच्या शृंगारसूचक मूर्ती उत्तरप्रदेश, बिहार, बंगाल इ. तंत्रोपासक प्रांतात अधिक.

## ६. नाथपंथ

अनेक संत परंपरांच्या गुरुस्थानी–वामाचारी बौद्ध संप्रदायाचा वारस पण आता कट्टर शैव– काश्मीर शैवमताची शाखा.

# काही शैव संप्रदाय

## १. कापालिक

'कापालिक,' 'कपाली,' 'महाव्रती,' सोमसिद्धांती' व 'तांत्रिक' या पर्यायी संज्ञा असणारा हा पंथ पाशुपत संप्रदायापैकी असून त्यांच्या आगमप्रामाण्य, हठयोगप्राधान्य या विशेषांपेक्षा लोकविरुद्ध विशिष्ट उपासना पद्धती (चर्या) व तंत्रमार्गावरील भर यामुळे तो पंथ 'वेदबाह्य' व 'असेव्य' ठरला व त्यांचा आगम शिवप्रणीत असला तरी हा वेद-वाद-विरुद्ध पंथ लोकांना मोहात टाकण्यासाठी शिवाने प्रचलित केला असे कूर्मादी[१] पुराणांचे मत आहे. स्मशानवासी, अंगाला चिताभस्म, हातात नरकपाल व खट्वांग, गळ्यात नररुंडमाला, जटांभोवती अस्थिमाला धारण करून, नरबली देणारा नरमांसभक्षक कापालिक आपल्या अंगी सिद्धिसामर्थ्य आहे असा बकवा करीत मध्ययुगीन भोळसर बहुजनसमाजामध्ये दरारायुक्त आदर निर्माण करून, भोळ्याभाबड्या लोकांना (यांत राजपुरुषही येतात) सिद्धी प्राप्त करून देण्याचे आमिष दाखवून, कसा बनवत असेल याची कल्पना आजसुद्धा गावगन्ना चालू असलेल्या परमार्थाच्या दुकानांवरून येईल.

संस्कृतमधील नुसते नाट्यवाङ्मय जरी पाहिले तरी पल्लवाधिपती महेंद्र-

---

१. अन्यानि चैव शास्त्राणि लोकेऽस्मिन् मोहनानि तु।
वेदवादविरुद्धानि मयैव (शिवेनैव) कथितानि तु॥
वामं पाशुपतं सोमं लाकुलं चैव भैरवम्।
असेव्यमेतत् कथितं वेदबाह्यं तथेतरम्॥ —कूर्मपु २.४०, ६१–६२.

वर्माकृत 'मत्तविलास' (ख्रि. श. ६००-६३०), भवभूतिकृत 'मालती-माधव' ख्रि. श. ९००-९५०), कृष्णमित्रकृत 'प्रबोधचंद्रोदय' ख्रि श. १०५०-११००), यशःपालकृत 'मोहराज पराजय' (ख्रि. श. ११७५ चे सुमारास) इ. नाटकांतील कापालिक हे दुष्ट, क्रूर, ढोंगी अतएव तिरस्करणीय पात्र वाटते. साहित्यातील ही पात्रे उग्र व रौद्र वाटली, तरी त्यांच्याविषयी सर्वात प्राचीन उल्लेख ख्रि. श. च्या प्रारंभीचा असून तो अत्यंत करुण पण हृद्य आहे. नायिकेचा (परपुरुष असलेला) प्रियकर वारल्यामुळे विरक्त होऊन, तिने कापालिक व्रत घेऊन, आपल्या प्रियकराचे चिताभस्म सर्वांगाला फासले अन् त्या स्पर्शसुखाने तिचे सर्वांग स्वेदशील झाले.[२] (हालकृत गाथा सप्तशती-गाथा ४०७)

स्मशानाशी संबंधित असा आचारधर्म (चर्या) पाळणारा पंथ ख्रिस्त शकापूर्वी भारतात असावा असे आपल्याला चुल्लवग्ग,[३] मैत्र्युपनिषद[४] व[५] ललितविस्तर यांतील उल्लेखांवरून वाटते. मध्ययुगातल्या कापालिक संप्रदायाचे संस्कृत साहित्यात व भारतातील भिन्न प्रांतांतील शिलालेखांतून उल्लेख मिळतात तो व बुद्धकालीन स्मशानवासी पंथ बहुधा एक नसावा.

## कापालिक तत्त्वज्ञान

कापालिक पंथाचे आकरग्रंथ वा प्रकरणग्रंथ उपलब्ध नसल्यामुळे त्यांचे तत्त्वज्ञान (विद्या), उपासनापद्धती (चर्या) इ. बद्दलची माहिती त्यांच्या विरोधकांचे ग्रंथावरून मिळते. ही माहिती विपर्यस्त असली तरी काही निष्कर्ष स्थूलमानाने काढता येतात. ते स्वतःला (व इतरही त्यांना) 'पाशुपत' मानत असल्यामुळे शैव आगमावर आधारलेली पाशुपतांची (१) पति (कारण), (२) पशु (कार्य) (३) पाश ही तत्त्वे ते मानत असावेत, वैदिक व अवैदिक भारतीय-धर्म मोक्ष (दुःखान्त) ह्या ध्येयासाठी प्रयत्नशील असत तसे कापालिकही असावेत. पण 'सोमसिद्धांती' या नावावरून त्यांची मोक्षविषयक कल्पना 'दुःखांत' अशी नकारात्मक नसून, 'महासुख' असणारी अवस्था अशी भावात्मक (Positive)

---

२. सर्वांना समजण्यासाठी त्या प्राकृत गाथेची संस्कृत छाया देतो :
नार-स्मशान-समुद्भव-भूति-सुखस्पर्श-स्वेदशीलाङ्ग्याः।
न समाप्यते नव-कापालिक्या उद्धूलनारम्भः॥
या गाथा परंपरागत असून हाल-सात वाहन संपादक असल्यामुळे मी तिला 'ख्रिस्त शकाच्या प्रारंभीची' मानतो.

३. सेबुई (Sacred Books of the East) खंड २० पृ. ८९.

४. वृथा-कषायकुण्डलिनः कापालिनः...तैः सह न संवमेत्..ते तस्करा अस्वर्ग्याः। -मैत्रायणी उप ७-८

५. कपाल-खट्वाङ्ग.धारणैश्च शुद्धि प्रत्यवगच्छन्ति सम्मूढाः।

असावी. उमासहित शिव (स + उमा) ज्या 'युगनद्ध' अवस्थेत असतो, ते परम-सुख असणारी अवस्था–इतके उत्कट महासुख ज्या अवस्थेत आहे–तो मोक्ष, असे त्यांच्या 'सोमसिद्धांती' या नावावरून वाटते. त्यांच्या इतर संज्ञा चर्यात्मक असाव्यात. (नर) कपाल धारण करणारे–खाण्यापिण्यासाठी वापरणारे–म्हणून 'कापालिक' किंवा 'कपाली', मोक्षासाठी 'महाव्रत' पाळणारे ते 'महाव्रती.' ब्रह्मदेवाचे पाचवे मस्तक तोडल्यामुळे शिवाकडून जी ब्रह्महत्या घडली तिचे परिमार्जन करण्यासाठी जे व्रत त्याने केले त्या प्रमाणे महाव्रत करणारे ते महाव्रती. ब्रह्महत्यानिवारक महाव्रतात पुढील बंधने असतात :

(१) पर्णकुटी बांधून वनात राहणे
(२) त्रिकाल स्नान
(३) ब्रह्महत्येची स्वत: वाच्यता करून भिक्षा मागणे
(४) हत्या केलेल्या ब्राह्मणाचे कपाल (हत्या झालेल्याचे कपाल उपलब्ध न झाल्यास दुसऱ्याचे) काठीवर घेऊन (खट्वांग) वावरणे व हे व्रत बारा वर्षे करणे.[६]

कापालिक गुन्हेगार नव्हते. शिवभक्तीने प्रेरित झालेली ही श्रद्धाळू माणसे आपले उपास्यदैवत जे शिव त्याच्या पौराणिक वर्णनाप्रमाणे त्याच्याशी सारूप्य (homologisation) साधण्यासाठी स्मशानवास, चिताभस्म लेपन, खट्वांगधारण इ. करीत आणि शिवाने ब्रह्महत्यानिवारणार्थ महाव्रत केले असे कूर्मादी पुराणात सांगितले असल्यामुळे कुणाचीही हत्या न केलेले हे साधक महाव्रत–साधना करीत (तत्कालीन धर्मशास्त्राप्रमाणे वेदाधिकार नसणारी माणसे मोक्षप्राप्तीसाठी कापालिक होत असतील). पुढे बौद्धधर्माच्या साहचर्यामुळे यांच्यामध्ये तंत्रोपासना शिरली.[७] व त्यांनी घृणास्पद ठरण्यासारखी तंत्रोपासना केल्यामुळे त्यांना

---

६. शिर: कपाली ध्वजवान् भिक्षाशी कर्म वेदयन् ।
ब्रह्महा द्वादशाब्दानि मितभुक् शुद्धिमाप्नुयात् ॥– याज्ञवल्क्य स्मृति ३.२४२
इतर स्मृतींत काही किरकोळ मतभेद आहेत ते 'सर्वशाखाप्रत्ययन्यायाने' समन्वित करावेत असे अपरार्काने म्हटले आहे. पुराणातसुद्धा असेच व्रत सांगितले आहे :
ब्रह्महा द्वादशाब्दानि कुटिं कृत्वा वनं वसेत् ।
भैक्ष्यमात्मविशुद्धयर्थं कृत्वा शवशिरोध्वजम् ॥ १२ ॥
एककालं चरेद् भैक्षं दोषं विख्यापयन् नृणाम् ।
वन्यमूलफलैर्वापि वर्तयेद् धैर्यमाश्रित: ॥ १५ ॥
कपालपाणि: खट्वाङ्गी ब्रह्मचर्यपरायण: ॥ १६ ॥ अ कूर्म २.३० ११–१६
७ बी. भट्टाचार्य–एसोटेरिक बुद्धिझम, प्रस्तावना.

'तांत्रिक' संज्ञा प्राप्त झाली.

कापालिकांच्या संज्ञांवरून त्यांची चर्या स्पष्ट होते पण विद्या ( तत्त्वज्ञान ) लकुलीश पाशुपताप्रमाणे द्वैताद्वैती का द्वैती होते याचा खुलासा नाही.

कापलिक मताचे नाव घेऊन खंडन करणारे रामानुजही त्यांच्या तत्त्वज्ञानावर फारसा प्रकाश टाकत नाहीत. **पत्युरसामञ्जस्यात्** 'या ब्र. सू. २.२. ३५ वर भाष्य करताना 'कापाल, कलामुख, पाशुपत व शैव यांची तत्त्वप्रक्रिया, इहलोक व परलोक यात श्रेय मिळविण्याची साधना वेदविरुद्ध आहे. निमित्त कारण व उपादान-कारण यातील भेद स्पष्ट करून ते पशुपतीला विश्वाचे निमित्त-कारण मानतात. ( वेदान्ती परब्रह्माला विश्वाचे निमित्त-कारण मानतात. ( वेदान्ती परब्रह्माला विश्वाचे उपादान व निमित्तकारण मानतात ). त्यांचे मते निःश्रेयस (मोक्ष) प्राप्तीसाठी सहा मुद्रांचे ज्ञान व परमुद्राविशारद असणाऱ्या भगासनस्थ आत्म्याचे ध्यान करण्याने साधक मुक्त होतो.८ उपर्युक्त सहा मुद्रा म्हणजे कंठिक, रुचक, कुण्डल, शिखामणि, भस्म आणि यज्ञोपवीत या होत. या मुद्रा शरीरावर धारण करणारा पुनर्जन्म पावत नाही. मनुष्य कोणत्याही जातीचा असो तो (कापालिक) दीक्षा घेताच ब्राह्मण होतो व कापाल व्रत स्वीकारल्यावर यति होतो.[९] रामानुजांचे मते कापालिकासारखे कालामुख सुद्धा नरकपालात भोजन, शवभस्माने स्नान भस्मप्राशन, लगुड (खट्वांग?) धारण करतात व सुराकुंभस्थापन करून त्यावर देवतेची प्रस्थापना करून पूजादि केल्यास ऐहिक व पारलौकिक फळ मिळते असे मानतात.[१०] रामानुजमते वर उल्लेखलेली 'तत्त्वपरिकल्पना व उपासना पद्धती वेद विरुद्ध आहे व म्हणून अनादरणीय आहे.

पुढील विभागात दाखविल्याप्रमाणे शिलालेखादी उपलब्ध साहित्यावरून

---

८. **मुद्रिकाषट्कतत्त्वज्ञः परमुद्राविशारदः ।**
**भगासनस्थमात्मानं ध्यात्वा निर्वाणमृच्छति ॥**
येथे 'भग' म्हणजे 'योनी' नसून बौद्धपरिभाषेतील 'भग' म्हणजे 'ख-धातु' किंवा 'शून्यता' हा अर्थ अभिप्रत असावा. बौद्धतंत्रांत अनेकदा बुद्धाविषयी 'भगवान् सर्व-तथागत काय...वज्रयोषिद्भगेषु विजहार' असे उल्लेख येतात.

९. **दीक्षाप्रवेशमात्रेण ब्राह्मणो भवति क्षणात् ।**
**कापालं व्रतमास्थाय यतिर्भवति मानवः ॥**

१०. **मुद्रिकाषट्कधारण-भगासनस्थात्मध्यान-सुराकुम्भस्थापन तत्स्थदेवतार्चन-गूढाचारश्मशानभस्मस्नानप्रणवपूर्वाभिध्यानानि अन्योन्यविरुद्धानि । वेद-विरुद्ध चेदं तत्त्वपरिकल्पनमुपासनमाचारश्च ।**
-श्रीभाष्य २.२.३५ पृ. ६९०-९१ (करमरकर आवृत्ती)

रामानुजांची कालामुखांसंबंधी माहिती बरोबर नाही. आनंदगिरिकृत 'शंकर-विजयात' शंकराचार्यांनी कापालिक आचार्य बोधोल्बण नित्यानंद याला कापालिकांचा आचार व निधी विचारताच तो सांगतो.

स्वामी, आमचा आचार सर्व प्राण्यांना संतोषकारक व **कर्महीन** आहे. कारण कर्मामुळे मुक्ती मिळत नाही (**कर्मणा न मुक्तिरिति वचनात्।**) माझे उपास्य दैवत भैरव एक (**एकमेकाद्वितीय**) असून तो जगदुत्पत्ती, स्थिती व प्रलय-कर्ता आहे. इतर देवता तदंशभूत असून भैरवाच्या आज्ञेवरून त्या आपापली कर्तव्ये पार पाडतात.[११]

त्याच्या तदंगभूत अष्टमूर्तींपैकी 'संहारभैरव' हाच खरा परमात्मा होय

उत्तरकालीन कापालिकांमध्ये सिद्धिप्राप्तीसाठी पंचमकारात्मक तंत्रसाधना नरबली इ. चे प्रस्थ खूप माजले व तो पंथ घृणास्पद ठरला. त्यांची मोक्ष कल्पना केवळ दु:खशून्यता नसून वर उल्लेखल्याप्रमाणे रतिसुखाची परमावधी असलेली अवस्था आहे.[१२]

भक्तीपेक्षा हठयोगावर व मोक्षापेक्षा सिद्धीवर भर देऊन व संध्याभाषेतील पंचमकार, महासुख इ. पारिभाषिक शब्दांचा रूढार्थ घेऊन उत्तरकालीन कापालिकांनी आपल्या पंथाला कमीपणा आणला.

## कालामुख

पाशुपत सांप्रदायाची आज लुप्तप्राय (पण बहुधा रूपांतरित) शाखा म्हणजे कालामुख किंवा कालमुख होय. कपाळावर कृष्णवर्णी (आडवा) पट्टा लावण्याचे त्यांच्या प्रघातावरून हे नाव पडले असावे असा टी. ए गोपीनाथराव इ. विद्वानांचा तर्क आहे. या संप्रदायाचे (१) शक्तिपरिषद् व (२) सिंहपरिषद् असे दोन उपपंथ होते. या संप्रदायांचा प्रसार इ. स. च्या ११ व्या, १२ व्या व १३ व्या शतकांच्या पूर्वार्धात मुख्यत: कर्नाटक व आंध्र प्रदेशाचा काही भाग

---

११. स्वामिन्, अस्मदाचार: सर्वप्राणिसन्तोषकर: कर्महीन:, कर्मणा न मुक्तिरिति वचनात्। मदुपास्यो भैरव एक एव जगत्कर्ता। तत: प्रलयो भवतीति यो वा प्रलयकर्ता स एव स्थित्युत्पत्त्योरपि।...तदंशा एव सर्वे देवा: तत्तधिकार सम्पन्ना: श्रीमद्भैरवाज्ञां शिरसा धृत्वा तदुक्तिप्रत्यासन्नशक्तय: तत्तत्कार्यपरा भवन्ति।

—शंकरविजय—ch.xxlll संपादक, जे. तर्कपंचानन

१२. पाहा: प्रबोधचंद्रोदय, अंक ३, श्लोक १६, माधवकृत शंकरदिग्विजय १५.२८ वरील धनपतिसूरीची डिंडिम टीका: '**कापालिकमेव कामसाधने**' हे बृहस्पति सूत्र II. ६

यात होता असे उपलब्ध शिलालेखांवरून दिसते. या संप्रदायापैकी शक्तिपरिषद् ही मुख्यतः धारवाड व शिमोगा जिल्ह्यात प्रभावी होती असे त्या परिषदेच्या देवालयांना व मठांना दिलेल्या देणग्या नमूद करणाऱ्या शिलालेखांची संख्या, शिलालेखांतील सांप्रदायिक, ऐतिहासिक व इतर माहितीची विपुलता यावरून दिसते. सिंहपरिषद् कर्नाटक व आंध्र या दोन्ही प्रांतात विस्तारलेली असली तरी त्यांच्या देवालयांना व मठांना दिलेल्या देणग्यांच्या शिलालेखांची संख्या शक्ति-परिषदेपेक्षा कमी आहे. या संप्रदायाचे संस्थापक वा प्रचारक काश्मीरी ब्राह्मण असावेत असे विजापूर जिल्ह्यातील विजापूर (इ. स. १०७४–७५), मुत्तगी (ई. स. ११४७ व ११५८) येथील शिलालेखांतून आढळते. हे सर्व आचार्य कदाचित काश्मीरी नसतीलही. पण ते ब्राह्मण असावेत. कारण ते लकुलागमात (लकुलीशकृत पाशुपतसूत्र इ.) तज्ज्ञ होतेच पण त्याचबरोबर ते वेद, शास्त्र (व्याकरण, न्याय मीमांसा इ.) पुराण, इतिहास व नीतिशास्त्र यांतही पारंगत होते. योगविद्येवर त्यांचा भर होता. त्यांच्या मठांतून या विद्यांचे शिक्षण दिले जाई व त्याबद्दल त्यांना तत्कालीन सत्ताधीशांकडून देणग्या मिळाल्याचे शिलालेखांत नमूद केले आहे. त्यांची देवालये (उदा. केदारेश्वर, सोमनाथ, पंचलिंग इ.) महादेवाची (शिवलिंगाची) असून त्यातील काही लेखांत वर्णाश्रमधर्मावर भर असला तरी पाशुपतांप्रमाणे ते सर्ववर्णांना ज्ञानदान करीत. त्यांच्यानंतर आलेल्या वीरशैवांप्रमाणे ज्ञानेच्छुकांना ज्ञान करण्याविषयीच्या सूचना काही लेखांत आढळतात.[१३]

ही तपशीलवार माहिती पाहता रामानुजांनी ब्र. सू. २. २. ३५ वर भाष्य लिहिताना **'तथा कालामुखा अपि कपालपात्रभोजन–शवभस्मस्नान–तत्प्राशन लगुडधारण–सुराकुम्भस्थापन – तदाधारदेवपूजादिक–मैहिकामुष्मिक सकल फल-साधन मभिदधति'** हे कालामुखांचे केलेले वर्णन ऐकीव माहितीचे आधारे व वैष्णवेतरांचे बद्दल असणाऱ्या तत्कालीन वैष्णव समाजाच्या भावनांमुळे लिहिलेले असावे असे वाटते. कालामुखापैकी काही पाशुपतसूत्रात पापनाश होण्यासाठी लोकांकडून 'निंद्य' होण्याची जी 'चर्या' सांगितली आहे. तिचे अनुकरण करणारे नसतील असे नाही. पण शक्तिपरिषद् किंवा सिंहपरिषद् किंवा आणखी काही उपपंथाच्या आचार्यांची विद्वत्ता, तपश्चर्या, आचरण आमजनतेला करीत असलेले ज्ञानदान इ. ची जी आदरयुक्त वर्णने या पंथाविषयीच्या शिलालेखांमधून आढळ-तात. ती सर्वांनाचा आदरणीय वाटण्यासारखीच आहेत.

आधुनिक विद्वानांचे मते हा संप्रदाय एका अर्थी वीरशैव मताचे पूर्वरूप आहे. ते याबद्दल पुढील पुरावे मांडतात :

---

१३. डेव्हिड एन्. लोरेन्झेन कृत 'द कापालिकाज अँड कालामुखाज' थॉम्सनप्रस, न्यू दिल्ली, १९७२, या पुस्तकातील 'कालामुखा 'वरील प्रकरणे ४ व ५ (पृ. ९७ ते १७२) चे आधारे.

१. कालामुखांची सर्व प्रमुख देवालये (व मठ) आज वीरशैवांची पुण्यक्षेत्रे असून ती त्यांच्या ताब्यात आहेत. एस. सी नंदीमठांनी ' ए हँडबुक ऑफ वीरशैविझम् ' पृ. ९ वर हूली (की ?) येथील कलानुभव मठ आता वीरशैवांचा महत्त्वाचा मठ बनला असून इतरही कालामुख मठ व (मंदिरे) सावकाशपणे कुणाच्याही लक्षात न येता वीरशैव बनले (slowly and imperceptibly they have been absorbed into Virasaivism) म्हैसूर गॅझेटियर (II part 11,885) मध्ये या कालामुख पाशुपतांच्या आचार्यांच्या कार्याचा परिपाक म्हणजे बसवेश्वर व इतर प्रारंभीचे वीरशैव यांच्या नेतृत्वाखाली झालेले शैवपंथाचे पुनरुत्थान होय.[१४]

कालामुख व वीरशैव या दोन पंथांचे समान विशेष म्हणजे लिंगपूजेवर भर व मठ-संस्था. बेलगावे मठाचे कालामुख आचार्य केदारशक्ती हे केदारेश्वर मंदिर प्रमुख होते. त्यांनी ' जो कोणी फक्त एका लिंगाची स्थापना करील त्यास आगमात वर्णन केलेल्या फलापेक्षा कोटी पट फळ मिळेल ' असे म्हटल्याचे तेथील इ. स. ११६४ च्या शिलालेखात नमूद केले आहे (Rice–Epigraphica Carnatica VII. SK. 108). बसवेश्वरापूर्वी प्रत्येक व्यक्तीने लिंगधारण करण्याची प्रथा असल्याचे बसवपुराणावरून आढळले तरी त्या प्रथेचे श्रेय कालामुखांना देण्याइतका विश्वसनीय पुरावा आहे, असे त्याच्या शिलालेखांवरून वाटत नाही.

वीरशैव मतात ' जंगम ' (चलत्-लिंग) या अर्थी त्यांच्या धर्म-गुरूंना (लिंगायतातील ' ब्राह्मणां 'ना) संबोधतात.[१५] कालामुख धर्मगुरूंना त्याच अर्थी ' जंगम ' म्हणत असत. उदाहरणार्थ गदग येथील इ. स. ११९२ मधील उत्कीर्ण-लेखात चंद्रभूषण पंडित देव या कालामुख प्रमुखाला ' भगवान् त्रिकुटेश्वराचे ' जंगम-लिंग ' म्हटले आहे. मुनवळ्ळी यथील जगदीश्वर मंदिर प्रमुख सर्वेश्वरदेव या कालामुखाला इ. स. १२५२ च्या शिलालेखात ' जंगम-लिंगावतार ' असे संबोधले आहे.

मला वाटते की कालामुख संप्रदाय वीरशैव संप्रदायात विलीन झाला ही ऐतिहासिक घटना म्हणून मान्य करावी. पण तत्त्वज्ञानदृष्टया कालामुख संप्रदायाची भूमिका स्पष्ट करणारे पुरावे फारसे उपलब्ध नाहीत. नाही म्हणावयास होंबळ येथील बोन्तेयमुनी या कालामुख आचार्याने शिव-ब्रह्म निराकार असले तरी ते

---

१४. The saivite revival under Basava and the early virasaivas seems to have followed as the natural result of the work of these saiva teachers of the Pasupata [sic for Kalamukha] school at Belagami [ = Belagave]

१५. L. Renou and J. Filliozat– L'Inde classique I. 638 – लोरेंझनकृत ' द कापालिकाज अँड कालामुखाज ' पृ. १७१ तळटीप १४३

आपल्या इच्छाशक्तीने सृष्टीची उत्पत्ती, स्थिती व संहार करते असे म्हटले आहे. त्यांनी मांडलेले हे मत वीरशैवही मानतात. ईश्वरी इच्छेप्रमाणे कर्मफल मिळते. कर्मवाद तसा अनियंत्रित नाही, हे पाशुपतांचे मत रेवणार्यांना मान्य आहे पण कालामुखसंप्रदायी वेदशास्त्रसंपन्न काश्मीरी वा कानडी ब्राह्मणांना वीरशैवांचा जातिसंस्थेला विरोध, विधवाविवाहविषयक मते मान्य असू शकतील का? वीरशैवांचे 'षट्स्थल' विषयक वैशिष्ट्यपूर्ण असलेले तात्त्विक विवेचन त्या प्रकरणात येईल.

अधिक पुरावा उपलब्ध होईपर्यंत कालामुखांचे नेमके तत्त्वज्ञान काय होते व पाशुपत तत्त्वज्ञानाशी मतभेद कोठे होता किंवा वीरशैव तत्त्वज्ञानाशी तुलना आज करणे कठीण आहे. तथापि वीरशैवमताची पार्श्वभूमी तयार करण्याचे श्रेय कालामुखांना देण्यास प्रत्यवाय नसावा.

## ३ हरि-हर (संप्रदाय)

भिन्न-भिन्न उपासना असणाऱ्या समाजघटकांतील संभाव्य कटुता टाळून त्यांच्या उपास्य दैवतांत फरक नाही-**एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति**-हे तत्त्व पटविण्याचा मूर्ति-शास्त्रीय मार्ग म्हणजे ती दोन्ही दैवते एकत्र एका मूर्तीत व्यक्त करणे. परंतु त्यापूर्वी समाजाची समन्वयात्मक मनोवृत्ती निर्माण करण्यासाठी अनेक वर्षे प्रयत्न करावे लागतात. भारतात शिव व विष्णू यांच्या उपासकांची संख्या व त्यांच्यातील दुजाभाव नष्ट करण्यासाठी पुराणकारांनी अनेक कथा रचून शिव व विष्णू एकरूप आहेत असे ठसविण्याचा आटोकाट प्रयत्न केला आहे उदाहरणार्थ, कूर्मपुराणात म्हटले आहे :

"ज वेदानुयायी लोक रुद्र व विष्णू यांना ते एकच आहेत असे मानतात (**एकीभावेन पश्यन्ति**) ते मोक्षास जातात. जो विष्णू आहे तोच स्वतः रुद्र आहे व जो रुद्र आहे तोच विष्णू (जनार्दन) आहे असे मानून त्याची उपासना करतो तोच श्रेष्ठ गतीला (मोक्षाला) जातो.[१६]

कृष्ण व महादेव मूळचे एकच होते पण कृष्णाने आपले दोन भाग करून आपला डावा भाग महादेव व उजवा भाग आपण आहोत असे दाखवले (नारद पुराण ८३.२३). शिव आणि विष्णू अनेक हर्षामर्षांचे प्रसंगी एकमेकास भिडले व एकरूप-स्वत्व कायम ठेवून एका मूर्तीत रूपांतरित झाल्याच्या कथा अनेक पुराणांतून येतात. आणि या दोघांच्या मीलनातून जी मूर्ती साकारते तिचा उजवा भाग

---

१६. **वेदानुवर्त्तिनो रुद्रं देवं नारायणं तथा । एकीभावेन पश्यन्ति मुक्तिभाजो भवन्ति ते ॥**
**यो विष्णुः स स्वयं रुद्रो यो रुद्रः स जनार्दनः ।**
**इति मत्वा भजद्देवं स याति परमां गतिम् ॥** कूर्म I. 15. 89-91.

शिवाचा असतो व डावा भाग विष्णूचा असतो.[17] म्हणजे मूर्तीच्या डोक्याच्या अर्ध्या भागावर जटामुकुट किंवा जटाजूट व चंद्रकोर व डाव्या अर्ध्यावर रत्नजडित मुकुट, उजव्या कानात सर्प कुंडल व डाव्या कानात मकराकृती कुंडल. हरिहराच्या उजव्या बाजूच्या दोन हातापैकी एकाने अभयमुद्रा किंवा वरदत्व दाखवावयाचे तर दुसऱ्या हातात त्रिशूल असतो (काही आगमांत परशू किंवा रुद्राक्षमाला असते असे म्हटले आहे). रत्नजडित केयूर असलेल्या डाव्या दोन हातात शंख, चक्र किंवा चक्राऐवजी गदा असावी. उजव्या बाजूला गजचर्म व गुडघ्यापर्यंत नेसलेले व्याघ्रचर्म व डाव्या (अर्ध्या) बाजूला रत्नजडित मेखला व पीतांबर दाखवावयाचा. यज्ञोपवीत नागाचे दाखवावयाचे. सारांश बृहद्धर्म पुराणात म्हटल्याप्रमाणे 'जो मी महादेव आहे तोच मी विष्णू आहे' (**स एवाहं महादेवः स एवायं जनार्दनः**) असे शिव-विष्णूंचे ऐक्य दाखवण्याचा हा प्रयत्न आहे.

सुप्रभेदादि आगमांतून व विशेषतः हेमाद्रीच्या चतुर्वर्गचिंतामणीच्या व्रतखंडात (पृ. १२६) असेच वर्णन आहे. मी हरिहराची अशी प्राचीन (पण किंचित् भग्नावस्थेतील) मूर्ती बदामीला पाहिली. पण तिच्यात एका बाजूला लक्ष्मी व एका बाजूला पार्वती असून शिवगणांचा वाद्यवृंदांचा ताफा आहे. गोपीनाथरावांनी आपल्या 'एलमेंट्स ऑफ हिंदू इकॉनॉग्राफीच्या २ ऱ्या खंडात अशा[1] (हरिहरांच्या) मूर्तींचे नमुने दिले आहेत. भारतीय संस्कृतीत शिवलिंग हे शिस्न नसून '**लिङ्गं साक्षात् महेश्वरः**' अशी श्रद्धा आहे. म्हणून आग्नेय आशियातील देशात 'मुखलिंगे' आढळतात. बिहारमध्ये शोणपूर स्टेशन जवळ हरिहर–छत्रपूरला एकाच

---

१७. अशी हरिहराची मूर्ती कशी करावी हे मत्स्य पुराणात (अध्याय २५९, श्लोक २२–२७) मध्ये सांगितले आहे :

**वामार्धे माधवं विद्याद् दक्षिणे शूलपाणिनम् ।**
**बाहुद्वयंच कृष्णस्य मणिकेयूरभूषितम् ॥ २२ ॥**
**शङ्खं चक्रधरं शान्तमारक्तांगुलिविभ्रमम् ।**
**चक्रस्थाने गदां वापि पाणौ दद्याद् गदाभृतः ॥ २३ ॥**
**शङ्खं चैवेतरे दद्यात् कटयर्धे भूषणोज्वलम् ।**
**पीतवस्त्रपरीधानं चरणं मणिभूषणम् ॥ २४ ॥**
**दक्षिणार्धे जटाभारमर्द्धेन्दुकृतभूषणम् ।**
**भुजङ्गहारवलयं वरदं दक्षिणं करम् ॥ २५ ॥**
**द्वितीयं चापि कुर्वीत त्रिशूलवरधारिणम् ।**
**व्यालोपवीतसंयुक्तं कटयर्धं कृत्तिवाससम् ॥ २६ ॥**
**मणिरत्नैश्च संयुक्तं पादं नागविभूषितम् ।**
**शिवनारायणस्यैवं कल्पयेद्रूपमुत्तमम् ॥ २७ ॥**

शिवलिंगावर शेजारी हरि व हर कोरले आहेत. ओरिसातील लिंगराज मंदिरातील मुख्य स्वयंभू लिंग हेच हरिहरांचे प्रतीक मानून त्याला बेल व तुळशी वाहतात. पंढरपूरला विठ्ठलाचे डोक्यावर शिवलिंग असल्यामुळे तोही हरिहरैक्य दर्शक मूर्तींचा प्रकार मानला जावा. कारण 'विठ्ठल' (विष्णू) व 'पांडुरंग' (महादेव) ह्या दोन्ही नावांनी ती मूर्ती ओळखली जाते.

वर उल्लेखल्याप्रमाणे हरि–हर उपासकांत समन्वय दाखवण्याचा प्रयत्न कुषाण–तुर्की–राजा हुविष्क (इ. स. १०६–१३८) याच्या नाण्यावर आढळतो. तसे ऐक्य साधण्याचा जोरदार प्रयत्न पुराणातून गुप्त कालापासून चालू असून त्याला शैव आगमांतही आधार आहे.[१८] या हरि–हरामध्ये प्राचीन काळची ब्रह्मदेवाची उपासक मंडळी समाविष्ट होऊन त्रिमूर्तीची स्थापना होऊ लागली. या हरिहरात्मक एकात्मतेच्या प्रसाराचे श्रेय पुराणकारांना द्यावे लागेल. कारण 'जे जे दृश्य अदृश्य स्थावर जंगम विश्व आहे ते सर्व रुद्रनारायणात्मक आहे.[१९] अशी वायुपुराणातील घोषणा इतरही पुराणकारांनी करून हे ऐक्य साधण्याचा प्रयत्न केला आहे. '**एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति**' या वेदवचनांचे हे उपबृंहण आहे.

हरिहर मूर्ती जर समन्वयात्मक संप्रदायाचे प्रतीक असतील तर तो संप्रदाय भारतभर प्रचलित होता असे मानले पाहिजे. उत्तर गुजरातमध्ये वीसनगरला विशाल चौहानांनी काळ्याभोर पाषाणाची सुंदर हरिहर मूर्ती असणारे मंदिर बांधले आहे. महाराष्ट्रात सोपारा (ठाणे जिल्हा) येथेही अशीच मूर्ती आहे. विशेष म्हणजे आंध्रमधील तिरुपतीच्या मूर्तीला प्राचीन तामिळी शैव संतकवी उदाहरणार्थ पेयाळवार (Peyalvars), तिरुमूलर, पोयगै (Paygai) अळवार—हरिहराचे प्रतीक मानतात.[२०] कर्नाटकात हरिहर, हूलि (इ. स. १०९७ मधील शिलालेख) कूडलूर येथे, भारताबाहेर जावा, कांबोज इ. अग्नेय आशियातील देशात या पंथाचा प्रसार होता असे तेथील हरिहरांचे मूर्तींवरून दिसते.

हरिहरैक्य वा सर्वदेवतासमन्वयाच्या प्रक्रियेला चालना मिळण्याची सामाजिक, ऐतिहासिक वा धार्मिक कारण–मीमांसा प्रस्तुत ग्रंथाचे कक्षेबाहेर आहे. यमाचा संहारकपणा रुद्रात वेदकालापासून असला, तरी ही समन्वय प्रक्रिया वेद

---

१८. उदा. सुप्रभेद आगम पटल ३४

१९. **प्रकाशं चाप्रकाशं च जङ्गमं स्थावरं च यत् ।**
**विश्वरूपमिदं सर्वं रुद्र–नारायणात्मकम् ।** –वायु २५–२१

२०. सी. व्ही. नारायण अय्यर–ओरिजिन अँड दि अर्ली हिस्ट्री ऑफ शैविझम् इन् साऊथ इंडिया, युनिव्हर्सिटी ऑफ मद्रास, १९३६, पृ. २४० ते २४२.

२१. उदा. डॉ. प्रणबानंद जाश यांचे हिस्ट्री ऑफ शैविझम् मधील पृ. १४५ वरील विवेचन.

कालापूर्वी होती असे दाखविण्यास यम–यमी व त्या शब्दाचे इंडोयुरोपीय भाउबंद (cognates) यांचा आधार शोधणे अनैतिहासिक आहे.[२२] शैवतत्त्वज्ञानाचे दृष्टीने हरिहरसंप्रदायाचा प्रारंभ (महाभारतात या विषयी आलेल्या कथा व तत्त्वचर्चा लक्षात घेता) निदान ख्रिस्तशकाचे प्रारंभापासून झाला असावा एवढेच म्हणता येईल. अशा मूर्तीचे पूजाविधी इ. बद्दलचे आगमातील व पुराणातील तपशील तात्त्विक दृष्टचा महत्त्वाचे नाहीत.

### ४. मार्तंड भैरव

आपल्या या भागात फारशा न आढळणाऱ्या मूर्ती म्हणजे शिव-सूर्य अथवा मार्तंड-भैरवांच्या. त्या मुख्यत: पूर्व भारतात (ओरिसा व बंगाल) आढळतात. वैदिक विष्णू सूर्यदेव असल्यामुळे हरि–हर व मार्तण्ड भैरव एक वाटण्याचा संभव आहे. पण पुराणांतील सूर्यदेव आदित्य असला तरी तो विष्णूपेक्षा भिन्न आहे हे त्याच्या ध्यानावरून स्पष्ट होते.[२३] तथापि पुराणकारांनी सौर व शैव संप्रदायांचे ऐक्य प्रस्थापित करताना नवग्रहशांतीमध्ये 'ईश्वर (शिव) हे भास्कराचे अधिदैवत आहे' (**भास्करस्येश्वरं विद्यादुमाञ्च शशिनस्तथा**–मत्स्य पु. ९२.१३), 'उमापति व रवीमध्ये भेद नाही.' सूर्याला व शिवाला नमस्कार करणे हे एकाच देवाला नमस्कार करणे आहे.

या अर्थी

**नम: शिवाय देवाय ईश्वराय कपर्दिने ।**
**रुद्राय विष्णवे तुभ्यं ब्रह्मणे सूर्यमूर्त्तये ॥**

लिंगपुराणातील 'शिवपूजा–विधानातील' (उत्तरार्ध अध्याय १९, श्लोक ३९ वस्तुत: श्लोक २७ ते ३९ हे स्तोत्र), पुराणकार शिव व सूर्य या देवतांचे एकत्व प्रस्थापित करीत आहेत असे दाखवतात.

या संप्रदायाचे तत्त्वज्ञानदर्शक ग्रंथ उपलब्ध नाहीत.

---

२२. उदा. कोणार्कच्या सूर्यमंदिरावरील शिल्प.

२३. सूर्य सात अश्व जोडलेल्या एक चाकी रथात असून त्याने उभे धरलेल्या दोन हातात दोन कमळे (पुष्कर) आहेत. त्याचा मुकुट विचित्र (विभिन्न वर्णाचे किरण फेकणारा ?) असून त्याने सर्वांग झाकणारा अंगरखा (**चोलक–छन्न वपुषम्**) तर कधी कधी दोन वस्त्रे (**वस्त्रयुग्मसमोपेत्तं**) पेहेरली आहेत आणि त्याचे चरण तेजाने व्याप्त असल्यामुळे दिसत नाहीत. (मत्स्य पु. २६१–१–४): उत्तर भारतात आढळणाऱ्या प्राचीन सूर्य मूर्ती लांब अंगरखा, विजार व पायात जाड बूट घातलेल्या कुषाण वीरासारख्या आहेत. पण बुटामुळे त्याचे पाय दिसत नाहीत असे न म्हणता **चरणौ तेजसावृतौ** असे म्हटले आहे. कालांतराने या मूर्तीचे भारतीय वेषात **रूपांतर** झाले हा भाग वेगळा पण विष्णू व सूर्य यांची पौराणिक स्वरूपे भिन्न आहेत व त्यामुळे 'हरिहर' व 'मार्तण्ड भैरव' या मूर्ती भिन्न स्वरूपी आहेत.

## ५. अर्ध-नारीश्वर

मत्स्यपुराण २५९-१-१० मध्ये एकाच मूर्तीत उजवा अर्धा भाग शिव व डावा उमा कसा असतो त्याचे वर्णन आहे. ते थोडक्यात असे :

डोळे : अर्धा भाग जटाजूट व चंद्रकला युक्त; डाव्या बाजूला वेणी व तिलक. उजव्या कानात सर्पा (वासुकीचे कुंडला) सारखे वेटोळे व डाव्या कानात कुंडल. उजव्या हातात त्रिशूल व डाव्या हातात दर्पण किंवा विशेषत: कमल (त्यावर केयूरादि आभूषणे पाहिजेतच). डाव्या बाजूला पीन स्तन, (उजवी छाती यज्ञोपवीतासह पुरुषी). कमरेखालचा उजवा भाग व्याघ्रचर्म परिधान केलेला पण ऊर्ध्वलिंग, डाव्या बाजूस कमरपट्टा स्त्रीवस्त्र व पायातील अलंकार शक-पार्थियन काळातील अशी प्राचीन मृण्मयमूर्ती जॉन मार्शलना तक्षशिलेच्या उत्खननात मिळाली. अशा मूर्तीचे इ. स. चे ३ ऱ्या शतकातील ग्रीक ग्रंथकारांनी उल्लेख केलेला आढळतो (आनंदकुमारस्वामी–हिस्ट्री ऑफ इंडियन अँड इंडोनेशियन आर्ट, न्यूयॉर्क, १९२७) गुप्तकाळानंतर या मूर्ती मंदिरे, लेणी इ. मध्ये राजस्थान, बंगाल (खुलना, ढाका, दिनाजपूर इ. जिल्हे), ओरिसा व दक्षिण भारतात आढळतात.[२४]

या मूर्तींवरून हा संप्रदाय एका काळी भारताच्या अनेक भागात रूढ होता असे दिसते. तामिळी शैवसंत संबंदर (इ. स. चे ६ वे शतक) व माणिक्कवाचक किंवा माणिक्कवसगर (इ. स. चे ७ वे शतक) हे अर्धनारीश्वराच्या मूर्तीचे वर्णन करतात व ते सिद्धांतशैवी होते. या संप्रदायाचे ग्रंथ उपलब्ध नसल्यामुळे यांचे तत्त्वज्ञान काय होते हे सांगता येत नाही. कामिकागम, सुप्रभेदागम इ. आगमग्रंथात अर्धनारीश्वरमूर्ती कशी असावी याचे वर्णन आहे. लिंगपुराणात मूर्तीचा उजवा भाग लिंग व डावा भाग योनी असल्याचे मानले आहे. ही मूर्ती प्रकृति–पुरुष ऐक्याचे प्रतीक असावी, यापासून युगनद्ध या बौद्ध संकल्पनेचे प्रतीक असावी येथपर्यंत अनेक तर्क मानता येतील.

वरील अर्धनारीपेक्षा युगनद्ध कल्पनेकडे कललेल्या व आगमात 'उमा—आलिंगन', 'सोमास्कंद' इ. नावांनी उल्लेखलेल्या 'उमा–महेश्वर' किंवा 'हर–गौरी' या मूर्ती तंत्रोपासनापद्धतीत आढळतात.

---

२४. टी गोपीनाथरावांनी एलेमेंटस् ऑफ हिंदु आइकॉनॉग्राफी खंड २ यात बदामी, कुंभकोणम्, कांची, मदुरा, महाबलीपुरम् इ. आठ ठिकाणच्या मूर्तींचे फोटो दिले आहेत. यातील तीन ठिकाणच्या मूर्ती (बदामी, महाबलीपुरम, मदुरा) मी पाहिल्या. महाराष्ट्रातल्या पाहण्यात आल्या नाहीत. पंढरपूर जवळील वेळापूरची मूर्ती अर्धनारीश्वराची नाही.

मत्स्यपुराणात (२५९.१३–१९ अ) शंकराच्या डाव्या मांडीवर देवी असून शंकराचा एक हात तिच्या स्तनावर असलेली (**वामे कुचभरे करम्**) इ. वर्णन केलेली शृंगारसूचक उमा–महेश्वर मूर्ती गुप्तकाळापासून उत्तरप्रदेश (कौशांबी–आधुनिक कोसम, मथुरा, वाराणसी) बिहार आणि विशेषे करून बंगाल वगैरे तंत्रोपासनेविषयी पूर्वापार प्रसिद्ध असलेल्या प्रांतांत आढळतात. दक्षिण भारतातील अशा मूर्तींची स्थळे टी. गोपीनाथरावांनी नमूद केली आहेत. आगमातील देवीपूजा अशाच जोडदेवतेची असते. या संप्रदायाचे तत्त्वज्ञान आगमिक आहे असे म्हटल्यास वावगे होणार नाही.

कल्याण सुंदर किंवा शिव–पार्वती–परिणयाची सुंदर शिल्पे वेरूळला बदामी-शेजारी पट्टदकल येथील मल्लिकार्जुन मंदिरात व मदुरेला मीनाक्षी मंदिरात मी पाहिली. तिन्ही ठिकाणची शिल्पे–विशेषत: बावरणारी जुनी भारतीय नववधू व हिंदू विवाहातील पाणिग्रहण प्रसंग, तत्कालीन पोषाख, अलंकार, शिव, विष्णू इ च्या चेहऱ्यावरील भाग फार चांगल्या रीतीने व्यक्त करणारी असली तरी तो एक पंथ असल्यास त्याचे ग्रंथगत तत्त्वज्ञान उपलब्ध नाही. तीच गोष्ट गंगाधर मूर्तीची. गंगावतरणाच्या प्राचीन मूर्ती किंवा शिल्पे दक्षिणभारतात सुद्धा कमी आहेत आणि 'जिस देशमे गंगा बहती है' त्या उत्तर भारतात तर त्याहून कमी आहेत. ही मूर्ती संप्रदायद्योतक नाही.

## ६ नाथपंथ

शेवटी, मध्ययुगात भारताच्या सर्व भागांत आध्यात्मिक वर्चस्व असलेल्या व आज विद्यमान असणाऱ्या अनेक संत परंपरांच्या गुरुस्थानी असलेल्या नाथपथाचा विचार करू. नाथपंथी म्हटला म्हणजे अंगाला भस्म फासलेला, रुद्राक्षाच्या माळा डमरू, शिंगी, मेरवला धारण करून 'अल्लख' पुकार करणारा जटाधारी गोसावी डोळ्यासमोर येतो. शिव या आराध्यदैवताशी एकरूप होणारी वेषभूषा स्वीकारणारा हा पंथ वामाचारी बौद्ध सांप्रदायाचा वारस असला तरी तो आता कट्टर शैव आहे बौद्ध, शैव, शाक्त या सर्वातच वामाचार घुसल्यामुळे सामरस्यसिद्धीसाठी ज्ञानदेव प्रणीत 'पिंडे पिंडाचा ग्रासू' करण्याची प्रक्रिया बाजूला राहून पंचमकारांची लक्षणा न घेता अभिधा आचरणात आणणारे त्याचे अनुयायी माननीय स्थान गमावून बसले आहेत. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने काश्मीरी शैवमताची ३६ तत्त्वे नाथपंथाने स्वीकारल्यामुळ तो एका अर्थी काश्मीरी शैवमताची शाखा ठरते व त्या मताचे विवेचन पूर्वी केल्यामुळे ते येथे अनावश्यक आहे.

## उपसंहार

आपण आतापर्यंत मुख्यत: (न) लकुलीश पाशुपत, ईश्वराद्वयवादी त्रिक (काश्मीरी) शैवमत, सिद्धांतशैवमत, श्रीकंठ पुरस्कृत विशिष्टाद्वैती 'शिवाद्वैत य शक्तिविशिष्टाद्वैती वीर शैवमत यांचा विचार केला. यापैकी (न) लकुलीश

पाशुपतमत वेदाधिष्ठित असून इतर आगमाधिष्ठित आहेत. 'आगमाधिष्ठित' याचा अर्थ ते वेदप्रामाण्य नाकारत नाहीत. उलट आगम व निगम हे दोन्ही शिव प्रणीत असून दोहोतील तत्त्वज्ञान एकच आहे असे आग्रहपूर्वक मांडतात. (वैष्णव रामानुजांनी श्रीभाष्यात आपल्या आगमांचा वेदान्ताशी असाच समन्वय दाखवला आहे.) पण निगम हा त्रैवर्णिका करता मर्यादित असून आगमाविषयी सर्व वर्णांना अधिकार असल्यामुळे आगमप्रणीत शैवमताने सर्व जातीच्या स्त्रीपुरुषांना आपल्यात सामावून घेतले आहे. 'चतुर्वर्णां नामाधिकार' (व पर्यायाने मोक्षाधिकार) या भावी भक्तिमार्गीय घोषणेचे हे पूर्वरूप आहे.

या संप्रदायांचा साकल्याने विचार करता एक महत्त्वाची गोष्ट लक्षात येते की तत्त्वज्ञान या दृष्टीने या संप्रदायात फारसा फरक नाही. विश्वाचे स्वरूप सांगताना सर्वच संप्रदायांत (१) पति (कारण शिव) (२) पशू (कार्य) व (३) पाश ही तीन तत्त्वे मानली आहेत (पाशुपत कारण व कार्य हे दोनच 'अर्थ' मानतात व व्यापक कार्यसंकल्पनेत पशू बरोबर विद्या व कला यांचा समावेश करतात). या पैकी पती व पशू एकाच जातीचे (genus) असून मलांनी (पाशांनी) मर्यादित शक्ती झालेला शिव म्हणजे पशू. पर-शिवाला कसलाच मलस्पर्श कधीही न झाल्यामुळे तो चिदानंदघन, प्रकाश-विमर्शरूप, सर्व तत्त्वातीत आहे. शिव व शक्ती यांच्यामध्ये भेद नाही. शिव हा विश्वाचे उपादान कारण व निमित्त कारण आहे. विश्व हे शिवाचे स्वतःवरच (**आत्मभित्तौ**) असलेले प्रतिबिंब. ते त्याचे बाहेर नाही व त्याचा विश्वाचा नाश होत नाही (सृज्–सोडणे, असलेले विश्व बाहेर प्रकट करणे), स्थिती, संहार (विश्व आपल्यात परत घेणे) विलय किंवा पिधान व अनुग्रह ही शिवाची पंच कृत्ये आहेत. त्याचे अनुग्रहा–शिवाय मोक्षप्राप्ती नाही. शिव, त्याची शक्ती व त्याचे कार्य जे विश्व हे सर्व सत्य आहे. शांकराद्वैतातील ब्रह्मकल्पनेची मर्यादा स्पष्ट करण्यासाठी काश्मीरी शैव त्या ब्रह्माला 'शांतब्रह्म'–सादाख्य प्रतीचे म्हणाले तरी ते सर्व शैव संप्रदाय प्रकाश– विमर्शमय शिव म्हणजे औपनिषद ब्रह्म मानतात. विश्वविकास मांडताना सांख्यांच्या चोवीस तत्त्वांवरती आणखी बारा शुद्धतत्त्वे मानून एकूण छत्तीस तत्त्वे या सांप्रदायिकांनी मानली आहेत. तसेच पाशुपताखेरीज बाकीचे सर्व शैव दर्शनकार पशूच्या पतित्वावर मर्यादा घालणारे (१) पशुत्व (२) कार्यं व (३) मायिय असे मुख्यतः तीन मल किंवा पाश आहेत असे मानतात. पाशुपतसूत्रात नसले तरी गणकारिकेत मिथ्याज्ञान अधर्म, सक्तिहेतू, च्युती आणि पशुत्व असे पाच 'मल' मानले आहेत, पण ती परंपरा जरा भिन्न आहे.

जीवाच्या प्रयत्नाने आणि ईश्वरी अनुग्रहाने (अनुग्रहावाचून अशक्य) अनादिपण सान्त असलेल्या आणव किंवा पशुत्वमलासह सर्व मल नाहीसे झाले की जीवाला आपल्या शिवत्वाचा साक्षात्कार होतो. पशूचा मलक्षय करण्यासाठी वा

पाशबंधने तोडण्यासाठी केवळ विश्वाचे स्वरूप, त्याचे कारण. त्याची मूलतत्त्वे इ. विश्वस्वरूपाचे ज्ञान सांगून न थांबता शिवत्वसाक्षात्कारासाठी कोणती साधना करावी हेही शैव ग्रंथांनी विवेचन केले आहे. पाशुपतमताप्रमाणे सर्वसंग परित्याग करून शिवपूजनादी सेवा व 'ब्रह्म' जप करणे आवश्यक आहे. वीरशैवांचा षट्-स्थलसिद्धांत जीवाचे द्वैतातून शिवाशी अद्वैत साधण्याचा मार्ग विशद करतो. काश्मीरी शैवांची साधना ज्ञानमार्गी व योगमार्गी आहे. श्रीकंठाने ज्ञानमार्ग उपदेशला आहे.

या ठिकाणी 'ज्ञान' शब्द 'शब्दज्ञान' या उथळ अर्थी वापरला नाही. बाप उपेगी वस्तु शब्दु' असे अनुभवामृतात (६.१) शब्दमाहात्म्य सांगणारे ज्ञानदेव त्याच प्रकरणात शब्द खंडन करतात. 'ज्ञातबन्धः' या शिवसूत्रात 'ज्ञान' शब्दज्ञान या अर्थी वापरलेला दिसतो. आपल्या सर्व साधुसंतांनी शब्दज्ञान हे खरे ज्ञान नव्हे, जे अंतरात मुरून आचरणात उतरते, ते खरे ज्ञान. ते होण्यापूर्वी अविद्या, अज्ञान, पोकळ शब्दज्ञान इ. ची आहुती व्हावी लागते, असे सांगितले आहे.

शैव संप्रदायांच्या तत्त्वज्ञानाचे तपशिलात काही फरक आहेत. ते त्या त्या प्रकरणातून स्पष्ट केले आहेत. तसे किरकोळ फरक असले (उदा. पाशुपतांची मोक्षकल्पना—सात्मक दुःखांत व सिद्धावस्था) तरी सर्वांचे उद्दिष्ट एकच आहे. ते म्हणजे मोक्षप्राप्ती जीवाच्या प्रयत्नाने आणि ईश्वरी अनुग्रहामुळे अनादी पण सांत असलेला आणव किंवा पशुत्व मल नाहीसा झाला की जीवाला 'याची देही याच डोळा' आपण शिवस्वरूप असल्याची ओळख (**प्रत्यभिज्ञा**) पटते आणि मनुष्य जीवन्मुक्त होतो. नंतर त्याच्या हातून प्रारब्धानुसार होणारे कर्म त्याला बंधनकारक होत नाही. जीवाला आपण (अहम्)च विश्व (इदम्) आहोत असा साक्षात्कार झाला की अत्यंत श्रेष्ठ असा 'जगदानंद' त्याला होतो. आणि शुद्ध संवित् प्राप्ती म्हणजे जीवन्मुक्ती ही काश्मीरी (त्रिक) शैवमताची भूमिका विशिष्टाद्वैती श्रीकंठाचे मते ज्ञानप्राप्ती झाली की आपोआप पूर्वकर्मांचा लय होत नाही. अग्निहोत्रादी कर्मांनी त्यांचा नाश करावा लागतो नाहीतर प्रारब्धाचे फळ भोगावे लागते.[1] तसेच त्याच्या मते देहपातानंतर 'विरजा' नदी ओलांडली की शिवलोकप्राप्ती होते. सिद्धांतशैवमतात जीवन्मुक्ती मानली आहे. वीरशैवही जीवन्मुक्ती मानतात.[2] पण जीवन्मुक्तांचा अंतःकरणाशी थोडा संबंध राहतो तो देहपातानंतर संपून शिवकृपेने शिवैक्य होते. भेदाभेदवादी पाशुपतानी जीवन्मुक्ती मानली आहे. प्रत्यक्ष मोक्षावस्थेत जीव व शिव यांचे संबंध कसे असतात. अथवा प्रत्यक्ष मोक्षावस्था म्हणजे काय असते? आणि या मुद्यावर शैव सांप्रदायिकांत

---

१. ब्रह्ममीमांसाभाष्य—ब्र. सू. ४.१.१५, १६ व १८

२. श्रीकरभाष्य २.१३८ तसेच ब्र. सू. १.३.२९ (धर्मोपपत्तेश्च) चे विवेचन.

वैष्णव सांप्रदायिकाप्रमाणे द्वैती, अद्वैती (अद्वयवादी), विशिष्टाद्वैती इ. भिन्न मते प्रतिपादन केली गेली आहेत. जनमानसात वैष्णवमत शैवमतास विरोधी आहे, अशी भावना आहे. पण ही कल्पना तत्त्वज्ञानाचे क्षेत्रात किंवा आध्यात्मिक अनुभवात टिकत नाही. सिद्धांत शैवमतावरील प्रकरणात 'महाविष्णू' किंवा 'पर' विष्णू व परंज्योती पलीकडील शिव वस्तुत: एकच आहेत (ही 'परब्रह्म' या वस्तूती भिन्न नावे आहेत) याबद्दल तामिळी शैव संत व वैष्णव संत यांचे एकमत असल्याचे सांगितले आहे.[3] तथाकथित शैव व वैष्णव पुराणांनी सुद्धा हरिहरात भेद नाही यावर भर दिला आहे. उदाहरणार्थ, दक्षयज्ञविध्वंसासाठी आलेला वीरभद्र विष्णूशी लढण्यापूर्वी त्याला म्हणतो: (मला) माझा शिव तसा तू (आहेस) व जसा तू तसा शिव (आहे). आम्ही सर्वजण तुझे किंवा शंकराचे सेवक आहोत.[4] हरिहरसंप्रदायात हरिहरांचे ऐक्य मूर्ती रूपाने स्पष्ट केले आहे (काही शैवसांप्रदाय पाहा). शिव म्हणा किंवा विष्णू म्हणा वस्तू एकच आहे असे मराठी संतानी म्हटले आहे तेव्हा तत्त्वज्ञानाचे क्षेत्रात शैव-वैष्णवात द्वैती, अद्वैती इ. समान पंथ वा तत्त्वप्रणाली मांडण्याची पद्धती समान आढळली तर नवल नाही. ब्रह्मसूत्रावरील रामानुजांचे श्रीभाष्य श्रीकंठाचे ब्रह्ममीमांसाभाष्य व श्रीपतीचे श्रीकरभाष्य वाचताना याचा प्रत्यय अनेकदा येतो.

सच्चिदानंद ब्रह्मच सर्व व सर्वत्र असून मी स्वत: मी नसून ब्रह्म हेच माझे खरे स्वरूप आहे असा साक्षात्कार अनुभवणे व परब्रह्मात लीन होणे ही अद्वैताची मोक्षकल्पना. ईश्वरद्वयी त्रिक (काश्मीरीशैव मतात) जीवाचा शिवाशी अभेद असून सर्वत्र शिव असल्यामूळे बंध व मोक्ष यांना वास्तविक अस्तित्वच नाही (शिवदृष्टी ३.२०, ३.६८-७२ इ.) जीवाला आपल्या शिवत्वाची फेरओळख (प्रत्यभिज्ञा) पटून व मी (अहम्) व जग (इदम्) हे एकच असल्याच्या प्रत्ययाने 'जगदानंद' होणे. या त्रिक शैवमतात जीव व शिव यांची अभेद प्रतीती म्हणजे मोक्ष मानतात. या मतात व 'अहं ब्रह्मास्मि' चा साक्षात्कार म्हणजे मोक्ष या संकल्पनेत पुष्कळच साम्य आहे. काश्मीरी त्रिक शैवमतात व शांकराद्वैतात जीवनमुक्ती मान्य केलेली आहे.

---

३. अधिक तपशील: सी. व्ही. नारायण अय्यरकृत 'ओरिजिन अँड अर्ली हिस्टरी ऑफ शैविझम् इन साउथ इण्डिया' (मद्रास १९३६) पाहा.

४. **यथा शिवस्तथा त्वं हि, यथा त्वं च तथा शिव: ।**
**सेवकाश्च वयं सर्वे तव वा शंकरस्य च ॥** —स्कंद-माहेश्वर खंड ३१.४.४३
तसेच ग. वा. तगारे-ब्रह्मांड पुराण प्रस्तावना ४४, कूर्मपुराण प्रस्तावना पृ. ३६ (कूर्म १.९.८२-८६, १.१५.८७-९१ इ.)

सिद्धांत शैवमताप्रमाणे मध्वाचार्य जीव व ईश्वर यातील भेद, आत्म्यांच्या मधील भिन्नता, मोक्षावस्थेत जीव ईश्वरापेक्षा व एकमेकापेक्षा भिन्न मानतात.[५] मोक्षावस्थेत जीवाला सरूपता, सलोकता व समीपता मिळते पण तो ईश्वर (शिव, विष्णू) मध्ये विलीन किंवा एकरूप होत नाही. सिद्धांतशैव जीवन्मुक्ती मानतात. पण नंतर प्रारब्धकर्म भोगावे लागते, त्याचा मोक्षावर अनिष्ट परिणाम होत नाही, असे मानतात.

श्रीकंठांनी ब्रह्ममीमांसाभाष्यात 'मोक्षावस्थेत जीव शिवसदृश पण शिव ा पेक्षा भिन्न असतो. मोक्ष ही अभावात्मक अवस्था नसून ती नित्यतृप्त व आनंद स्वरूप असते.[६] त्या अवस्थेत सृष्टिनिर्मिती इ. शिवाच्या सत्ता जीवांना नसतात. मरणोत्तर 'विरजा नदी' पार केल्यावर शिवलोक प्राप्ती होते. मरणोत्तर विरजानदी पार झाल्यावरच वैकुंठ प्राप्ती होते असे यतींद्रमतदीपिकेत (पृ. ११८) म्हटले आहे. त्या अवस्थेत त्याला ब्रह्मसाम्य (सारूप्य) असले तरी सृष्टी उत्पन्न करणे इ. जगद्व्यापार करण्याचे त्याला सामर्थ्य नसते त्याचे संचारस्वातंत्र्य भगवत्संकल्पावर अवलंबून असतात.[७] नदी समुद्राला मिळण्यापूर्वी त्या दोघांत भेद होते. पण ती समुद्राला मिळाल्यावर एकरूप होते. त्याप्रमाणे भक्तावस्थेत देवापेक्षा स्वत:स भिन्न मानणारा जीव ईश्वर प्राप्तीनंतर ईश्वर रूप होतो ही भेदाभेद अथवा द्वैताद्वैत संकल्पना वीरशैवात आहे. त्याचप्रमाणे वैष्णव भेदाभेदवादीही मानतात.

जनमानसातील शैव–वैष्णव भेदास तसा तत्त्वज्ञानात्मक पाया नसून उलट बरेच साम्य आहे.

सारांश, शैव तत्त्वज्ञानाचे स्वरूप जीव, शिव व विश्व यांचे स्वरूप व संबंध सांगण्यापुरते तात्त्विक नसून, जीवाला शिवत्व प्राप्त करून देणाऱ्या साधनांचे विवेचन करून मार्गदर्शन करणारे आहे. हे तत्त्वज्ञान मुख्यत: आगमाधिष्ठित आहे याचा अर्थ ते द्विजा (त्रैवर्णिका) पुरते मर्यादित नसून सर्व सामान्य स्त्री–पुरुषांना या ज्ञानाचा व साधनेचा अधिकार आहे. या तत्त्वज्ञानाचा द्वैताद्वैतादी संप्रदाय कोणताही असो त्याचा उद्देश मोक्ष (शिवत्व) प्राप्ती आहे. या सर्व संप्रदायांनी मूलतत्त्वे-शिवाचे प्रकाश–विमर्शमत्त्व, जीव–शिवाचे मौलिक ऐक्य, शिव–शक्ति

---

५. मध्वाचार्यकृत ब्रह्मसूत्रभाष्य ४.४.१७–२३, तसेच रंगाचार्य रड्डीकृत मध्वकृत ब्रह्मसूत्र भाष्याचा अनुवाद भाग २ पृ. २८०–८५ पाहा.

६. ब्रह्ममीमांसाभाष्य ४.४.२२ वरील भाष्य (पृ. ५०१–५०६) व शैव विशिष्टाद्वैत प्रकरणातील मोक्ष संकल्पना पाहा.

७. यतींद्रमतदीपिका पृ. १२१.

ऐक्य, जगत्–सत्यत्व (शांकराद्वैती मायावादाचा अभाव), जीवन्मुक्ती इ.–जवळ–जवळ एकच आहेत (फरक व त्यांचा तपशील त्या त्या प्रकरणात दिला आहे) प्रत्येक प्रकरणाचे उपसंहारात त्या संप्रदायाची इतर तत्त्वप्रणालीशी तुलना दिलेली असली तरी जनमानसात शैव–वैष्णव भेद सखोल रुजला असल्यामुळे त्याचे वैयर्थ्य उपसंहारात स्पष्ट करून द्वैत, अद्वैत विशिष्टाद्वैत इ. तत्त्वसंप्रदाय शैवात व वैष्णवात असून त्यांची विचारसरणी सारखी आहे असे दाखवले आहे.

वामाचारी शैव सांप्रदाय, शैव तत्त्वज्ञानाशी जवळीक असणारा शाक्त संप्रदाय, शैव, शाक्त तंत्रे इ. स्वतंत्र ग्रंथांचे विषय आहेत. काही प्रमुख दक्षिण-मार्गी शैव संप्रदायांची स्थूल रूपरेषा असलेल्या या ग्रंथात त्यांची चर्चा केली नाही. अपेक्षा अशी आहे की तरुण अभ्यासकांनी पुढाकार घेऊन या क्षेत्रात ग्रंथनिर्मिती करावी.

समाप्त

# उल्लेख–सूची

———

# सन्दर्भग्रंथ

## लकुलीश पाशुपत दर्शन


संस्कृत

१. पासू–पाशुपतसूत्रम् (कौण्डिन्य विरचित 'पञ्चार्थभाष्यासह)
सं. अनंतकृष्णशास्त्री, त्रिवेंद्रम् १९४०

२. गका–गणकारिका, हरदत्तविरचित } सी. डी.
३. रटी–रत्नटीका (गका-वर)–भासर्वज्ञकृत } दलाल

४. सदसं–सर्वदर्शनसंग्रह–माधवाचार्यविरचित

५. षदसं–षड्दर्शनसंग्रह–आनंदाश्रम, पुणे १९६६
हरिभद्र–भारतीयज्ञानपीठ १९७०

६. तै आ–तैत्तिरीय आरण्यक

७. ब्र. सू.–ब्रह्मसूत्र–शांकरभाष्य, रत्नप्रभा, भामतीसह
सं. धूपकर–बाक्रे निर्णयसागर १९०४

८. श्वेताश्वतर उपनिषत्–शंकराचार्यटीका

९. भगवतीसूत्र–गुजरात विद्यापीठ, अहमदाबाद

इतर

१०. Pasupata Sutram–Eng. Translation by
Haripada Chokroborti, Academic
Publicaltoin, Calcutta, 1970

११. A History of Indian Philosophy, Vol. V
–S. N. Dasgupta

१२. Vaisnavism and Saivism–R. G. Bhandarkar

१३. Vaisnavism and Saivism (Bhandarkar as an Indologist)
–by R. N. Dandekar

१४. History of Saivism–Prabananande Jash, Calcutta

संस्कृत–पाली–प्राकृत

१. सर्व वेद (ऋक्, सामन्, यजुस्, अथर्वन्)–स्वाध्याय मण्डल पारडी
(जि. सुरत)

२. सर्वस्मृतिग्रंथ, गुरुमण्डल ग्रंथमाला, कलकत्ता

३. स्वतंत्र आवृत्त्या नमूद केलेल्या सोडून सर्व महापुराणे गुरुमण्डल ग्रंथमाला
कलकत्ता (२) व (३) प्रकाशक: मनसुखराय मोर.

४. स्वतंत्र आवृत्त्या नमूद केलेल्या सोडून सर्व उपनिषदे–उपनिषत्संग्रह, जगदीश-लाल शास्त्री, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली व शांकरभाष्यासह अनुवाद, गीता प्रेस गोरखपूर
५. अनुत्तरपञ्चाशिका: आद्यनाथ, का. सं. ग्रं (काश्मीर संस्कृत ग्रंथावली, क्रम १४, श्रीनगर, १९१८
६. ईश्वरप्रत्यभिज्ञा: उत्पलदेव, अभिवगुप्तकृत विमर्शिनी टीकेसह, खंड १ ला, का. सं. ग्रं. २२, श्रीनगर १९१८
७. वरील पुस्तक–खंड २ रा, का. स. ग्रं. ३३, १९२१
८. कारवाण माहात्म्य : सं. सी. डी. दलाल, १९२०
९. कूर्मपुराण, वेंकटेश्वर प्रेस, तसेच, सं. आनंद–स्वरूपगुप्ता, काशीराज ट्रस्ट, वाराणसी १९७२
१०. गणकारिका [ संक्षिप्त: ग. का. ] हरदत्त: सं. सी. डी. दलाल, १९२०
११. गाथासप्तशती : हालसातवाहन : सं. ए. वेबर तसेच उपर्युक्त : संपादक व अनुवादक स. आ. जोगळेकर
१२. तंत्रसार : अभिनवगुप्त : कासंग्रं. १७ श्रीनगर, १९१८
१३. तन्त्रालोक : अभिनवगुप्त (जयरथटीकेसह) का. सं. ग्रं. श्रीनगर
१४. तत्त्वप्रकाश : श्रीभोजदेव (श्रीकुमारकृत तात्पर्यदीपिका टीकेसह), टी. गणपति शास्त्री, त्रिवंद्रम् १९२०
१५. तैत्तिरीय आरण्यक [ संक्षिप्त : तै. आ ], आनंदाश्रम, पुणे
१६. परमार्थसार : अभिनवगुप्त (योगराजाचार्यकृत विवृतिसह) का. सं. ग्रं. ७, श्रीनगर १९१६
१७. पराप्रावेशिका : क्षेमराज, का. सं. ग्रं. श्रीनगर १९१८
१८. पाशुपत सूत्र [ संक्षिप्त : पा. सू. ] कौण्डिन्यविरचित 'पञ्चार्थ भाष्यासह, संपा अनंतकृष्ण शास्त्री, त्रिवंद्रम्, १९४०
१९. प्रत्यभिज्ञा हृदय : क्षेमराज : इंग्रजी अनुवाद जयदेवसिंग मोतीलाल बनारसी-दास, दिल्ली. १९८०
२०. बृहदारण्यक उपनिषद (हिंदी अनुवादासह), गीता प्रेस. गोरखपूर, संवत् २०२५
२१. बोधपञ्चदशिका : अभिनवगुप्त : का. सं. ग्रं. १४, १९१८
२२. बौद्धआगम (पाली–यात अंतर्गत ग्रंथ) नालंदा आवृत्ती संपादक भिक्खु (क्षु) जगदीश कश्यप
२३. ब्रह्ममीमांसाभाष्य (ब्रह्मसूत्रभाष्य) : श्रीकण्ठ (अप्पय दीक्षित 'शिवार्क-मणिदीपिका' टीकेसह), संपादक–हालास्यनाथ शास्त्री, कुंभकोणम्, खंड १ ला १९०८, खंड २ रा १९१८

२४. ब्रह्मसूत्र–शारीरक (शांकर) भाष्य ( रत्नप्रभा, भामती टीकांसह ), संपादक– धूपकर–बाक्रे, निर्णयसागर मुंबई १९०४
२५. ब्रह्मांडपुराण : सं. जगदीशलाल शास्त्री, मोतीलाल बनारसीदास, १९७३
२६. भगवतीसूत्र (पं. बेचरदास यांच्या अनुवादासह ), गुजरात विद्यापीठ
२७. भगवद्‌गीता ( अनेकटीकासमलंकृत ) गुजराती प्रिंटिंग प्रेस, मुंबई
२८. भावोपहार : चक्रपाणिनाथ ( भट्ट रम्यदेव विरचित विवरण ) का. सं. ग्रं.१४, श्रीनगर, १९१८
२८ अ : मध्वाचार्यकृत ब्रह्मसूत्र भाष्य : भाषांतरकार–रंगाचार्य रड्डी ( जयतीर्थ-कृत तत्त्वप्रकाशिका १ ) पुणे १९४९ टीकेसह
२९. महाभारत [ संक्षिप्त : म. भा.], गीता प्रेस, गोरखपूर, संवत् २०१३
३०. महाभाष्य : पतंजलि कीलहॉर्न आवृत्ती
३१. महार्थमञ्जरी : महेश्वरानंद (स्वोपज्ञ परिमल व्याख्येसह) संपादक-पं. व्रज-वल्लभ द्विवेद, योगतंत्र ग्रंथमाला ५ वाराणसी १९७२
३१ अ, यतींद्रमतदीपिका : श्रीनिवासदास; अनु, आदिदेवानंद, मद्रास १९६७
३२. रत्नटीका : भासर्वज्ञ [ गणकारिकेवरील टीका : संक्षिप्त र. टी ] संपादक–सी. डी. दलाल, १९२०
३३. लिखित स्मृति (स्मृतिसंदर्भ) गुरुमंडल ग्रंथमाला, कलकत्ता मनसुखराय मोर प्रकाशित
३४. लिङ्गधारण चन्द्रिका : नन्दीश्वर अथवा नन्दिकेश्वरः संपादक व अनुवादक– एम्. आर्. साखरे, बेळगाव, १९३८
३५. वाजसनेयी संहिता : मराठी अनुवादक श्रीधरशास्त्री पाठक, मनोहर ग्रंथमाला २५, पुणे शके १८६४
३६. शतपथ ब्राह्मण (काण्व): संपादक डब्ल्यू कॅलंड व रघुवीर १९८३
३७. शंकर विजय : आनंद गिरी, संपा. जे. तर्कपंचानन
३८, शंकरविजय : माधव ( धनपति–डिंडिम टीकेसह)
३९. शिवदृष्टि : सोमानंद (उत्पलदेव कृतवृत्ति सह (संक्षिप्त : शि. दृ.), का. सं. ग्रं. ५४, श्रीनगर, १९३४
४०. शिवमहापुराण : संपादक–रामतेजशास्त्री, पंडित पुस्तकालय, काशी, संवत् २०२०
४१. शिवसूत्र : वसुगुप्त (क्षेमराज कृत विमर्शिनी टीकोपेत) इंग्रजी अनुवाद– जयदेवसिंग मोतीलाल बनारसीदास दिल्ली १९७९
४२. श्रीभाष्य : रामानुज : इंग्रजी भाषांतर प्रा. रा. द. करमरकर, पुणे विद्यापीठ, पुणे
४३. श्रीकरभाष्य (ब्रह्मसूत्रावर) : श्रीपति पंडित (संक्षिप्त : श्रीभा) संपा. सी.

हयवदनराव खंड १ प्रस्तावना, खंड २ सं. भाष्य बंगलोर, १९३६
४४. श्वेताश्वतर (शांकरभाष्यासह)–गीता प्रेस, गोरखपूर
४५. षट्त्रिशत् संदोह (राजानकानंद विवरण सहित) का. सं. ग्रं. १३, श्रीनगर १९१८
४६. षड्दर्शन संग्रह (संक्षिप्त : षदसं) : हरिभद्र : भारतीय ज्ञानपीठ, १९७०
४७. सर्वदर्शन संग्रह (संक्षिप्त : सदसं) : माधवाचार्य–आनंदाश्रम, पुणे १९६०
४८. सिद्धान्त शिखामणि (संक्षिप्त : सिशि) : शिवयोगी शिवाचार्य : संपा. प्रा. श्री. गु. अळ्ळी, संकेश्वर १९७६
४९. सौंदर्य लहरी–शंकराचार्य संपादक–महादेवशास्त्री, संस्कृत ओरिएण्टल सेरीज
५०. स्पन्दकारिका : वसुगुप्तः संपादक ग.वा. तगारे, कौशिक प्रकाशन, सातारा१९८४

## मराठी

१. रुद्र, यज्ञ, शिवलिंग : ग, बा. दंडगे, महाराष्ट्र ग्रंथ भांडार कोल्हापूर
२. विवेक चिंतामणी : संपादक पंडितराव आवळीकर, धारवाड १९६३
३. वीरशैव धर्मपंथ : सु. मोगलवार नागपूर, धारवाड १९६३

## कानडी

१. बसवगीता (बसवेश्वर वचने) : संस्कृत व इंग्रजी भाषांतर भाषांतरकार– प्रा, टी. जी. सिद्दप्पाराध्य, संस्कृत डिपार्टमेंट मैसूर विद्यापीठ : प्रकाशन श्रीमज्जगद्गुरू राजेंद्र विद्यापीठ ग्रंथमाला, चितळदुर्ग १९६७

## Bibliography

1. Abhinava-gupta - An Historical and philosophical study : K. C. Pande, Chowkhamba Sk. Series, Benares, 1935.
2. Al Biruni's India : S C. Sachau, ' t ' Tripnur, London 1910.
3. A Hand book of Viras aivism : S. C. Nandimath, Dharwar, 1942.
4. History of Indian Philosophy Vol, V : S. N. Dasgupta, Motilal Benarsidass, Delhi, 1975.
5. Ancient India and South gndian hislory : S. K. Aiycengar 2 Vols, pune.
6. Aspects of Kashmir S'aivism : B. N. Pandit, Utpala Publications, S'rinagar, 1977.
7. Cultural Heritage of India vol IV – Ramakrishna Mission Instilute at calcutta, Calcutta 1956.

8. Bhaskari, vol. I and III : K. C. Pande, Lucknow University.
9. Dance of S'iva : A. Kumarswami, Asia pul. House, Bombay 1948.
10. Elements of Hindu Iconography : T. Gopinath Rao Motilal, Banarsidass, Delhi.
11. Encyclopaedia of Religion and Ethics : (Abbreviation-ERE), Haistings.
12. Esoteric Buddhism : B. Bhattachara.
13. Essentials of Virasaivism : H. P. Mulledevaru, Bharatiya Vidya Bhavan, Bombay 1913.
14. Excavations at Harappa : M. S. Vets, 2 Vols, 1940.
15. History of Philosophy - Eastern and Western : vol. I George Allen & Umwin, London, 1967.
16. History and Philosophy of Lingayat Religion : M. R. Sakhare, Belgaum, 1942.
17. History of Shaivism : Prabanananda Jash, Roy and Chowdhary, Calcutta, 1974.
18. The Kapalikas and Kalamukhas : David N. Lorensen, Thomson Press, New Delhi, 1972.
19. Kashmir Shaivaism - J. C. Chatterji, Kashmir Series, S'rinagar, 1914.
20. L'inde classique : L. Renou & J. Filliozat : (French)
21. Mohenjo Daro and the Indus Civilization - Marshal, Sir John 3 Vols, London, 1931.
22. Neo-Upanisadic Philosphy : Prof. K. V. Gajendragadkar, Bharatiya Vidya Bhavan, Bombay 1959.
23. Origin and Early History of S'aivism in South India : C. V. Narayan Aiyyar, University of Madras, 1936.
24. Pasupata - Sutram (Eng. Translation) Haripada Chakrobarti, Academic Publications. 1970.
25. S'akti or Divine Power : Sudhendu Kumar Das, Calcutta.
26. Schools of Saivism : Jadunath Sinha, Sinha Publishing House Calcutta, 1970.

27. Some Contribution of South India to Indian Culture : a reprint K. Aiyangar : Cosmo publication, New Delhi.
28. Studies in Epics and Puranas of India : A. D. Pusalkar : Bharatiya Vidya Bhavan, Bombay 1963.
29. The Philosophy of Bhedabheda : P. N. S'rinivasachari, Madras, 1950.
30. The S'ivadvaita of S'rikantha : S. S. Suryanarayan S'astri; Madras University, 1930.
31. Vaisnavism and S'aivism : R. G. Bhandarkar.
32. Vaisnavism and S'aivism : (A symposium on ' Bhandarkar as an Indologist,' Bhandarkar O. R. Institute, Pune 1976.)
33. Vedic Age : History and Culture of the Indian people Vol. I. Bharatiya Vidya Bhavan, Bombay, 1965.

=

Pralyabhijna Philosophy

# मराठी तत्त्वज्ञान-महाकोश मंडळाची प्रकाशने

मराठी तत्त्वज्ञान-महाकोश ... ... १५०-००
(खंड १, २, ३ बांधणी ग्रंथ)
मराठी तत्त्वज्ञान-महाकोश
(खंड १, २, ३ सुटे फॉर्म्स) बांधणीशिवाय ... ७५-००
पारिभाषिक शब्दावली
साहित्याचे तत्त्वज्ञान : लेखक – वि. ना. ढवळे ...
आनंद कुमारस्वामी : लेखक – विश्वनाथ श्री. नरवणे
अनुवादक – ग. ना. जोशी
बर्ट्रान्ड रसेल : लेखक – सु. वा. बखले ...
रवीन्द्रनाथ टागोर : लेखक – विश्वनाथ श्री. नरवणे
अनुवादक : ग. ना. जोशी
नीतिमीमांसा : लेखक – प्रा. श्रीनिवास दीक्षित ...
भारतीय तर्कशास्त्राची रुपरेखा : लेखक – सुरेन्द्र बारलिंगे
व क्रांतिप्रभा पांडे
मानवेन्द्रनाथ रॉय : लेखक – द. धों. बंदिष्टे ...
तत्त्वज्ञ सावरकर संपादक – य. दि. फडके ...
पाणिनीय व्याकरण आणि भाषातत्त्वज्ञान ...
लेखक – पं. वामनशास्त्री भागवत
विश्व आणि मानव (आकाशवाणीवरील भाषणांचा संग्रह)
Philosophy in Fifteen Modern Indian Languages
Ed. Prof V. M Bedekar
Philosphical Reflections : Selected Papers of
Prof. D. D. Vadekar.

## वरील सर्व पुस्तके मिळण्याची ठिकाणे

**कॉन्टिनेन्टल प्रकाशन**
विजयानगर पुणे ४११०३०

**दास्ताने रामचंद्र आणि कंपनी**
८३०, सदाशिव पेठ, पुणे ४११०३०

**मराठी तत्त्वज्ञान-महाकोश मंडळ कार्यालय**
फर्ग्युसन कॉलेज आवार, ग्रंथालयामागे, पुणे ४११००४
फोन नं. : ४४३५७६

(या ग्रंथाच्या मुखपृष्ठावरील चित्र राजस्थानमधील मेवाडच्या राजघराण्याचे कुलदैवत 'भगवान एकलिंगजी' - पंचमुखी शिव - याचे आहे.)